पुणें अ. वि. गृह प्रकाशन

# म. गांधी-दर्शन

लेखक

पां. श्री. आपटे

शके १८७० मूल्य ३॥ रु. सन १९४८

# प्रकाशकाचें निवेदन

**म. गांधी दर्शन** हें पुस्तक आज गांधीजयंतीच्या दिवशी प्रसिद्ध करण्यांत येत आहे.' गेलीं २५ वर्षें अ. वि. गृहामध्यें या महापुरुषाची जयंति साजरी करण्याची प्रथा चालू आहे. राष्ट्राच्या अभ्युदयाला साधनभूत असणाऱ्या अनेकविध लहानसहान कार्यांतहि म. गांधी लक्ष घालून कार्यकर्त्यांना उत्तेजन देत. त्यांच्या या वृत्तीमुळें संस्थेवरहि त्यांचा लोभ होता. म. गांधींच्या मृत्यूनंतर संस्थेच्या कार्यकारी मंडळानें सभेंत पुढील ठराव केला : '

" महात्मा गांधी यांच्या वधाची वार्ता ऐकून या सभेला अत्यंत दुःख झालें. महात्माजींचा व संस्थेचा संबंध पुष्कळ वर्षांपासून आलेला आहे. १९१५ सालीं त्यांनीं पुणें शाखेस भेट दिली व १९१८ सालीं संस्थेच्या त्या वेळीं असलेल्या चिंचवड शाखेंतील इमारतीचा अनावरण समारंभ त्यांचेच हस्तें करण्यांत आला. नाशिक शाखेला त्यांनीं १९२७ सालीं भेट दिली. संस्थेचे कांहीं विद्यार्थी महात्माजींच्या आश्रमांत व सान्निध्यांत राहून त्यांच्या सहवासाचा फायदा घेऊन आलेले आहेत. महात्माजींनीं वेळोवेळीं भारताच्या स्वातंत्र्याकरितां जीं उत्थापनें केलीं त्यांत संस्थेच्या चालकांनीं व आजी माजी विद्यार्थ्यांनीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें हातभार लावलेला आहे ही गोष्ट [illegible] अभिमानानें नमूद करावीशी वाटते. अखंड पंचवीस वर्षें महात्माजींचा वाढदिवस संस्थेंत उत्साहानें साजरा केला जात असे.

गरीब विद्यार्थ्यांचें शिक्षण, समाजसेवा व समाजाचें आरोग्य या कार्याला संस्थेनें वाहून घेतलेलें असल्यानें व महात्माजींच्या अनेकविध मोठ्या कार्यांत या तीनहि प्रकारच्या कार्यांना स्थान असल्यामुळें त्यांच्या अकालीं मृत्यूमुळें या संस्थेच्या सभासदांना संस्थेचीच हानि झाल्यासारखें वाटत आहे.

महात्माजींच्या निधनामुळें यापुढें सर्व भारतवर्ष त्याचप्रमाणें ही संस्था त्यांच्या स्फूर्तिदायक मार्गदर्शनाला आंचवली याबद्दल सर्व सभासदांना अत्यंत दुःख होत आहे. महात्माजींची स्मृति मूर्त स्वरूपांत राहील अशा प्रकारचें कांहीं स्मारक संस्थेनें करण्याचें ठरविलें आहे."

आणि याच दृष्टीनें या ग्रंथाचें प्रसिद्धीकरण संस्था करीत आहे.

प्रस्तुत पुस्तक येवलें येथील राष्ट्रीय पाठशाळेचे चालक श्री.आपटे गुरूजी यांनीं लिहिलेलें आहे. महात्मा गांधींचे ते अनुयायी आहेत. महात्माजींच्या सान्निध्यांत राहण्याचें भाग्य त्यांना लाभलें होतें. महात्माजींच्या जीवनाचें जवळून सश्रद्ध भावनेनें पण त्याचबरोबर विवेचक व चिकित्सक बुद्धीनें त्यांनीं निरीक्षण केलेंलें आहे. म. गांधीचे विधायक कार्याला त्यांनीं वाहून घेतलें आहे. ते स्वत: कार्यकर्ते असून लेखक म्हणूनहि प्रसिद्ध आहेत. महात्माजीचें चरित्र लिहिण्याबद्दल आम्हीं त्यांना विनंती केली. त्यांनीं आमच्या शब्दास अनुमति देऊन आम्हास उपकृत केलें आहे. ठरलेल्या मुदतींत त्यांनीं लेखन पूर्ण करून दिलें याबद्दल संस्थेतर्फे मी त्यांना धन्यवाद देतों.

म. गांधींच्या सारख्या युगपुरुषाचीं अनेक लहानमोठीं चरित्रें वा त्याच्या तत्त्वज्ञानासंबंधींचीं अन्य पुस्तकें वा ग्रंथ प्रकाशित झाले आहेत व पुढेंहि होत राहतील. संस्थेनेंहि स्वाध्यायमालेत 'गांधीजी' या नांवाचें छोटेखानी चरित्र जुलै १९४६ मध्यें प्रसिद्ध केले आहे. असें असलें तरी प्रस्तुत ग्रंथाला एक विशिष्ट स्थान प्राप्त होईल अशी आमची अपेक्षा आहे. जातिधर्मातीत दृष्टीनें मानवांच्या सुखदु:खांकडे पाहण्याचा संदेश महात्माजींनीं जगाला दिला. त्यांचे शिष्य श्री. आपटे गुरुजी यांनी हा सुंदर ग्रंथ लिहिला. व गरीब विद्यार्थ्यां-करितां मुक्तहस्तानें विद्यादानाचें कार्य करणारी संस्था तो प्रकाशित करीत आहे, यांत विशेष औचित्य आहे ही गोष्ट वाचकांच्या सहज लक्षांत येईल.

भारताच्या पित्याचें विशाल जीवनचरित्र २५० पृष्ठांत लिहिण्याचें अत्यंत अवघड काम श्री. आपटे गुरुजी यांनी केलें आहे. महात्माजींच्या आयुष्यांत घड-लेल्या घटनांची क्रमानुसार केवळ जंत्री या पुस्तकांत नाहीं तर घटना, भावना व बुद्धि यांचा त्रिवेणी संगम या ग्रंथांत झालेला वाचकांस आढळून येईल.

अशा या ग्रंथाचें प्रकाशन करण्याचे कार्य संस्थेकडे दिलें यासाठीं पुन्हां श्री. आपटे गुरुजींचे आभार मानून ह्या चरित्रांत त्यांनीं जें गांधींचें जीवनदर्शन आपल्यापुढें ठेविलें आहे त्यामुळें विधायक कार्य करणाऱ्यास व त्यायोगें राष्ट्रोन्नति साधण्यास सर्वांना स्फूर्ति प्राप्त होईल अशी आशा बाळगून हें निवेदन संपवितों.

विद्याभवन, पुणें २
२ ऑक्टोबर, १९४८

वि. गं. केतकर
कार्याध्यक्ष

# लेखकाचें निवेदन



**महात्मा गांधींचें** चरित्र लिहावे असा बरेच दिवसांपासून मानस होता. कै. **महादेवभाई देसाई** यांनीं या कामीं साहय करावयाचें मान्य करून **सेवाग्रामला** मला आग्रहानें बोलाविले होते, पण माझा संकुचित स्वभाव आड आला. शिवाय गांधीचें चरित्र घडत असतांना—जे लढे ते लढत होते त्यांतले माझे वांटयास आलेलें काम आपले स्थान न सोडतां, करीत राहणें मला इष्ट वाटलें. मी हा जो निणय घेतला तो शेवटी मला उपकारकच ठरला. कारण गांधीनी सुरू केलेली कामे करीत असतांनाच आणि लढे लढत असतानाच **गांधीचरित्र** अधिक चागले समजले.

चरित्रलेखनाचा बेत अशा रीतीनें बरीच वर्षे जो मागे पडला होता. त्याला पुनश्च चालना पुणें येथील अनाथ विद्यार्थी गृहाच्या चालकांनी दिली. मीं विचार केला कीं, गांधीजीचें सुसंगत व उद्बोधक जीवनचरित्र तरुण पिढीपुढे ठेवलें तर ती सध्याच्या परिस्थितीत अत्यंत इष्ट अशी गोष्ट होईल, कारण मूळ चरित्रांतील प्रसगापेक्षा गांधीच्या तत्त्वज्ञानासंबंधी टीका-प्रतिटीकाच तरुण पिढीचे वाचनांत अधिक येतात. जीवनचरित्राची चागली माहिती असल्याशिवाय अशा टीका नीट समजू शकत नाहींत. असा विचार करून आटोपशीर असें चरित्र लिहून प्रकाशकांना दिलें. या चरित्रास 'गांधी-जीवन प्रवेशिका,' असें जर दुसरे नांव दिले तरी चालण्यासारखें आहे.

चरित्रग्रंथाचा अभ्यास ही पहिली पायरी होय. या पायरीवर थाबन आपले भागणार नाहीं.

Standing at the foot boys, gazing at the sky,
How can you get up boys if you never try?

गांधींनीं उपदेशिलेल्या सत्याचरणाचें महत्त्व ओळखून ते आपल्या नित्याच्या जीवनांत उतरविण्याचा प्रयत्न सारखा करीत राहिलें पाहिजे. असें करीत राहिलें तरच सत्याचरण हा आपला प्रकृतिस्वभाव बनतो असत्याचरणाचे दुष्परिणाम आपण रोज पाहात आहों. आजचे तरुण उद्यां लहानमोठ्या अधिकारपदांवर येतील. कांही मंत्रिमंडळांत जातील आणि तेथे

त्यांच्या सत्याचरणाची कसोटी लागेल. जीवनाच्या विविध क्षेत्रांतील पुढारी जितके निष्ठावंत व सत्याचरणी तितकें हिंदुस्थानचें राष्ट्रीय जीवन निर्मल होईल आणि त्याचा फायदा लहानथोरांस मिळून, भारतांत सुख समृद्धि नांदेल, संस्कृति उच्चपदावर विराजमान होईल आणि इतर देशांतील लोक हिंदकडे प्रेमादरानें पाहतील.

चारित्राची लेखी प्रत तयार करितांना श्री. श्रीपाद दत्तात्रय वैद्य यांनीं आस्थापूर्वक मदत केली. **श्री. दा. न. शिखरे** यांनीं आपल्या जवळच्या पुस्तकांचा व विचारांचा फायदा मला घेऊं दिला व **अनाथ विद्यार्थी गृह, पुणें**, या संस्थेनें हें पुस्तक प्रकाशित करण्याची जबाबदारी स्वीकारली, या सर्वांचा मी अत्यंत ऋणी आहें. शेवटी जीवर राष्ट्राची मदार आहे अशा होतकरू तरुण पिढीस हा ग्रंथ समर्पण करून हें निवेदन पुरें करतों.

विद्यापीठवाडा, पुणें २
१७ सप्टेंबर, १९४८

पां. श्री. आपटे

# विषयानुक्रम



# गांधीदर्शन

## १. प्रास्ताविक

**गांधी चरित्र विस्मयकारक यथार्थ वदण्या कोण असे ? ।**
**हातां टेकिती मित्र जवळिचे, थक्क होउनी शत्रु तसे ।।**

**महात्मा गांधी** परवांपरवांपर्यंत आपणांत होते. ते आपणांतून गेले ही गोष्ट आपणांला खरी देखील वाटत नाहीं. त्यांचा तो फकीरी वेष, साधा आहार, झोपडींतील राहणी, इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, देशी भाषेंतून बोलण्याचा हट्ट, चरखाच देशाचा उद्धार करील हा संदेश, अहिंसक युद्धाची ती अपूर्व कल्पना, त्या **दांडी** आणि **नौखालीच्या** पायी यात्रा, तीं प्राणांतिक उपोषणें, आणि त्या सार्वजनिक प्रार्थना, वगैरे गोष्टी आपल्या नित्य परिचयाच्या झाल्या होत्या. दैनिक वर्तमानपत्र उघडलें आणि त्यांत गांधींच्या नव्या हालचालीची कांही बातमी नाही असा आपला दिवस क्वचितच गेला असेल. म. गांधींच्या विचारसरणीशी मतभेद असणारांनी ही गोष्ट मान्य केली आहे कीं, हा पुरुष युगपुरुष होऊन गेला. गेली दोन अडीच तपे "गांधी बोले आणि हिंद हाले" अशी स्थिति होती. हीं तीस वर्षे भारतवर्षाच्या इतिहासांत मोठमोठाल्या घटनांनीं भरलेली आहेत. याच कालखंडात ब्रिटिशसत्तेशी हिंदी लोकांनीं अपूर्व असा सामना दिला. या काळांत ज्ञातिकलहाला ऊत आला. याच कालांत दोन महायुद्धें होऊन त्यांचे कांहीं बरे व कांहीं वाईट परिणाम हिंदी जीवनावर झाले. याच कालांत अनेक सामाजिक व आर्थिक प्रश्न उत्पन्न झाले. या सर्वांशीं गांधींचा कांहीं ना कांहीं तरी संबंध होताच. स्वतःच्या आयुष्याच्या क्षणाक्षणाचा उपयोग करण्यावर गांधींचा कटाक्ष असल्यामुळें

गांधीचरित्र अनेक घटनांनीं भरलेलें आहे. यांतील काहीं घटना घडतांना त्यांना भिन्न विचारसरणींच्या प्रज्ञावंतांकडून कसून विरोध झाला. ब्रिटिशांशीं त्यांनीं घेतलेल्या झुंजी यासारखेच स्वजनांशीं त्यांनीं केलेले सामने अलौकिक ठरले आहेत. जीवनाप्रमाणेच त्यांचा मृत्यु, त्यांची स्मशानयात्रा, त्यांच्या अस्थींचें विसर्जन, देशोदेशींच्या सत्ताधाऱ्यांनीं आपल्या देशाचीं निशाणें त्यांच्या सन्मानार्थ खालीं करणें, यांना केवळ भारतीय नव्हे, तर जागतिक महत्त्व आहे. गांधींच्या मृत्यूनें जगताची हानि झाली असें जगांतील यच्च्यावत थोर पुरुषांनीं उच्च स्वरानें म्हटलें आहे.

अशा अलौकिक पुरुषाचें चरित्र दीडदोनशें पानांत सुस्पष्ट लिहिणें ही गोष्ट कठिण नाहीं असें कोण म्हणेल ? म. गांधींच्या राजकारण धोरणावर आज देशांत रणें माजलीं आहेत. यांत वाचक आणि लेखक कोणत्या तरी एका पक्षांत असणारच. अशा स्थितींत विषयाच्या व्यापकतेवरोबर, परिस्थितीच्या काठिण्याचीहि भर पडलेली आहे. यामुळें गांधीचरित्र लिहावयास आरंभ करतांना मन गोंधळल्यासारखें झालें असल्यास नवल नाहीं. पण

**"मी प्रयत्न पुरुषार्थ भुकेला, यत्नवादी गुरूचा लघु चेला"**

असल्यामुळें गांधीचरित्राच्या अथाग पाण्यांत शिरण्याचें धाडस करीत आहें. मतभेदाच्या दावटळींत न सांपडतां गांधींचें दर्शन तरुण पिढीला करून देण्याचा मी संकल्प केला आहे. तो संकल्प पुरा व्हावा म्हणून मीं गांधी-शिवाय दुसऱ्या कोणाजवळ आशीर्वाद मागावा ?



# २. कुल-संस्कार

**जन्मभूमि**

म. गांधींच्या जन्मभूमीची माहिती करून घेण्याकरितां आपण हिंदुस्थानचा नकाशा उघडू या. या नकाशांत मुंबई इलाख्याला चिकटलेलें **काठेवाड** या नांवाचें एक मोठें द्वीपकल्प आढळेल. समुद्रानें परिवेष्टित हा भूभाग असल्यामुळें या प्रदेशांतील लोक दूरदूर देशांत जाऊन व्यापार करणारे असले पाहिजेत अशी आपण कल्पना करतों. आपल्या कल्पनेप्रमाणेंच वस्तुस्थिति आहे. काठेवाडांत **भावनगर–वेरावळ–पोरबंदर** अशीं सुंदर बंदरें आहेत. या बंदरांतून काठेवाडी लोक **इराण–आफ्रिका–जावा, चीन** इत्यादि दूरदूरच्या देशांत व्यापार करण्याकरितां जात व तेथून अगणित संपत्ति आणीत. आपल्या पुराणांत काठेवाडांतील अनेक स्थलांचा उल्लेख आढळतो. श्रीकृष्णांनीं वसवलेली द्वारका नगरी काठेवाडच्या दक्षिणेस असलेल्या एका बेटांत आहे. अर्जुनाला श्रीकृष्णाच्या कृपेनें सुभद्रेचा लाभ ज्या पर्वतावर झाला तो काळाकभिन्न प्रचंड रैवतक पर्वत काठेवाडच्या दक्षिणेस आहे. इतिहासप्रसिद्ध सोरटी सोमनाथाचें देऊळ या रैवतक पर्वतापासून फार दूर नाही. श्रीकृष्णांनीं मित्रप्रेमानें सुदामदेवांना ज्या गांवची जहागिरी दिली तें गांव सध्यां **पोरबंदर** या नांवानें प्रसिद्ध आहे. या पोरबंदराच्या राजाची दिवाणगिरी गांधींचे आजोबा करीत होते. दिवाणगिरी वंशपरंपरेनें देण्याची पद्धत आपल्या इकडे असल्यामुळें गांधींच्या वडिलांकडेहि ही दिवाणगिरी आली होती.

**करारी पूर्वज**

गांधींचे आजोबा **ओता गांधी** हे जितके स्पष्टवक्ते, निस्पृह होते तितकेच धीट व शूर होते. आपल्या आश्रयार्थ आलेल्या निरपराधी गृहस्थाच्या

रक्षणार्थ **ओता** गांधींनी हातांत तलवार घेऊन राजसत्तेशी युद्ध केलें होतें. पण पुढें निरुपाय होऊन त्यांना **पोरबंदर** सोडून **राजकोटच्या** संस्थानची दिवाणगिरी पत्करावी लागली. पण तेथे गेल्यावर त्यांनी राजाला जो मुजरा केला तो डाव्या हाताने असें का म्हणून नबाबानें प्रश्न विचारला तेव्हा **ओता गांधींनी** उत्तर दिलें की, आज **पोरबंदरच्या** गादीशी माझा बेबनाव झाला असला तरी माझी त्या गादीशीं निष्ठा कायमच आहे. त्या **गादीला उजवा हात जो एकदां दिला तो दिला.** नोकरी मागावयाला जाताना जुन्या मालकाविषयी निष्ठा व्यक्त करावयाला असामान्य धैर्य लागतें नाही का ? ते धैर्य गांधींच्या आजोबाच्या ठिकाणी होतें. **ओता** गांधींनी पोरबंदर सोडल्यावर काही वर्षांनी तेथील राणीने त्यांच्या चिरंजीवांना म्हणजे **करमचंद** गांधींना दिवाणपद दिलें.

या काळांत दिवाणाला जो पगार मिळे तो राजाला परत नजराणा म्हणून परत द्यावा लागे मग दिवाणाचा योगक्षेम कसा चाले हा प्रश्न कोणीहि विचारील. इतर कामाप्रमाणे न्यायनिवडा करण्याचे काम दिवाणाकडे असे. फिर्याद करणाराला न्याय मिळण्याकरिता कोर्ट फी द्यावी लागे ती दिवाणाला स्वतःच्या खर्चाकरिता घेतां येत असे **करमचंद गांधी कबा गांधी** म्हणून लोकांत प्रसिद्ध होते वडिलाप्रमाणे **कबा गांधी** निःस्पृह, सत्यनिष्ठ व बरेचसे रागीट होते. दिवाण म्हणून आपला बडेजाव त्यांनीं करून घेतला नाही. पदरी नोकरचाकर असूनहि ते घरात लागणारी भाजी आणावयास बाजारांत जात व ती घरीं आणल्यावर ओटीवर बसून ती निवडून काठेवाडी पद्धतीप्रमाणे डाव्या हातात सुरा घेऊन चिरून थाळ्यांत भरून घरांत पाठवीत. चिरलेल्या भाजीच्या आकारावरून आज किती पाहुण्यांचा स्वयपाक करावयाचा हे बायकांनी समजावयाचे. त्या काळांत घरांतील मुख्य पुरुष घरांतील मंडळीशी अगदी कमी बोलत.

वडिलांच्या उलट पुतळाबाईचा स्वभाव. ती **टिळकांच्या**, **जवाहरलाल-जींच्या** मातांप्रमाणे गरीब, सात्त्विक, उपासनेंत गर्क अशी होती. **सूर्यदर्शना-**

शिवाय अन्नग्रहण करावयाचें नाहीं असें तिचें व्रत असे. यामुळें पावसाळी हवा असली म्हणजे तिला कित्येकदां दोन दोन दिवसांत सूर्यदर्शन होत नसे. सूर्यदर्शन नाहीं म्हणून अन्नग्रहण नाहीं. असा प्रसंग आला व कोणी तिची कींव काढली तर तिनें म्हणावे "प्रभूची इच्छा मीं अन्न न घ्यावें अशीच होती." व्रतपरिपालनापासून मन निश्चयी, खंबीर व पीळदार बनतें. अशा मनाच्या माणसाकडूनच कांहीं झालें तर अलौकिक कार्य होतें. असो.

**कबा** गांधींना बरीच मुलें झालीं, पण मोहनदासशिवाय कोणीच चमकला नाहीं. गांधींचा जन्म ता. २ ऑक्टोबर १८६९ सालीं झाला. या वेळी जस्टिस रानडे पंचवीस वर्षांचे, टिळक तेरा वर्षांचे व गोखले सारे तीन वर्षांचे होते. लहानपणीं गांधींमध्यें अलौकिक असे कांही दिसलें नाहीं. वडील व मातोश्री यांच्यावर त्यांचें प्रेम असे व तें प्रेम ते सेवा करून व्यक्त करीत. स्वभाव लाजाळू थोडासा भित्राच होता. भुतें, अंधार, साप, विंचू यांची त्यांस फार भीति वाटावयाची. शाळेचा अभ्यास मात्र ते मन लावून करीत पण त्यांतहि ते विशेष चमकले असें नाहीं. वडील भावावर त्यांचें विशेष प्रेम असे. गांधींच्या ठिकाणीं विशेष सत्यप्रीति होती. पण त्याच्या भावाच्या ठिकाणी नव्हती. तो बऱ्याच भानगडी करी.

गांधींचें व त्यांच्या भावाचें लग्न लवकर म्हणजे १३ व्या वर्षी झालें. त्यांची वधू त्यांचेच वयाची होती. त्यांत कोण मोठे होते याचा बोध शेवटपर्यंत झालाच नाही. लग्न झाल्यानंतर लवकरच गांधींना व त्यांचे बंधूंना कुसंगती लागली. त्याच्या दोस्ताचे नांव गांधींनी आत्मकथेंत देण्याचें टाळलें आहे. वडील आपल्या कामात दंग. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें ते आपल्या मुलांशीं फार वेळ बोलत नव्हते, यामुळें मुलांची विचारसरणी अनिष्ट वळण घेत होती हें त्यांचे लक्षांत आलें नाहीं.

पोलिटिकल एजंटची हुकमत आपल्या राजावर चालते हें गांधींच्या समवयस्क मुलांना खपत नव्हतें. ते आपल्याला इंग्रजांना येथून कसें घालविता येईल याचा खल करीत. या चर्चेत असें निष्पन्न झालें कीं, इंग्रज

मांस खातो म्हणून आपणाहून बलिष्ठ आहे. त्याला घालवून द्यावयाचें तर आपण मांस खाऊन बलिष्ठ झालें पाहिजे. गांधी घराणें हें वैष्णव पंथी वैश्याचें आहे. महाराष्ट्रांतील कांही वैश्य मांसाहारी आहेत तसें गुजराथेंतील वैष्णव व वैश्य नाहीत. अशा घराण्यांत मांसाशन राहोच पण मांसाची गोष्ट घरांत बोललेली खपत नसे. अशी स्थिति असूनहि मित्रमंडळींतल्या चर्चेमुळें गांधी व त्यांचे वडील बधु मांसाशन करण्यास सिद्ध झाले. गांधी आपल्या आत्मकथेंत लिहितात कीं, प्रथम दिवशीं मला मास गोड लागले नाही व रात्रीं बकरें माझ्या पोटांत ओरडतें असा भास झाला. पुढे पुढे मांसाशनाच्या पार्ट्या होऊं लागल्या व त्याकरितां हातांतील सोन्याच्या कड्याचा तुकडा कापून तो ह्या मुलांनीं विकला

## उपरति

इंग्रजांना हाकलून देण्याकरितां मांसाशन करून बलिष्ठ होण्याचा संकल्प हळूहळू दृष्टिआड झाला. कुसंगतीमुळें दुर्व्यसनें या मुलांना लागू लागलीं. इतक्यांत गांधीच्या अंतरनादानें त्यांना इशारा दिला. तो मिळतांच गांधी सावध झाले व आपल्या वाईट कृत्यांचा विचार करूं लागले. विचार करतांना त्यांच्या सद्विवेकबुद्धीने त्यांना सांगितलें की, " तुला जर खरा पश्चात्ताप झाला असेल तर आपल्या वाईट कर्माचा पाढा वडिलांजवळ वाच व क्षमा माग. " गांधींनी विवेकबुद्धीचा संदेश शिरसावंद्य मानला व एक लांबलचक पत्र लिहून सर्व हकीकत वडिलांना सांगून टाकली. वडिलांच्या हातांत तें भयंकर पत्र पडलें तेव्हा ते आजारी होते. पत्र वाचतांच त्यांना इतका धक्का बसला कीं, त्यांचे तोंडांतून शब्द बाहेर पडेना. आपली मुले इतकी दुष्कृत्यें करतील याची त्यांस कल्पना होईना. त्यांचे डोळ्यांतून अश्रुधारा वाहिल्या. त्याचा परिणाम गांधीवर फार झाला. वडिलांनीं थोर मनानें आपल्याला क्षमा केली असें मानून आतां यापुढें दुसऱ्याच्या नादानें कांहीहि करावयाचें नाहीं, आपली सदसद्विवेक बुद्धि जें सांगेल त्याप्रमाणें वागावयाचें असा त्या कुमारवयांत जो संकल्प गांधींनीं केला तो पुढें शेवटपर्यंत पाळला.

वडिलांच्या शेवटच्या दुखण्यात गांधीनी त्यांची मनोभावें सेवा केली. वडिलाची सेवा करण्यांत त्यांना नेहमीं हौस वाटे. ह्याच हौसेनें पुढें व्यापक स्वरूप कसें घेतलें हें क्रमाक्रमानें आपल्या दृष्टीस पडेलच.

### बॅरिस्टर बनण्याचा बेत

वडिलांच्या मृत्यूनंतर दोन वर्षानीं गांधींची १८८७ मध्यें मॅट्रिक परीक्षा पास झाली. त्या वेळीं त्यांचे वय अठरा वर्षांचें होतें. वडील जरी दिवाणपदावर होते, तरी त्यांनीं अन्यायानें पैसा मिळविला नसल्यामुळें व हाताचे ते उदार असल्यामुळें त्यांच्या मृत्यूनंतर गांधी कुटुंब थोडें अडचणीत आलें. गांधी व त्यांचे वडील बंधु यांचीं वयें अल्प असल्यामुळें पोरबंदरची दिवाणगिरी यांस मिळण्याजोगी नव्हती. मग कुटुंबांत बराच खल होऊन गांधींनी विलायतेला जाऊन बॅरिस्टर होऊन यावें, म्हणजे वंशपरंपरेचे दिवाणपद गांधींना सहज मिळू शकेल, हा विचार घरांतील मंडळींना पसंत पडला. विलायतेच्या प्रवासाच्या खर्चाची सोय गांधींच्या वडील बंधूनी कशीबशी केली. पण गांधींची आई म्हणाली "विलायतेला मुलगा गेला तर तो बिघडेल, व्यसनांत पडेल. एखादी मडम बायको करून आणील." तिची ही भीति सकारण होती. तरुण मुलें विलायतेला जाऊन बिघडल्याचीं उदाहरणें तिनें ऐकलीं व पाहिली होतीं. आईच्या मनाविरुद्ध कांहीं करावयाला गांधी तयार नव्हते. शेवटीं मांसाशन व तरुण स्त्रियांचा स्नेह न करण्याची शपथ गांधींनीं जेव्हां घेतली तेव्हां त्यांना विलायतेला जाण्याची परवानगी मिळाली.

गांधी विलायतेला जाण्यास १८८८ सालीं निघाले. त्या वेळीं त्यांचें वय अवघें १९ वर्षांचें होतें. आपली माता, बंधु, कुटुंब सोडून हजारों मैल दूर असलेल्या प्रदेशांत दीर्घकालपर्यंत राहण्यास जाणें यास बरेंच मानसिक धैर्य लागतें. तें गांधींच्या अंगी असल्यामुळें आपल्या सर्व कोमल भावना आवरून त्यांनीं बोटींत पाऊल ठेवलें.

**पाथेय**

गांधी विलायतेला ज्या वेळीं निघाले त्या वेळीं त्यांचे जवळ मातेनें कोणचे खाद्यपदार्थ तयार करून दिले होते याची आठवण गांधींनीं आत्मचरित्रांत दिलेली नाहीं. कदाचित् खुशखुशीत गाठी शेव, पोरबंदरचे पेढे, काठेवाडी लोकांस विशेष आवडणारीं विविध लोणचीं, करंड्यांत भरून त्यांचे बरोबर देण्यांत आलीं असतील. हे पदार्थ फार तर आठपंधरा दिवस पुरले असतील पण तीन वर्षे जें पाथेय त्यांना पुरलें, जें त्यांच्या भावी पवित्र जीवनाचा आधार ठरलें तें पाथेय निराळेंच होतें, नाही का?

---

# ३. इंग्लंडची यात्रा (१८८८ ते १८९१)

**अपरिचित वातावरण**

मोहनदास गांधी हे अगदीं अल्प वयांत इंग्लंडला एकटे जावयास निघाले होते. त्यांना घेऊन जाणाऱ्या बोटींत देशी लोक फारच थोडे. सर्वच गोरे लोक. त्यांच्या रीतिभाती निराळ्या, खाणेंपिणें निराळें, भाषेची सुद्धां अडचण. आपण इंग्रजी जरी शिकलेलों असलों तरी इंग्लिश मनुष्याशीं बोलतांना त्याचें तें अस्पष्ट तोंडांतल्या तोंडांतलें बोलणें प्रथम आपल्याला कळत नाहीं. बोटींतले पहिले पहिले दिवस हिंदी माणसाला फारच कंटाळवाणें जातात. वर आकाश व खालीं पाणी याशिवाय दुसरें कांहीं पहिल्या सहा दिवसांत दिसत नाहीं. कोलंबसाचे खलाशी दोन महिने प्रवास केल्यावर जमीन जमीन म्हणून कां आक्रोश करीत होते याची कल्पना मुंबईहून एडनचा प्रवास करीत असतां मनुष्याला होते.

बोटीतील पहिले दिवस जरी कंटाळवाणें वाटले तरी पुढे पुढे ती उदासीनता राहात नाही. इंग्लिश प्रवासी काही दिवसांनीं हिंदी मनुष्याशी मोकळेपणानें वागू लागतात. त्याला आपल्यांत खेळायला घेतात. कांहीतरी थट्टामस्करी करून त्याची उदासीनता घालविनात. यामुळें हिंदी मनुष्याला पुढचा प्रवास हळूहळू सुखप्रद होऊं लागतो. तसा तरुण मोहनदासांना वाटला असल्यास नवल नाहीं.

**न्यूनगंड**

हिंदी माणूस इंग्रजांच्या गुलामगिरीत वाढल्यामुळें त्यांच्यांत अनेक न्यूनगंड उत्पन्न झालेले असतात. म्हणून इंग्लंडमध्यें पोंचल्यावर हिंदी मनुष्याचीं पहिलीं पहिलीं पावलें भीतभीतच पडतात. हें चुकेल का तें चुकेल हा विचार तो सतत करीत असतो. आणि मग आपली बाजू सजून दिसावी म्हणून भलभलत्या खर्चाच्या गोष्टी तो करतो. मोहनदासचें पहिल्या प्रथम असेंच झालें. प्रथम ते ताजमहालसारख्या फॅशनेबल हॉटेलमध्यें उतरले. उंची पोषाख खरेदी केला. सफाईदार बोलतां यावें म्हणून वक्तृत्वसंवर्धक वर्गात नांव घातलें. इंग्लिश स्त्रीपुरुषांत महज मिसळतां यावें म्हणून मोठी फी देऊन नृत्य शिकण्याकरिता प्रयत्न केला. या सर्व मोठ्या खर्चाच्या बाबी होत्या पण गांधीजवळ इतका खर्च झेपण्यासारखा पैसा होता कुठें? बंधूंनीं घरचे दागिनें विकून व काही कर्ज काढून पैसा उभा केला होता. मोहनदास लवकरच भानावर आला. त्याचे ध्यानात आले की, सर्वच इंग्रज कांही श्रीमंत नाहीत त्याच्यांतहि गरीब कुटुबें आहेत. शिवाय बॅरिस्टरीच्या अभ्यासासाठी वरील गोष्टींची गरज मुळीच नाही. म्हणून श्रीमंती हॉटेल सोडून गरीब इंग्रज कुटुबांत तो राहण्यास गेला. पण ही बुद्धि पुष्कळ हिंदी तरुणांस सुचत नाही व मग ते अनेक मोहजाळ्यांत सांपडतात व आईबापांना दुःख देण्यास कारणीभूत होतात. परदेशांत मुलाला पाठवितांना त्याच्या तैल-बुद्धीचा नुसता विचार करून भागत नाहीं, बृहस्पतीच्या कचाप्रमाणें तो खंबीर मनाचा, कार्यनिष्ठ आहे की नाहीं हें पाहिलें पाहिजे. शिवाय

परदेशांत गेल्यावर तरुण मुलांना मार्गदर्शन करण्याला, त्यांना वळण लावण्याला आस्थेचें कोणी नसतें यामुळें परदेशी गेलेले तरुण वाममार्गानें गेले असल्यास नवल नाहीं. यासंबंधांत इंग्लिश लोक किती दक्ष असतात हें पाहण्याजोगें आहे. १९३२ सालीं इंग्लंडहून एक क्रिकेट संघ जार्डिन नांवाच्या कुशल व दक्ष नायकाच्या नेतृत्वाखाली आला होता. या क्रिकेट संघांतील खेळाडू अगदीं कांहीं कुकुली बाळें नव्हतीं. तरी संघनायक आपल्या संघांतील खेळाडू खातात काय, पितात काय, वेळेवर झोपतात की नाहीं हें बारकाईनें पाहात असे. त्याला उत्कृष्ट हिंदी क्रिकेटपटूंशीं सामना द्यावयाचा होता. तेव्हां आपल्या संघांतील लोकांची प्रकृति निकोप राखणें हें संघनायकाचें काम होतें तें जार्डिन दक्षतेनें करीत होता व त्याची शिस्त इंग्रज खेळाडू—नागरिक स्वातंत्र्याची सबब पुढें न करितां—आनंदानें पाळीत होते. असो.

**मोहाचा दुसरा खंदक**

फॅशनेबल जन्टल्मन होण्याच्या सकटातून मोहनदास पार पडतात न पडतात तोंच दुसरे संकट त्याचे पुढें उभें राहिलें. तरुण गाधी कांही प्रसंगाने ख्रिस्ती मिशनरीच्या सहवासांत आले. हे लोक उदार मनाचे, शुद्ध आचरणाचे व प्रेमळ वृत्तीचे होते. त्यांचा सहवास मानसिक उन्नतीला पोषक असाच मोहनदासला वाटला. त्यांनी या मित्रांच्या साहाय्यानें बायबलचा चागला अभ्यास केला. बायबलची साधी, सोपी, हृदयाचा एकदम ठाव घेणारी इंग्रजी भाषा गांधीना फारच आवडली व त्याहीपेक्षां उदात्त विचारानें भरलेले गिरी प्रवचनें वाचून तर ते मोहित झाले. तरुण गांधींना बायबल आवडलेलें पाहून त्यांचे मिशनरी मित्र म्हणू लागले "गांधी तुमची निष्पाप, सरळ, श्रद्धाळू वृत्ति पाहून तुम्हां ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेण्यास योग्य आहांत असें आम्हांला वाटतें. तुम्हीं ख्रिस्ती होऊन प्रभु येशूवर विश्वास टाकलात कीं तो तुम्हांला सर्व पापापासून मुक्त करील." गांधी हे सर्व आकर्षक बोलणें ऐकून घेत. मित्रांच्या भाषणावर किती विश्वास ठेवावा याची कल्पना लहानपणच्या प्रसंगानें त्यांना आली होती. विचार करून उत्तर

देईन असें ते आपल्या मित्रांना सांगत. पुढें ख्रिस्ती होण्याबद्दल त्यांचा तगादा लागला तेव्हां त्यांनीं त्यांना स्पष्ट सांगून टाकलें कीं, "मी ज्या धर्मात **ल्हानाचा मोठा झालों तो धर्मच माझा उद्धार करण्यास समर्थ आहे.** भगवान् येशूप्रमाणेंच भगवान् श्रीकृष्ण आम्हांला गीतेंत आश्वासन देतो आहे कीं, मजला शरण ये, मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन, तेव्हां माझा धर्म न सोडतां तुमच्या बायबलचा मी आदर करूं शकतों." या सुस्पष्ट, निर्भीड उत्तरानें ते मिशनरी थंडच पडले असल्यास नवल नाहीं. गांधी म्हणतात ही बुद्धि मला रामानें दिली. मी तर कमजोर बालक होतों पण राम माझा पाठीराखा होता

**मोहाचा तिसरा खंदक**

इंग्लंडमध्यें तरुण स्त्री-पुरुष मोकळेपणाने समाजांत मिसळतात. सामाजिक संमेलनें, भोजनप्रसंग या निमित्तानें तरुण-तरुणीच्या ओळखी होऊन त्यांचे विवाह ठरतात. अशा ओळखी करून देण्याचे कामांत पोक्त स्त्री-पुरुष भाग घेतात. दुसरी एक गोष्ट परदेशांत आढळते ती ही कीं, विवाहाचे बाबतींत वर्ण, जात अगर धर्म आड येत नाहीं. तरुण-तरुणींचीं मनें जमलीं कीं, विवाह होऊं शकतो. तरुण गांधीचा सरळ निष्पाप स्वभाव पाहून एका पोक्त बाईच्या मनांत आलें की, आपल्या ओळखीच्या एका सुशील मुलीचा विवाह गांधीबरोबर करून द्यावा. म्हणून तिनें दर रविवारी गांधींना व त्या मुलीला आपल्या घरी जेवणास बोलवण्याचा परिपाठ पाडला. गांधींना प्रथम त्या मुलीचें आकर्षण वाटलें पण लवकरच ते भानावर आले. आपण आईला वचन काय दिलें होतें याची त्यांस आठवण झाली. दुसरी गोष्ट म्हणजे कस्तुरबाशी आपण विवाहबद्ध झालों आहों, तुला अंतर देणार नाहीं अशी विवाहाचे वेळी आपण शपथ घेतली आहे वगैरे गोष्टी त्यांना आठवल्या व त्यांनीं लगेच त्या पोक्त बाईला पत्रानें कळविलें कीं, "माझा विवाह झाला आहे ही गोष्ट आपण ध्यानांत घेऊन नंतर मला भोजनाचें निमंत्रण द्यावें. त्या तरुण मैत्रिणीची प्रतारणा करण्याची माझी इच्छा नाहीं."

### संस्काराचें बल

असें पत्र लिहिण्याला जें मानसिक सामर्थ्य लागतें तें गांधींनी या कालांत मिळविलें होतें असें दिसतें. आईजवळ मद्य, मांससेवन न करण्याची शपथ गांधींनीं जी घेतली होती ती इंग्लंडमध्यें पाळणें कठिण होतें. महाराष्ट्राच्या बहुतेक खाद्यपदार्थांत तिखट जसें मिसळलेलें असतें त्याचप्रमाणें पाश्चात्य भोजनांतील बहुतेक पदार्थात मांसाचा भाग असतो. यामुळें शाकाहारी मनुष्याची पदोपदीं अडचण होते. गांधींनीं या सर्व अडचणींना तोंड दिले. ते स्वतःचा स्वयंपाक स्वतःच करूं लागले. त्यांना कष्ट होत होते पण वचन पाळण्याकरितां ते सर्व त्यांनीं आनंदानें सोसले. मिस्टर गांधींचे महात्मा गांधी एका दिवसांत झाले नाहींत. अनेक दिवस त्यांनीं आपल्या मनाला शिस्त लावून घेऊन आपली संयमशक्ति कल्पनातीत वाढविली होती व तिनेंच त्यांना पुढें महात्मा बनविलें. ही शिस्त लावून घेण्याची जी बुद्धि झाली त्याचें कारण त्यांची सत्यप्रीति होय. हा गुण त्यांना मातापितरांकडून मिळाला होता. धर्मनिष्ठा, पापभीरुपणा, सत्यप्रतिज्ञा ह्या गोष्टींचे पाथेय बरोबर घेऊन ते इंग्लंडमध्यें आले होते; यामुळेंच ते अनेक अनिष्ट प्रसंगातून निभावले.

### अभ्यासाची तत्त्वग्राही पद्धत

गांधींनीं आत्मचरित्रांत लिहिलें आहे की, मी शाळेंत कधीच चमकलों नाहीं. मी अत्यंत लाजाळू, मागासलेला असा असे. याचा अर्थ असा नव्हता कीं, गांधी अभ्यासच करीत नसत. लहानपणापासून अभ्यासाचा त्यांनीं कंटाळा कधींच केला नाहीं. जो अभ्यास करावयाचा तो मन लावून विषयाचें मर्म समजून घेण्याच्या बुद्धीनें करावयाचा अशी त्यांची पद्धत असे. परीक्षेंत चमकावयाला जी एक विशिष्ट कला हवी असते ती मात्र त्यांचेजवळ नव्हती. विलायतेला गेल्यावर त्यांनीं कायद्याचा अभ्यास मन लावून तत्त्वग्राही बुद्धीनें केला. बॅरिस्टरच्या परीक्षेला जे कायदे असतात त्यांतील पुष्कळसे कायदे इंग्लंडच्याच न्यायालयांत उपयोगी पडतात, त्यांचा हिंदुस्थानांतल्या

कोर्टात काहींएक उपयोग नसतो. पण फौजदारी व दिवाणी कायद्याची मूलतत्त्वे, पुराव्याच्या कायद्याचें सूक्ष्म ज्ञान, कायद्याचा इतिहास याच्या अभ्यासाने मनुष्याचे बुद्धीस व्यापकपणा येऊन ती कोणत्याहि कायद्याचे आकलन करण्यास समर्थ होते. यामुळें विलायतचा हुशार बॅरिस्टर हिंदुस्थानांतील कायदे चटकन आकलन करून यशस्वी होतो. विलायतेंत इकडच्याप्रमाणें परीक्षा कठिण नसतात तुम्हाला विषयाचे तत्त्व समजलें आहे कीं नाहीं हे फक्त पाहतात विद्यार्थ्यांचा छळ करण्याकडे परीक्षकांची बुद्धि नसते निकडील लॉ कॉलेजाना 'इन्स ऑफ धि कोर्ट' म्हणतात. येथें विद्यार्थ्यांना जेवण मिळते. जेवण्याच्या वेळीं कायदेपंडित कायद्यासंबंधीं व्याख्यानें देतात. यावरून लोकांची अशी समजूत झालेली आहे कीं, जेवणें झोडली की बॅरिस्टर होतो. पण तशी वस्तुस्थिति नाही बॅरिस्टर होण्याला अभ्यास चांगलाच करावा लागतो व तो गांधीनीं मन लावून केला, त्याचे मर्म समजून केला, म्हणूनच पुढें ते आफ्रिकेंत यशस्वी बॅरिस्टर झाले. गांधीची बुद्धि कायद्याचें मर्म कसें चटकन् ग्रहण करू शकत असे याचे एक उदाहरण सांगण्याजोगें आहे

कॉंग्रेसने १९३७ साली कौन्सिलात शिरण्याचा निर्णय घेतला त्या वेळीं गांधी सेवा संघाच्या बैठकींत एकाने शंका काढली की, विधिमंडळांतल्या प्रत्येक सभासदाला राजनिष्ठेची शपथ घ्यावी लागते. व कॉंग्रेसला तर इंग्रजी राज्य संपुष्टांत आणावयाचे आहे तेव्हा इंग्रजी राज्याशीं एकनिष्ठ कसें राहता येईल. शपथ न घ्यावी तर विधिमंडळांत असता येत नाही व शपथ घ्यावी तर इंग्लंडच्या विरुद्ध चळवळ करितां येत नाही. तेव्हा काय करावें? गांधी आता हा पेंच कसा सोडवितात हें लोक आतुरतेनें पाहूं लागले. गांधींनीं शंका शांतपणें ऐकून घेतली व म्हणाले राजनिष्ठेच्या शपथेचा मसुदा मला दाखवा. चटकन एकानें तो गांधींच्या हातीं दिला. गांधींनीं बारकाईनें तो एकदां दोनदां वाचला त्या वेळीं त्यांची मुद्रा पाहण्यासारखी होती. आपल्या बुद्धीचे सर्व किरण एकत्रित करून त्या शपथेंतील शब्दसमूहावर ते पाडतां आहेत असें वाटलें.

वस्तूवर 'क्ष' किरण पाडले कीं, ते वस्तूच्या हृदयांत जाऊन जसे घुसतात त्याप्रमाणें शपथेच्या शब्दांचें त्यांनीं पांच मिनिटांत मर्म ध्यानांत घेतलें. त्यानंतर त्यांची मुद्रा सौम्य झाली. ते शंका घेणारास म्हणाले, " हा शपथेचा मसुदा तुम्हीं आम्हीं तयार केलेला नाहीं. इंग्रजांनीं तो तयार केला आहे. तेव्हां या **शपथेचा अर्थ इंग्रज कसा करतो तें पाहिलें पाहिजे**. पार्लमेंटमध्यें जी शपथ घेतात त्या शपथेबरहुकूम ही आहे. तेथें राजनिष्ठेची शपथ घेऊन राजपद काढून टाकावें असा ठराव आणतां येतो व त्याकरितां चळवळहि करितां येते. त्याचप्रमाणें आपल्यालाहि करितां येईल." गांधींनीं ही दृष्टि दिल्यावर सभासदांना त्यांच्या मर्मग्राही बुद्धीचें कौतुक वाटलें.

इंग्लंडांत अभ्यास पुरा करून १८९१ सालीं परीक्षा उत्तीर्ण झाल्याबरोबर गांधी बोटींत बसून हिंदुस्थानांत यावयास निघाले. इंग्लंडला जातांना ज्याप्रमाणें कांहीं कुलसंस्कारांचें पाथेय त्यांनीं बरोबर नेलें होतें त्याप्रमाणें इंग्लंडहून परत येतांना त्यांनीं कोणत्या संस्काराच्या चिजा आपल्या बांधवाकरितां आणल्या हें आपण आतां पाहूं.

**इंग्लंडचे संस्कार**

हिंदी मनुष्य इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरला कीं, तेथील तीं माणसांची व वाहनांची गर्दी पाहून तो क्षणभर गोंधळतो, चार दिवस तो लंडनमध्यें राहिला म्हणजे स्वस्थ मनानें इकडे तिकडे पाहूं शकतो. त्याला प्रथम आश्चर्यचकित करणारी गोष्ट म्हणजे सार्वजनिक रस्ते, इमारती, बगीचे यांमध्यें आढळून येणारी स्वच्छता. ही स्वच्छता राखण्यास तेथील म्यु. कमिटयांचे नोकर जितकी काळजी घेतात तितकी **सामान्य नागरिकहि काळजी घेतात**. आपल्याकडील नागरिकांप्रमाणें तेथील नागरिक रस्त्यावर केरकचरा टाकणार नाहींत. एवढेंच नव्हे तर, वाटेल तेथें थुंकणार नाहींत. खाल्लेल्या पदार्थांचे कागद बागेंतील हिरवळीवर कोणी टाकून उठणार नाही. घराइतर्कीच सार्वजनिक रस्त्यांची जिकडे तिकडे काळजी घेतात. हें पाहून हिंदी बांधवांनीं असेंच वागावें असें त्यांचे मनांत येतें. सार्वजनिक स्वच्छतेइतका

नियमितपणावर तेथें भर दिला जातो. कोणतेंहि काम ठरलेल्या वेळीं सुरू होतें व ठरलेल्या वेळीं समाप्त होतें. यामुळें कार्याचा चटकन् उरक पडतो. तिकडे घडयाळ ही चीज दागिन्यासारखी, अवयवांचें भूषण म्हणून लोक वापरीत नाहींत तर नियमित जीवनाला आवश्यक म्हणून जवळ ठेवतात. इंग्रजांचा नियमितपणा पाहिल्यावर आपलें अनियमित जीवन हिंदी प्रवाशाच्या नजरेसमोर येतें व मग त्याला आपल्या हिंदी जीवनाची लाज वाटते. नियमितपणाइतकाच महत्त्वाचा त्या लोकांचा दुसरा गुण म्हटला म्हणजे शरीरश्रम करण्याची हौस. आपल्या इकडे कामाला हात न लावणें हें श्रीमंतीचें, वैभवाचें, चिन्ह समजलें जातें. तिकडचे श्रीमंत लोक आपली कपडयाची पेटी हातांत घेऊन चालत स्टेशनमध्यें जाण्यास लाजत नाहींत, घरीं दारीं नोकरांवर विसबून राहात नाहींत. तेथील स्त्रिया घरांतील कामांत चूर झालेल्या आढळतील. हें पाहिल्यावर हिंदी माणसास वाटतें कीं, मोठेपणाच्या आपल्या कल्पना मूर्खपणाच्या आहेत. शरीरश्रमाची ज्याप्रमाणें तिकडच्या लोकांना लाज वाटत नाहीं, त्याप्रमाणें तिकडे नोकर चाकरांना व गरिबांना तुच्छतेनें वागवीत नाहीत. अरे, अरे कोणी कोणाला म्हणणार नाहीं. सर्वत्र तुम्ही या सर्वनामाचा उपयोग संभाषणांतून केलेला आढळेल. आणखी एक गोष्ट हिंदी मनुष्याचे त्या काळांत विशेष लक्षांत येई कीं, तिकडील स्त्रिया पुरुषाच्या बरोबरीनें सार्वजनिक कामांत भाग घेतात व आपले विशेष गुण प्रकट करतात. गांधींच्या तरुणपणीं हिंदुस्थानांतील मध्यम वर्गांतील स्त्रियांचें जीवन चूल व मूल या दोन गोष्टींनीं मर्यादित झालेलें होतें.

आपण पन्नास साठ वर्षापूर्वीच्या कालाचा विचार करीत आहों. आज हिंदी जीवनांत अधिक नियमितपणा, अधिक समता, व स्त्रियांना अधिक स्वातंत्र्याचा लाभ मिळालेला दिसतो. तशी स्थिति गांधींच्या तरुणपणीं नव्हती. गांधी हिंदुस्थानांत इंग्लंडहून परत आले ते इंग्रजांचे वर उल्लेखिलेले गुण घेऊन आले. इंग्लंडला गेलेल्या इतर प्रवाशांत व गांधींमध्यें जो फरक आहे तो हा कीं, इतरांचे संस्कार कांहीं महिनेच टिकले पण

तेथील जीवनाचे गांधींवर जे संस्कार झाले ते त्यांनी टिकवून वाढविले. इतकेंच नाही तर ते गुण आपल्या देशबांधवांत उतरविण्याचा त्यांनीं शेवट-पर्यंत उद्योग केला. गांधीनी पुढें केलेल्या अनेक उद्योगात वरील संस्कार प्रामुख्यानें कसे आढळून आले हें पुढे क्रमाक्रमाने आपणांस दिसून येईल.

पूर्वी शिष्यानें गुरुगृही विद्यासंपादन केल्यावर गुरु त्यास तीर्थयात्रा करण्यास पाठवीत. तीर्थयात्रा पायी कराव्या लागल्यामुळे तरुण मनुष्यास जगाच्या व्यवहाराचे ज्ञान उत्तम होई, त्याचे विचारास व्यापकता येई पण कालांतरानें ही चांगली प्रथा मागे पडली व वृद्धापकालांत तीर्थयात्रा लोक करूं लागले. यामुळे आपल्या लोकात संकुचित भाव उत्पन्न होऊन सार्वजनिक जीवन अनुदार झाले. गाधीनी तरुणपणींच विलायतची यात्रा केल्यामुळे त्यांच्या बुद्धीला व्यापकपणा कसा आला हे त्यांच्या पुढील चरित्रावरून दिसून येईल. आमच्या महाराष्ट्रीय पुढाऱ्याना युरोपच्या यात्रेचा लाभ जर तरुणपणी झाला असता तर महाराष्ट्रीय सार्वजनिक जीवन अधिक उदार बुद्धीचें झाले असतें असे अनेक लोकाचे मत आहे. परदेशगमनाचा लाभ गाधीना तरी मिळाला ही देशाच्या फायद्याचीच गोष्ट झाली यांत संशय नाही.



# ४. आगमन निर्गमन

## पहिला आघात

तीन वर्षें स्वबांधवांपासून दूर गेलेला तरुण विद्या संपादन करून घरीं यावयास निघतो त्या वेळीं त्याच्या भावना किती तरी उल्हासित होतात. तीन वर्षे तीन हजार मैल अशा दूर देशांत जाऊन राहिलेल्या मनुष्याची गोष्ट कशाला ? सहा महिने तुरुंगांत गेलेल्या मनुष्याचीहि वृत्ति सुटकेच्या दिवशीं विशेष उल्हासित होते. तशी स्थिति गांधींची झाली असल्यास नवल नाहीं. हिंदुस्थानचा किनारा दुरून दिसूं लागला त्याच वेळी समुद्रात वादळ उत्पन्न होऊन त्याच्या लाटा जोरानें उसळू लागल्या. पुढें वाढून ठेवलेल्या संकटाचें पूर्वचिन्हच हें वादळ ठरलें. बंदरावर उतरल्यावर प्रथम आईचीच चौकशी गांधींनीं केली. तेव्हां त्यांना कळलें कीं, त्यांची मातोश्री कांहीं महिन्यांपूर्वींच वारली होती. गुजराथी लोकांत नातलगाच्या मृत्यूची वार्ता परस्थ बांधवांना त्या कालांत न कळविण्याची चाल होती. आपल्याला हें ऐकून आश्चर्य वाटतें नाहीं का ?

## दुसरा आघात

आईला आपण मिळविलेलें यश निवेदन करूं, व तिला दिलेल्या वचनाप्रमाणें आपण व्रतपालन केलें याबद्दल तिजकडून धन्यवाद घेऊं या आशेंत असतांना आईच्या मृत्यूची वार्ता ऐकून तरुण मातृभक्त गांधींना किती वाईट वाटलें असेल त्याची कल्पना मातृभक्त पुत्रांनाच होईल. आईच्या मृत्यूचें दुःख गांधी गिळताहेत तोंच ज्ञातिबांधवांनीं परदेशगमनाच्या पातकाबद्दल ज्ञाति बहिष्काराची धमकी दिली. आज अशा धमकीला कोणी जुमानीत नाहीं. पण गांधींच्या तरुणपणचा काळ निराळा होता. या काळांत महादेव गोविंद रानडे व लोकमान्य अशांसारख्या थोर लोकांना ज्ञातिबहि-

ष्काराच्या वादळापुढें नमतें घ्यावें लागलें होतें. गांधींनीं नाशकास जाऊन रामकुंडांत स्नान करून प्रायश्चित्त घेतलें, तेव्हां कुठें ज्ञातिबांधव शांत झाले असल्या संकुचित जगाला तोंड द्यावयाचें आहे ही गोष्ट गांधींना हिंदुस्थानांत उतरल्यावर कळली. आपल्या घरीं गेल्यावर मी ह्या सुधारणा करीन त्य करीन याचा विचार करणाऱ्या गांधींना कळलें कीं, सुधारणा करण्याचा संकल्प एकीकडे राहून इंग्लंडला गेल्याबद्दल उलट प्रायश्चित्त घ्यावें लागलें.

## धंद्यांतले प्रारंभींचे अनुभव

प्रायश्चित्त घेऊन गांधींनीं बॅरिस्टरीच्या धंद्याला आरंभ केला. राजकोटच्या लहान गांवांत जम बसेना म्हणून ते मुंबईला आले. तेथेंही लवकर त्यांस काम मिळेना. गांधींनीं या दिवसाचें वर्णन मोठ्या विनोदी भाषेंत केले आहे. बाहेर सुटाबुटाचा थाट ठेवावा लागे व घरांत प्रसंगविशेषीं पोळपाट लाटणें हातीं घ्यावें लागे. कारण खर्च मोठा व आवक मुळींच नाहीं अशी स्थिति. एकदां कर्मधर्मसंयोगानें त्यांना कांहीं काम मिळालें. गांधींच्या स्वभावाप्रमाणें त्यांनीं खटल्याची चांगली तयारी केली पण कोर्टांत उभे राहतांच त्यांची बोबडी वळली. एका सुभाषितकारानें म्हटलें आहे कीं, लढाईत पहिल्या प्रथम सामन्यास उभे राहतांना व सभेंत पहिलें भाषण करतांना कचरत नाहीं असा कोण आहे? लोकमान्य टिळक एवढे धीट ना पण केळकर आपल्या आठवणीत सांगतात कीं, टिळकांची पहिलीं भाषणें इतकी अडखळत व्हावयाचीं कीं, व्याख्यानाचा अर्धा वेळ अडखळण्यांतच जावयाचा असो. वकिलीचा कांहीं केल्या जम बसेना. पण गांधींचे वडील बंधु महाखटपटी. त्यांनीं आफ्रिकेंतल्या एका खटल्याचें काम भावाकरिता मिळवून आणलें. हा खटला वर्षभर चालणार होता. महिना हजार रुपये शिवाय जाण्यायेण्याचें पहिल्या वर्गाचें भाडें असा वर्षाचा करार ठरला. येथे जमत नाहीं तेव्हां आफ्रिकेंत जाऊन नशीव उदयास येतें कां पहावें म्हणून गांधी प्रथम एकटेच आफ्रिकेंत शेठ अबदुल्ला यांचे वकील म्हणून १८९३ मध्यें गले. या संबंधांत आपण एक गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे ती

ही कीं, आपल्या महाराष्ट्रीयांना आफ्रिका जितकी दूर, अपरिचित वाटते तितकी काठेवाडी व गुजराथी लोकांना वाटत नाहीं. अनेक वर्षांपासून गुजराथी लोक व्यापार करण्याकरितां आफ्रिकेंत जात येत असत. यामुळें अज्ञात प्रदेशांत आपण जात आहोंत असें गांधीना वाटलें नाहीं.

**सत्याचे प्रयोग**

गांधींनीं आपल्या आत्मचरित्राच्या ग्रंथास सत्याचे प्रयोग असे नांव दिलें आहे. ह्या सत्याचे प्रयोगास खरी सुरुवात आफ्रिकेंत गेल्यावरच झालेली आहे. गांधी आपणा स्वतःस सत्याचा संशोधक असें म्हणवीत व आपल्या अनेक उद्योगांस ते सत्यशोधनार्थ केलेले प्रयोग असें नांव देत. आपण त्यांचें यापुढील जीवन याच दृष्टीनें अवलोकन करूं म्हणजे त्यांच्या गूढ वाटणाऱ्या जीवनावर प्रकाश पडेल.

**तपोभूमि**

आफ्रिकेंत राहणाऱ्या एका श्रीमान् व्यापाऱ्याच्या खटल्याचें काम पाहण्याकरितां गांधींना बोलावण्यांत आलें होतें. ते तेथें द्रव्य संपादन करण्याकरिता म्हणून गेले खरें पण ती भूमि गांधींच्या बाबतींत सोन्याहिऱ्याची खाण न ठरतां त्यांची तपोभूमि ठरली. येथेच गांधीनीं आपल्या आयुष्याला आध्यात्मिक वळण लावलें. या भूमीची आपण थोडी माहिती करून घेऊं म्हणजे गांधींच्या या प्रदेशांतील हालचालींवर चांगला प्रकाश पडेल.

आफ्रिका हें एक प्रचंड खंड आहे. याची लांबीरुंदी शेंकडोंनी नव्हे तर हजारों मैलांनीं मोजतां येईल. आपल्याकडे मध्य आफ्रिकेंतील शिद्दी लोक आलेले आहेत व त्यांच्या रंगावरून आफ्रिकेंतील सर्वच लोक काळे व सव प्रदेश उष्ण असा आपला समज झालेला आहे. पण आफ्रिकेचा दक्षिण भाग कांहींसा थंड व बराचसा समशीतोष्ण आहे. यामुळें युरोपिअन लोकांनीं दक्षिणेंत येऊन आपल्या वसाहती स्थापल्या. ह्या भागात इंग्रज, फरेंच व डच हे लोक आपआपले गट करून राहिले होते. केप कॉलनी व नाताळ नांवाच्या प्रदेशांत इंग्रज राहात. व जरा

उत्तरेच्या बाजूला डच लोकांनीं आपली वसाहत केली होती. या डच लोकांना बोअर ही दुसरी संज्ञा आहे. इंग्रज, फरेंच व डच हे कधींकधीं आपआपसांत भांडत व एकमेकांचा प्रदेश हिरावून घेत. इंग्रजानीं डचांची वसाहत जी ट्रान्सवाल ती लढून गिळंकृत केली. पण त्या वेळीं बोअर लोकांनीं इंग्रजांना आठवण राहील इतका मार दिला. यामुळें इंग्रजांनीं पुढें बोअर लोकांना "वसाहतीचें स्वराज्य" देऊन टाकलें. स्वराज्य मिळाल्या-वर इंग्रजांशीं कडवेपणानें लढणाऱ्या जनरल स्मट्स यांच्या हातांत ट्रान्सवालचा राज्यकारभार आला.

इंग्रजांची वसाहत जी "नाताळ" तिचें मुख्य शहर दरबान आहे. ट्रान्सवालची राजधानी प्रिटोरिआ आहे. याशिवाय ट्रान्सवालमध्यें जोहान्स-बर्ग नांवाचें दुसरें मोठें व्यापारी शहर आहे. गांधींचा प्रथम संबंध ज्या अबदुल्ला शेटशी आला त्यांच्या पेढ्या दरबान व प्रिटोरिआ या दोन शहरीं होत्या. यामुळें गांधींचा संबंध या दोन शहरांशीं जास्त आला. वाटेंत जोहा-न्सबर्ग हें शहर लागतें तेथेंहि गांधींना उतरावें लागे. नाताळ वसाहत इंग्र-जांची असल्यामुळें इंडियन लोकांना तेथें जो त्रास झाला त्याचें स्वरूप बोअर लोकांच्या वसाहतींत झालेल्या त्रासाच्या मानानें कमी उग्र असे. शिवाय ट्रान्सवालचा "भाग्य विधाता" जनरल स्मट्स् हा काळ्या लोकांचा द्वेष्टा, स्वभावानें हट्टी व क्रूर इतकेंच नाहीं तर कावेबाज व बोलांत बोल न राखणारा असा असल्यामुळें गांधींच्या अनेक गुणांची कसोटी ट्रान्सवालमध्येंच प्रथम लागली. असो.

### खटल्यांतलें अलौकिक यश

शेठ अबदुल्ला हे आफ्रिकेंत मोठे व्यापारी होते. त्यांचे नातेवाईक तय्यबजी शेठ यांचाहि व्यापार मोठा असे. या दोघांच्या पेढ्यांमध्यें बरेंच वर्षें व्यापारी देवघेव चालू होती. अनेक वर्षेंपर्यंत या दोघांनीं आपलें देणें घेणें पाहिलेंच नाहीं. शेवटीं त्यांना जेव्हां हिशेब करण्याची पाळी आली त्या वेळीं वचन चिठ्ठ्यावरून कुरबुरी सुरू झाल्या. आरोप प्रत्यारोप

होऊन एकमेकांची मनें बिनसलीं. शेवटीं दोघें कोर्टांत जाण्यास तयार झाले. अशा प्रसंगीं हिशेब नीट पाहून पुराव्याला उपयोगी पडणारे कागद जुळवून मोठ्या वकिलाला मदत करण्याचें काम गांधींकडे आलें. हा खटला बराच गुंतागुंतीचा होता. हजारों कागदपत्र पाहावे लागणार होते. गांधींनीं हें सर्व काम न कंटाळतां केलें. अनेक दिवसांनीं गांधींच्या ध्यानांत आलें कीं, आपल्या अशीलाचे तय्यबजो शेठकडे चार लाखांचें घेणें निघतें. हा खटला जर कोर्टांत गेला तर दोन्ही पक्षकारांना अतोनात पैसा खर्च करावा लागेल. बॅरिस्टर लोकांची फी व सॉलिसिटरच्या ऑफिसचें बिल सारखें फुगत जाऊन शेवटीं दोघेहि ठार बुडतील, म्हणून गांधींनीं दोघांकडे जाऊन त्यांना सांगितलें कीं, तुम्हा दोघांच्या विश्वासांतला लवाद नेमा व त्याचे निर्णयाप्रमाणें चाला; नाहीं तर ठार बुडाल. दोघा पक्षकारांचीं मनें आतां शुद्ध राहिलीं नव्हतीं. यामुळें लवाद नेमून द्यावयास प्रथम ते तयार होईनात. पुढें तयार झाले. लवादाचा निकाल शेठ अबदुल्लाशेठच्या बाजूनें लागला. पण तय्यबजीशेठजवळ चार लाख रुपये एका रकमेनें द्यावयास तयार नव्हते. ते मोठ्या नेकीचे गृहस्थ होते, दिवाळें काढण्यापेक्षां त्यांनीं मरण पतकरलें असतें. त्यांच्या मनांत शेठ अबदुल्लाचें देणें देऊन टाकावें असेंच होतें पण त्यांना सवलतीचे हप्ते पाहिजे होते. हे हप्ते मिळवून देतांना गांधींना अबदुल्लाशेठची फार समजूत घालावी लागली. (बिनसलेलीं मनें सांधणें फार कठिण असतें. एक वेळ फुटके मोतीं सांधणें शक्य होईल पण तुटलेली मनें जोडणें विधात्याला सुद्धां कठिण जाईल.) पण तें गांधींना शेवटीं जमलें. दोन्ही पक्षकारांत सलोखा झाला यामुळें त्यांच्या मित्रांनाहि कल्पनातीत आनंद झाला.

गांधी आपल्या आत्मचरित्रांत म्हणतात या खटल्यानें मला जितकें द्रव्य दिलें त्याच्यापेक्षां अनेक पटीनें मूल्यवान असा अनुभव मिळाला. कोर्टाच्या कामाची माहिती झाली, शिवाय बाहेरून मनुष्य कितीहि हेकट व कठोर दिसत असला तरी त्यांच्या मनाच्या खोल भागांत उदारता व

प्रेम बसत असतातच. मात्र आपल्याला त्याची ठाव घेण्याची हिंमत व कला अवगत असली पाहिजे.

गाधीनी जवळ जवळ वीस वर्षे वकिलीचा धंदा केला. पुढें पुढें त्यांना तीस ते चाळीस हजार रुपये दरमहा मिळू लागले होते. त्यांच्याकडे आलेले बहुतेक दावे त्यांनीं कोर्टांत जाऊं न देतां खाजगी रीतीनें लवाद नेमून निकालांत काढले. यामुळें पक्षकारांना झटपट व थोडक्या खर्चात न्याय मिळे. त्यांची मनें बिनसत नसत व खोटे पुरावे तयार करण्याचा मोह पक्षकारांना होत नसे अशा रीतीनें पुष्कळ लोक नैतिक अधःपातापासून बचावत.

मूळचा वकिलीचा धंदा जरी उच्च भावनेनें प्रेरित होऊन निघालेला असला तरी आज काल या धंद्याला मोठें हिडीस स्वरूप आलेलें आहे. साक्षीदारांना खोटें बोलण्यास पढविणे यांतच वकील लोक कृतार्थता मानूं लागले आहेत. अशा या विपरीत कालांत गांधीनीं आपल्या तरुण वयांत या धंद्याला उत्तम स्वरूप देण्याचा जो प्रयत्न केला तोहि एक सत्याचा प्रयोग होता. या प्रयोगांत गांधीना हें दिसलें की, पुष्कळसे खटले गैरसमजानें उत्पन्न झालेले असतात. स्वार्थसाधु लोक आगीत तेल टाकून आपली पोळी भाजून घेतात. मनुष्य एकदा हट्टास पेटला म्हणजे मग तो नीति, न्याय सर्व बाजूला ठेवतो व जमेल त्या मार्गानें प्रतिपक्षाची जिरवण्याचा प्रयत्न करतो. अशा वेळीं पक्षकारांना कोर्टात जाऊं न देतां त्यांना शांत केलें, त्यांचें हित कशांत आहे हें दाखविलें तर माणूस देवाणघेवाणीला तयार होतो. हें सर्व घडवून आणण्याला मध्यस्थाच्या अंतःकरणांत पक्षकाराचें हित करण्याची बुद्धि हवी. कळकळीनें कोणी पक्षकाराच्या हितार्थ खटपट करूं लागला तर तंटे लवकर तुटतात व पुढचे अनेक अनर्थ टळतात. म्हणून वकिलाजवळ कळकळ व सत्यप्रीति हवी. हें सत्य जर वकिलांनीं आपल्या हृदयांत ठसविलें तर जनतेची नैतिक पातळी उंच झाल्याशिवाय कशी राहील? गांधींना या सत्याचें दर्शन होतांच ते त्याला धरून वागले. त्यामुळें त्यांचा व्यावहारिक फायदा झाला नाहीं असें नाहीं पण हें लक्षांत कोण घेणार ?

# ५. कटु अनुभवांचे घोट

[गांधी ज्या कामाकरितां आफ्रिकेंत गेले त्या खटल्याची हकीकत संकलित करून मागच्या प्रकरणांत दिली आहे. ह्या प्रकरणांत ज्या प्रसंगांचें वर्णन केलें आहे ते प्रसंग गांधी आफ्रिकेच्या किनाऱ्यावर उतरल्यावर खटला निकालांत निघावयाचे पूर्वीं घडले आहेत. पण हे अनुभव असे आहेत कीं, त्यांचा संबंध आफ्रिकेंतील अनेक चळवळींच्या मुळाशीं पोहोंचतो. म्हणून हे अनुभव स्वतंत्र प्रकरणांत घेतले आहेत.]

**पहिला घोट**

तरुण मनुष्याला एखादी विश्वविद्यालयाची पदवी मिळाली कीं, त्याचें चालणें, बोलणें थोडेंसें ऐटीचें होऊं लागतें. त्यांत गांधी तर इंग्लंडहून आलेले तरुण बॅरिस्टर. त्यांना वाटलें आफ्रिकेच्या मागासलेल्या भागांत आपल्याला मोठें मानानें वागविलें जाईल. दरबानला उतरल्यावर तेथील कोर्टांत ते बंगाली पगडी, बूट, पँट घालून गेले. मॅजिस्ट्रेटनें सांगितलें " पगडी घालून तुम्हाला कोर्टांत बसतां येणार नाहीं."

गांधी म्हणाले " मी इंग्लिश बॅरिस्टर आहे." " तुम्ही बॅरिस्टर असा कीं कोणी असा येथें पगडी काढून बसा नाहीं तर चालते व्हा." असें कोर्टानें म्हणतांच गांधींनीं रागानें कोर्ट सोडलें व ते अबदुल्ला शेठकडे आले व कोर्टानें आपला अपमान कसा केला त्याची हकीकत त्यांनीं त्यांना थोडी चिडून सांगितली.

अबदुल्लाशेठ शांतपणें म्हणाले, " तुम्ही अजून तरुण आहांत. काळ्या लोकांना येथें किती अपमानानें वागविलें जातें याचा तुम्हांला अनुभव नाहीं. तुम्हीं आतां असें करा माझ्या मुख्य पेढीवर प्रिटोरियाला जा, तेथें तुम्हांला खटल्याचे कागद पाहावयास मिळतील. तें काम तुम्हांला कित्येक महिने पुरेल.

**फर्स्ट क्लास काळ्यांकरितां नाहीं**

दरबानहून प्रिटोरियाला जावयाचें म्हणजे कांहीं रेल्वेनें, कांहीं घोडयाच्या गाडीनें व कांहीं पुन्हां रेल्वेनें प्रवास करावा लागे. शेठ अबदुल्ला गांधींना म्हणाले "तुमचा बॅरिस्टरचा दर्जा मोठा आहे म्हणून मी तुम्हांला पहिल्या वर्गाचें तिकिट काढून द्यावयाला तयार आहे. पण तुम्ही काळे म्हणून तुम्हांला वरच्या वर्गांत बसूं देणार नाहींत. हें इंग्लंड नव्हे. तुम्ही आपले तिसऱ्या वर्गानें जा कसे." गांधींना हा विचार पटला नाहीं. त्यांनीं पहिल्या वर्गानेंच प्रवास करावयाचें ठरविलें. रेल्वे काळ्या लोकांना पहिल्या वर्गाचें तिकिट नाकारीत नसे म्हणून गांधी तिकिट काढून पहिल्या वर्गात जाऊन बसले. कांहीं वेळ प्रवास सुखानें झाला. नंतर एका रेल्वे अधिकाऱ्याच्या लक्षांत आलें कीं, एक काळा आदमी पहिल्या वर्गानें प्रवास करीत आहे. त्यानें गांधीना सांगितलें कीं, तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत जाऊन बसा. गांधींनीं आपलें पहिल्या वर्गाचें तिकिट त्याला दाखविलें. त्यावर तो म्हणाला, "तिकिट पहिल्या वर्गाचें असलें तरी तुला तिसऱ्या वर्गानेंच प्रवास केला पाहिजे." असें म्हणून त्यानें गांधींचें सामान प्लॅटफॉर्मवर फेंकून दिलें. गांधीनी डब्यांतून निघण्याचें नाकारलें तेव्हां त्यानें पोर्टर लोकांकडून त्यांना फरफर ओढून डब्याबाहेर काढलें. इतक्यांत गाडी निघून गेली. गांधींनी रेल्वे मॅनेजरला तार करून सर्व हकीकत कळवली, त्यानें आपल्या नोकराचीच बाजू घेतली. पण काय असेल तें असो मागाहून येणाऱ्या गाडींत पहिल्या वर्गानें प्रवास करितांना गांधींना कोणी अडथळा आणला नाही. गांधी सकाळी चार्लस् टाऊन या स्टेशनवर पोहोंचले, तेथून जोहान्सबर्गपर्यंत भाडयाच्या घोडयांच्या मोठया गाडयांतून प्रवास करावा लागला. या गाडीतून प्रवास करतांना गांधींना कल्पनातीत हाल सोसावे लागले. गाडीच्या गार्डनें कांहींतरी कुरापत काढून त्यांना शिव्या दिल्या, ठोशावर ठोसे दिले व गाडींतून ढकलून देण्याचा प्रयत्न केला. हें सर्व कां तर गांधी हे काळे असून गोऱ्यांबरोबर प्रवास करीत होते म्हणून. शेवटीं

गाडींतील स्त्री-पुरुषांस या काळ्या आदमीची दया आली आणि त्यांनीं गांधींचें रक्षण केलें. जोहान्सबर्ग येथून पुन्हां आगगाडींतूनच प्रिटोरियाला जावें लागलें. गांधीच्या स्वभावांत दुर्दमनीय असा निश्चय व नेट होता. इतका कटु अनुभव आला तरी त्यांनी पुढील प्रवास पहिल्या वर्गांतून करावयाचें ठरविलें. पुन्हां त्यांना रेल्वे गार्डाकडून अडथळा झाला. तो गांधींना तिसऱ्या क्लासमध्यें बस म्हणून सांगत असतां त्याच डब्यांत एक उदार वृत्तीचा गोरा इसम बसला होता, तो त्या गार्डाला म्हणाला, "कां रे त्याला त्रास देतोस, त्याचे जवळ फर्स्ट क्लासचें तिकिट आहे ना" यावर तो गार्ड त्या गोऱ्याला म्हणाला, "तुम्हाला हा सामी (काळा आदमी) जवळ बसलेला चालतो ?"

"हो चालतो" असें उत्तर गोऱ्या प्रवाशानें देतांच तो गार्ड चरफडत निघून गेला. मग गांधींचा प्रवास प्रिटोरियापर्यंत सुखानें झाला. प्रिटो-रियांत गेल्यावर काळ्या आदमीविरुद्ध असलेल्या कायद्यांची गांधींना हळूहळू कल्पना आली.

## हिंदी लोकांवरचे निर्बंध

ऑरेंज फरी स्टेट या नांवाच्या वसाहतींत हिंदी लोकांना व्यापार करतां येत नव्हता. हॉटेलमध्यें वाढपे, खटपटे म्हणून त्यांना राहतां येई पण प्रतिष्ठित धंद्याला बंदी होती. ट्रॅन्सवालच्या वसाहतीत प्रत्येक हिंदी मनुष्याला तीन पौंडांचा कर द्यावा लागे. ठरलेल्या जंगली विभागांतच त्यांना जमीन विकत घेता येत होती. त्यांना मतदानाचा हक्क ठेवलेला नव्हता. इतकेंच नाहीं तर हिंदी मनुष्यानी रस्त्याच्या फुटपाथवरून चालू नये व रात्रीं ९ च्या पुढें घरांतून बाहेर पडू नये असा निर्बंध होता. एक दिवस गांधी निर्बंध असलेल्या रस्त्यावरून जात असतां, त्यांना एका शिपायानें ढकलून दिलें व लाथांखालीं तुडविलें. इंग्लिश बॅरिस्टर असून ही अवस्था, मग सामान्य हिंदी मनुष्याचा पदोपदीं किती अपमान होत असेल याची कल्पना करावी

**अपमानाची मीमांसा**

गांधींनी हे सर्व अपमान मुकाट्यानें सहन केले. त्यांनीं पाहिलें की, सर्वसत्ताधारी सरकारच काळ्यांच्याविरुद्ध आहे तेव्हां एकट्या दुकट्याच्या तक्रारीला कोण विचारणार ? रस्त्यांत शिपायाच्या लाथा खाव्या लागणें हा एकट्याचा प्रश्न नाहीं, सर्व हिंदी लोकांच्या दुःखाचा प्रश्न आहे. दुसरी गोष्ट गांधीनी ध्यानांत घेतली ती ही की, काळ्या आदमीना गोरे वाईट रीतीनें वागवितात याचें कारण गोऱ्यांना वाटतें कीं, ह्या काळ्यांची लोकसंख्या वाढत आहे. आणखी त्यांना जर कां मताधिकार दिला तर उद्यां मिळालेल्या मताच्या जोरावर ते राज्यकर्ते होतील व आपल्याला एखादे वेळी वसाहतीतून हुसकून लावतील. तिसरी गोष्ट गोऱ्यांना भयप्रद वाटे ती ही की, **काळे व्यापारी गोऱ्यांना व्यापारी चढाओढींत माग**े टाकत आहेत व बगले खरेदी करीत आहेत. तेव्हां त्यांनीं कायदाच केला कीं, काळ्यांनी शहरात स्थावर करूंच नये व फूटपाथावरून गोऱ्यांच्या बरोबर चालूं नये. याशिवाय हिंदी लोकाविषयीं गोऱ्या लोकांना तिरस्कार वाटण्याचें कारण असें होतें कीं, जे हिंदी लोक आफ्रिकेंत गेले होते त्यापैकी, बरेचसे लोक खालच्या गणल्या गेलेल्या जातींतले होते. त्यांची राहणी गलिच्छ होती. कंजूषपणें राहात असल्यामुळें गोऱ्यांना ते आपणांजवळ यावे असें वाटत नसे. शिवाय हिंदी लोकांत सिंधी, पंजाबी,तामिळ अशा अनेक जाति होत्या. त्या आपापसांत भांडत व एकमेकांना हीन लेखीत. सुसंस्कृत माणसांची राहणी जशी असते तशी त्यांची नव्हती. या सर्व गोष्टी गांधींनी ध्यानांत घेतल्या. यांतून कसा मार्ग काढावा याचा विचार केल्यानंतर शेठ तय्यब हाजीखान या वजनदार व्यापाऱ्याच्या मदतीनें प्रिटोरियांतील हिंदी नागरिकांची एक सभा बोलावून त्यांच्या परिस्थितीची तेथें चर्चा केली.

**उपाय योजना**

गांधी म्हणाले ''आपण सर्व जण एकजुटीनें वागलों नाही तर यापुढें

आपला या देशांत निभाव लागणार नाहीं. गोरे लोक काळ्यांचा किती अपमान करतात हें तुम्ही पाहतांच, तेव्हां आपण आतां मी पंजाबी, मी तामिळी, मी मराठा, मी बंगाली असे भेद राखतां कामा नये. **हिंदी तेवढा एक** ही भावना आपण जागृत केली पाहिजे. दुसरी गोष्ट आपल्यापैंकी पुष्कळांची राहणी युरोपिअन लोकांच्या राहणीच्या मानानें गलिच्छ असते हें मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. स्वच्छतेच्या बाबतींत युरोपिअन लोकांनीं आपणांला नांवें ठेवतां कामा नये. अस्वच्छ राहणीमुळें आपणाला पुष्कळदां मान खालीं घालावी लागते. तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपणांपैकीं जे व्यापार करतात, त्यांनीं आपल्या धंद्यांत सचोटी राखण्याची काळजी घ्यावी. आपण जर सचोटीनें वागलों तर या देशांत आपला मान खात्रीनें वाढेल. आपण यापुढें वारंवार एकत्र जमलें पाहिजे. आपल्यावर जो अन्याय होईल त्याचा पद्धतशीरपणें प्रतिकार केला पाहिजे. विलग विलग राहून आपलें येथें निभावणार नाही वगैरे."

या परिषदेचा परिणाम चांगला झाला. हिंदी लोकांत सहकार्याची वृत्ति उत्पन्न झाली. त्यांना कोणी तरी पुढारी पाहिजेच होता. हिंदी लोकांत सुशिक्षित असे फारच थोडे लोक होते. गांधीसारखा बॅरिस्टर त्यांना पुढारी मिळाल्याबरोबर त्यांच्यांत नवचैतन्य उत्पन्न झालें.

### निरोप का निमंत्रण ?

गांधी आफ्रिकेंत गेले ते शेठ अबदुल्लाच्या खटल्याकरितां. खटल्याचें काम एक वर्षांत संपलें. तेव्हां ते परत यावयास निघाले. शेठ अबदुल्ला यांनीं त्यांना निरोप देण्याकरिता बऱ्याच हिंदी लोकांना बोलाविलें होतें. जेवण-खाण, गाणें, खेळ, भाषणें असे या निरोप समारंभाचें स्वरूप होतें. इतर मंडळी खेळांत गुंतलीं असतां गांधी तेथें पडलेलीं वर्तमानपत्रें चाळीत होते. एका वर्तमानपत्रांत हिंदी लोकांच्या मतदानाच्या हक्कासंबंधानें मजकूर होता तिकडे गांधींचें लक्ष गेलें. त्या बातमींत म्हटलें होतें कीं, नाताळ प्रांताच्या विधिमंडळांत हिंदी लोकांचा मतदानाचा हक्क हिरावून घेणारा एक कायदा

आला आहे व त्यावर चर्चा तेथें चालू होणार होती. गांधींना व हिंदी लोकांना यापूर्वी असा अनिष्ट कायदा होऊं घातल्याची कल्पना नव्हती. गांधींनीं शेठ अबदुल्ला यांना ती बातमी वाचून दाखविली. भोजनोत्तर या बातमीवर बरीच चर्चा झाली. अशा कायद्याला आपण संघटितपणें विरोध केला पाहिजे असें लोकमत तेथें प्रकट झालें. कोणी तरी सूचना केली कीं, गांधींनीं हिंदुस्थानांत परत न जातां ह्या दुष्ट कायद्याच्या निषेधार्थ चळवळ करण्यास मदत करावी. ही सूचना सर्व पाहुण्यांनीं एकमतानें उचलून धरली. शेठ अबदुल्ला पडले व्यवहारचतुर, त्यांनीं मंडळींना सांगितलें कीं, "तुम्ही रहा म्हणतां पण ते आहेत बॅरिस्टर, त्यांचा सल्ला जर तुम्हांला हवा तर त्यांच्या फीची व्यवस्था तुम्हांला केली पाहिजे." गांधीनीं तत्काळ सांगून टाकलें की, **सार्वजनिक कामाबद्दल मी फी घेणार नाहीं.** मी वकिलीचा धंदा स्वतंत्रपणें करून सार्वजनिक काम फुकट करीन. मग तेथल्या श्रीमंत व्यापाऱ्यांनीं सांगितलें कीं, आमची कोर्टकचेऱ्यांचीं कामें आम्ही गांधींनाच देऊं. झालें कांहींसें लोकाग्रहास्तव पण मुख्यतः अन्यायाचा प्रतिकार करण्याच्या स्वभावामुळें गांधींनीं तेथें राहण्याचें मान्य केलें. अशा रीतीनें निरोप द्यावयाला गेलेले लोक गांधींना निमंत्रणच देऊन घरीं गेले.

### पहिली चळवळ

म. गांधींनीं हिंदुस्थानांत आल्यावर प्रचंड चळवळी केल्या पण या चळवळींची पद्धत आफ्रिकेंत कराव्या लागलेल्या आंदोलनाचे वेळींच ठरली गेली. ती आपण आतांच समजावून घेतली तर पुढच्या चळवळींचे वेळीं गांधींचीं पाऊलें कशी पडणार याचा अंदाज आपल्याला सहज लागेल. आफ्रिकेंत गांधींनी चळवळीचें जें तंत्र तयार केलें त्या तंत्राबरहुकूम पुढील भव्य चळवळी केल्या. असो.

### स्वयंसेवक पथक

प्रिटोरियांत राहण्याचें ठरल्यावर मतदान हिरावून घेणाऱ्या बिलाला विरोध करण्याचा उद्योग गांधींनीं धडाक्यानें सुरू केला. सर्वसत्ताधारी

गोऱ्या लोकांविरुद्ध चळवळ करणें सोपें नव्हतें. प्रथम त्यांनीं स्वयंसेवकांची भरती करण्याकरितां सभा घेतली. या सभेंत सर्व जातींचे, धर्मांचे व पेशांचे लोक आले होते. स्वयंसेवकांची भरती सर्व धंद्यांतून झाली. नाताळच्या विधिमंडळांत कोणीं तरी असें विधान केलें कीं, ह्या कायद्याविरुद्ध हिंदी लोक ब्र काढीत नाहींत तेव्हां मतदानाचा हक्क उपभोगण्याला ते पात्रच नाहींत. गांधींनीं विधिमंडळाच्या अध्यक्षाला लगेच तार करून बिलावरील चर्चा तहकूब करावी अशी विनंती केली. तेव्हा दोन दिवसपर्यंत ती चर्चा पुढें ढकलली गेली. यानंतर लोकांच्या सहीचा अर्ज विधिमंडळापुढे गेला. या वेळीं भारतमंत्र्याच्या पदावर लॉर्ड रिपन होते. त्यांचेकडे हजारों लोकांच्या सहीचा तक्रारी अर्ज करण्याचें ठरलें. हें काम सोपें नव्हतें. खेडोंपाडीं हिंडावें लागणार होतें. पण लोकांनी हें सर्व केलें. कोणी पैसा, कोणीं वाहनें दिलीं, कोणी लेखन केलें तर कोणीं प्रचार केला. गांधोनीं या काळांत विश्रांति म्हणून घेतली नाहीं. या विषयावर जेवढें लिखाण प्रसिद्ध झालें होतें तें वाचून नंतर त्यांनीं तक्रारअर्ज तयार केला.

## पुढाऱ्याचा पाय पुढें हवा

वर्गणी दर महिन्याला पांच शिलिंग ठेवली होती. ती देण्याला थोडी बहुत कुरकुर दिसूं लागली. गांधीनीं स्वतः दरमहा एक पौंड देण्याचें जाहीर करतांच भराभर वर्गणी देऊं लागले. एक पौंड म्हणजे दहा रुपये दरमहा देणें गांधींना त्या वेळच्या त्यांच्या उत्पन्नाप्रमाणें पाहातां जरा जडच होतें. पण **पुढाऱ्यानें त्यागाचा धडा घालून दिल्याशिवाय अनुयायांत उत्साह उत्पन्न होत नाहीं.** टिळकांच्या काळी वर्गणीचा प्रश्न निघाला कीं जहाल मवाळ पुढारी कमींत कमी आंकडा भरीत. टिळक ज्याप्रमाणें कायद्याच्या सीमेवर जाऊन लढत त्याप्रमाणें त्यागाच्या वेळीं आपल्या शक्तीची परिसीमा गांठीत म्हणून तर त्यांचें कार्य यशस्वी होई. असो. सार्वजनिक कार्य करतांना हिशेबाची व्यवस्था अत्यंत चोख ठेवण्याचें गांधींचें पहिल्यापासून धोरण होतें. दुसरें बंधन त्यांनीं याबाबत आपल्या चळवळीवर घातलें होतें तें म्हणजे

उत्पन्नाप्रमाणेंच चळवळीचा खर्च ठेवावयाचा. देशहिताचें काम आहे म्हणून **कर्ज काढून चळवळ चालवावयाची नाहीं, हा नियम ते कटाक्षानें पाळीत.** या नियमानें त्यांच्या चळवळी निष्कर्जी व स्वावलंबी झाल्या.

**सामर्थ्य आहे चळवळीचें**

नाताळच्या हिंदी लोकांत जागृति केल्यावर गांधींनीं आपले गाऱ्हाणें इंग्लंड व हिंदुस्थानच्या सदरेवर मांडलें. नाताळ विधिमंडळाकडे केलेल्या अर्जाच्या नकला इंग्लंड व हिंदुस्थानमधील प्रसिद्ध लोक व लोकमत तयार करणाऱ्या वर्तमानपत्रांकडे शेंकडोंनीं पाठविल्या. त्याचा परिणाम असा झाला कीं, इंग्लंड व हिंदुस्थानमधील वजनदार पत्रांनीं हिंदी लोकांची बाजू उचलून धरली. हें घडवून आणतांना गांधींना किती सायास पडले असतील याची वाचकांनी कल्पना करावी.

**नाताळ कॉंग्रेस १८९४**

मतदानाचा हक्क न मिळणें एवढेंच कांहीं नाताळांतील हिंदी लोकांचें दुःख नव्हतें. त्यांच्यावर अनेक अन्याय दररोज होत होते. त्याकरितां व्यापक व कायम स्वरूपाची एक संस्था हवी होती. म्हणून सर्व हिंदी लोकांच्या संमतीनें "नाताळ हिंदी कॉंग्रेस" या नांवाची संस्था गांधींनीं स्थापन केली व तिचें नांवानें हिंदी हक्काचे लढे ते यापुढें लढले. "नाताळ कॉंग्रेस" हें नांव कांहींना प्रथम पसंत पडलें नाहीं. ते म्हणाले हिंदुस्थानांतील कॉंग्रेसवर ब्रिटिश सरकार नाराज आहे तेव्हां आपण कॉंग्रेस नांव धारण करूं नये. गांधी यावर लोकांना सांगत, हिंदी लोकांचें गाऱ्हाणें सत्य आहे ना. मग ब्रिटिश नाराज होतील म्हणून आपण भिऊन कॉंग्रेस हें नांव धारण करण्याचें सोडतां कामा नये. **आपल्या अंगांत जर निर्भयता नसेल तर आपण जगांत कोणचेंहि सत्य कृत्य करूं शकणार नाहीं.** गांधींच्या अंगीं निर्भयता, कर्मकौशल्य होतें म्हणूनच अवघ्या चोवीसाव्या वर्षीं त्यांच्याकडे आफ्रिकेंतील हिंदी लोकांचे नेतृत्व आलें व शेठ अबदुल्लासारखे पोक्त व व्यवहारचतुर लोक त्यांचे अनुयायी बनले. आफ्रिकेंत राहावयाचें ठरल्यावर गांधींनीं घर थाटलें व आपली वकिली

सुरू केली. वकिलींत त्यांना चांगली प्राप्ति होऊं लागली होती. तरी पण त्यांचा पुष्कळसा वेळ सार्वजनिक कामांतच जात असे.

**जिझियाचा नवा अवतार**

हिंदी लोकांचा छळ करणारे नवे नवे कायदे नाताळ विधिमंडळांत पास केले जात होते. त्या अन्यायी कायद्यांत औरंगजेबाच्या जिझिया करासारखा एक तीन पौंडी कर प्रत्येक हिंदी इसमावर लादला जाणार होता. हा कर किती डोईजड होता याची कल्पना हिंदी कामगारांचें वार्षिक उत्पन्न काय होतें हें कळलें म्हणजे चांगली होईल. प्रत्येक पुरुषाचें वार्षिक उत्पन्न नऊ पौंड होतें. मुलगा चवदा वर्षांचा व मुलगी तेरा वर्षांची झाली की त्याना प्रत्येकी तीन पौंड कर द्यावा लागणार होता. मुलाचें व बायकाचें वार्षिक उत्पन्न नऊ पौंडापेक्षां कमीच होतें. अशा रीतीनें हा करच तेथील हिंदी मजुरांचें एकतृतीयांश उत्पन्न गिळंकृत करणार होता. इतका भयंकर व अन्यायी कर जगांत कोणच्याहि राष्ट्रांत नव्हता. हा कर लादण्याचा मूळ उद्देश असा होता कीं, हिंदी लोकांनी आफ्रिका सोडून जावे. हिंदी लोक म्हणत "आमच्या परिश्रमानें ह्या ओसाड भूमीचें आम्ही नंदनवन बनविलें आहे. तेव्हां येथें राहण्याचा आमचा हक्क आहे. आमच्यापैकी, अनेकाचे येथेच जन्म झाले आहेत. हिदुस्थानांतून आम्ही आलों असलों तरी तिकडचे आमचे संबध आतां तुटले आहेत. द. आफ्रिकेला गोरे लोक जशी आपली मायभूमि मानतात तशीच आम्हीहि मानतों. तेव्हां आम्हांला गोऱ्यांबरोबरचे नागरिक हक्क पाहिजेत." हें हिंदी लोकांचें म्हणणें रास्त असलें तरी गोऱ्याचे हातीं सत्ता होती, यामुळें हिंदी लोकांचा ते छळ करूं शकत. हिंदी लोक गरीब, अशिक्षित, असंघटित असल्यामुळें त्यांनी अनेक अन्याय सहन केले पण आतां त्यांना धीट, कर्मकुशल, त्यागी नेता मिळाला होता. त्यानें त्यांच्यांत अन्यायाचा प्रतिकार करण्याची बुद्धि जागृत केली, व मागें लिहिल्याप्रमाणें ह्या अन्यायाचें दुखणें गांधींनीं जगाच्या वेशीवर पत्रकाद्वारें टांगलें. असें करतांकरतां दोन वर्षें निघून गेलीं.

## मायभूमीजवळ गाऱ्हाणें

हीं दोन वर्षे व शेठ अबदुल्लाच्या खटल्यांत गेलेले वर्ष अशीं तीन वर्षे गांधींनी आफ्रिकेंत काढलीं. त्यांना आतां असें वाटू लागलें कीं, आपण हिंदुस्थानांत जावें व बायकांमुलांना घेऊन येऊन आफ्रिकेंत कायम वस्ती करावी. दुसरा एक हेतु त्यांचा हिंदुस्थानांत येण्याचा होता. आफ्रिकेंतील हिंदी लोकांचीं दुःखें हिंदी पुढाऱ्यांना समजावून देऊन त्यांची सहानुभूति व मदत मिळवावी. हिंदी राष्ट्राचा पाठिंबा आपल्याला मिळाला म्हणजे आफ्रिकेंत गोरे लोक आपला छळ करतांना कचरतील. असा बेत करून गांधी हिंदुस्थानांत १८९६ सालीं आले. त्यांची बोट कलकत्त्यास जाणारी होती यामुळें प्रथम ते कलकत्त्यास उतरले. तेथील बंगाली पुढाऱ्यांची गांधींनीं भेट घेतली पण त्यांना पाहिजे असलेली सहानुभूति त्यांच्याकडून मिळाली नाहीं. मग ते अलाहाबादेस गेले. अलाहाबादच्या पायोनियर नावाच्या वजनदार इंग्रजी पत्राच्या गोऱ्या संपादकानें मात्र गांधींचें स्वागत केलें व म्हटलें गांधी मी तुमची बाजू माझ्या पत्रांत प्रसिद्ध करीन. मला द. आफ्रिकेंतील गोऱ्या लोकांची बाजू ऐकावी लागेल. ती ऐकल्यावर मग मला योग्य दिसेल तें संपादकीय लेखांत लिहीन. आपल्या मताला इंग्रजांच्या पत्रांत प्रसिद्धि मिळते ह्यावर गांधींनीं संतोष मानला व ते आपल्या जन्मभूमीला भेट देण्यास राजकोटला जाऊन नंतर मुंबईस आले.

## मुंबईच्या सिंहाची कृपा

मुंबईस आल्यावर मुंबईचे अनभिषिक्त राजे फेरोजशहा मेथा यांची भेट गांधींनीं घेतली. फेरोजशहांना मुंबईचे सिंह म्हणत असत. ही पदवी त्यांना चांगलीच शोभत असे, त्यांचा तो उग्र रुबाबदार चेहरा, ती दाढी, तो भरदार आवाज, प्रतिपक्षावर आवेशानें तुटून पडणारें तें अवसान हें सर्व पाहिल्यावर परका मनुष्य त्यांच्यासमोर बोलण्यास धजत नसे. गांधींनीं भीतभीतच दक्षिण आफ्रिकेची कैफियत त्यांचे कानावर घातली. गांधींची चळवळ

पद्धतशीर व धिटाईनें चाललेली त्यांना आवडली. फेरोजशहा हे लढाऊ वृत्तीचे असत. त्यांना वाटलें कीं आपण ह्या होतकरू मुलास हातीं धरलें पाहिजे. मग त्यांनीं गांधींना सांगितलें तुम्ही आपलें भाषण तयार करा, मी मुंबई-करांची जाहीर सभा बोलावतो. पण लक्षांत ठेवा तुम्हांला आपलें भाषण व्यवस्थित लिहून काढले पाहिजे. आयत्या वेळी सुचेल तें बोलेन असें म्हणून चालणार नाही. गांधींनी भाषण लिहून काढले. इंग्लंडमध्यें असतांनाच गांधींनीं बरेच कष्ट घेऊन उत्कृष्ट लेखनकला साध्य करून घेतली होती. ते मोजक्या शब्दांत आपला भाव प्रकट करू शकत. पाल्हाळिक असे ते लिहीत नसत. त्या-प्रमाणे अतिशयोक्तीहि टाळीत यामुळे गांधींचे भाषण वाचून फेरोजशहा म्हणाले "ठीक आहे. उद्या वेळेवर सभेत या" फेरोजशहाच्या निमंत्रणावरून मुंबईतील झाडून सारे मोठमोठे वकील, बॅरिस्टर, व्यापारी, प्रोफेसर्स सभेस हजर राहिले. एवढ्या मोठ्या लोकासमोर गांधी भाषण वाचतांना गडबडले, त्यांच्या तोंडांतून शब्द बाहेर पडेना. फेरोजशहा वात्सल्यानें प्रेरित होऊन त्याना धीर देत होते पण गांधींच्या डोळ्यासमोर अंधेरी येऊन ते खाली बसले. मग मुंबईचे महान् पुढारी वाच्छा यांनी गांधींचें लेखी भाषण हातांत घेऊन ठस्केदार आवाजांत श्रोत्यांना वाचून दाखविलें. तें ऐकतांच लोकांनी गांधींच्या भाषणाची तारीफ केली व मदत करण्याचें आश्वासन दिलें.

**पुण्याचा पाठिंबा**

पुण्यास लोकमान्य टिळक, गोखले, भांडारकर याना ते भेटले. सर्वांनी आफ्रिकेंतील आपल्या लोकांची दु:खे ऐकून एक जाहीर सभा घेतली व तेथें हिंदी लोकावर दक्षिण आफ्रिकेंत होणाऱ्या जुलुमांचा निषेध केला.

लोकांच्या भेटी घेणें चालू असताना गांधींनीं दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांची कैफियत लिहून काढून ती प्रसिद्ध केली व तिच्या प्रती सर्व पुढाऱ्यांकडे पाठविल्या. ह्या पत्रकाचा विकृत सारांश रॉयटर या इंग्रजी वृत्तसंस्थेनें सर्व देशांत तारेनें पाठविला. इतक्यांत गांधींना आफ्रिकेंतून

तार आली कीं, सत्वर या. आम्ही अडचणींत आहोंत. गांधी आपल्या बायकामुलासह आफ्रिकेंत जाण्यास १८९६ च्या नोव्हेंबरांत निघाले, याच वेळीं आफ्रिकेला जाणारी दुसरी बोट बरेच प्रवासी घेऊन निघाली. शेठ अबदुल्लाच्या मालकीच्या बोटींतून गाधींनीं प्रवास केला, या दोन बोटींत एकंदर ८०० प्रवासी होते.

**वादळी वारे**

गांधींचा बराचसा प्रवास सुखाचा झाला. पण आफ्रिकेचा किनारा जवळ येऊं लागला तसतसे वादळी वारे वाहूं लागले. समुद्रांतील वादळ हें पुढें जमिनीवर होणाऱ्या भयंकर वादळाचें पूर्वचिन्ह होतें.

**तारेनें आग लावली**

रॉयटरनें जी तार वर्तमानपत्राकडे पाठविली त्यांत म्हटलें कीं, "गांधींनी एक चोपडें हिदुस्थानांत प्रसिद्ध केलें आहे व त्यांत नाताळांतील गोरे लोक हिंदी लोकांवर अनन्वित जुलूम करीत आहेत असें म्हटलें आहे." ही तार नाताळांत प्रसिद्ध होतांच तेथील गोरे लोक चिडले. त्यांनीं सभावर सभा घेऊन आपल्या लोकांना गाधीविरुद्ध भडकावून दिलें. एका जबाबदार गोऱ्या गृहस्थानें लोकांना सांगितलें की, पहा, हा गांधी आपल्या लोकांची नाचक्की करीत हिंडत आहे. इतकेंच नव्हे तर हिंदी लोकांची नाताळच्या वसाहतीत भरती करण्याकरितां आपल्याबरोबर **आठशें लोक** घेऊन येत आहे. वस्तुस्थिति तशी नव्हती. गांधींच्या बरोबर जे दुसरे प्रवासी बोटीत होते ते गाधीनी आणले नव्हते. ते स्वतंत्रपणें आफ्रिकेंत चालले होते व त्यांपैकी पुष्कळसे ट्रान्सवालच्या वसाहतींत जाणारे होते.

गांधीजींनी जें पत्रक प्रसिद्ध केलें होतें तें सौम्य भाषेंत लिहिलें होतें. त्यांत गोऱ्या लोकांची नालस्ती केली नव्हती तर वस्तुस्थिति निवेदन केली होती. पण रॉयटरनें विपरीत ग्रह होईल अशा भाषेंत पत्रकाचा सारांश प्रसिद्ध केला. यामुळें नाताळमधील गोरे चिडले. दरबानच्या बंदरांत उतरूं नका, चिडलेले गोरे तुमचेवर हल्ला करतील असा इशारा गांधींना

मिळाला. पण ते निर्भयपणें एकटेच बोटींतून उतरून जाऊं लागले; तोंच त्यांचेवर गोऱ्यांनीं हल्ला केला, त्यांना बडविलें, चेंचलें, लाथा मारल्या. पण इतक्यांत पोलिस सुपरिटेंडेंटची बायको याच वेळीं रस्त्यानें चालली होती, तिनें मध्यें पडून गांधींचें रक्षण केलें.

ही हकीकत इंग्लंडमध्यें पोहोंचली. तेव्हां भारतमंत्र्यांनीं वसाहत सरकारला कळविलें कीं, गांधींवर हल्ला करणारावर खटला भरा. पण गांधींनीं म्हटलें मला कोणावर फिर्याद करावयाची नाहीं. गोऱ्या लोकांचा गैरसमज आज झाला आहे तो कालांतरानें दूर होईल. गांधींच्या या वागण्याचा परिणाम गोऱ्या लोकांवर झालेला लवकर दिसला. पुष्कळांनी दिलगिरी प्रदर्शित केली व पुढे वस्तुस्थिति बाहेर आल्यावर गोऱ्या वर्तमानपत्रांनीं गांधींवर अन्याय झाला, त्यांनीं आमची नालस्ती केली नव्हती असें म्हणून खेद प्रदर्शित केला. यानंतर हिंदी लोकांविषयी गोऱ्या लोकांचें मत पुष्कळ बदललें. मतदानाचा हक्क हिरावून घेणारा कायदा पासहि झाला नाहीं.

एकीकडे अनुकूल अशा गोष्टी घडत असतां रोज कांहीं ना कांहीं तरी नवे नियम अगर कायदे हिंदी लोकांविरुद्ध तयार होत होते. यामुळें गांधीचें सार्वजनिक काम वाढत चाललें.



# ६. संघटनेचे धडे

**कायम फंड चैतन्याचा नाश करतो**

नाताळ हिंदी काँग्रेसचें काम व्यवस्थित चालावे म्हणून कोणी तरी कायम फंडाची कल्पना काढली. लोकांत उत्साह आहे तोंपर्यंत चांगला फंड जमेल. तो मिळवून व्याजी लावावा व त्याचे व्याजांतून काँग्रेसचें नित्याचें काम चालवावें. आपल्याकडे देखील पुष्कळाना असेंच वाटते. देवस्थानाकरितां ज्याप्रमाणें कायम उत्पन्न मिळण्याची व्यवस्था असते तशीच आपल्या काँग्रेसची करावी ही सर्वसाधारण प्रवृत्ति आहे. पण गांधीचें पाहाणें विशेष खोल असे. ते म्हणत कायम फंड उभारून त्याचे व्याजांतून संस्थेचा खर्च चालू लागला की, जनतेशीं तुमचा संबंध तुटेल दरवर्षी जनतेकडे मदत मागण्यास जावें लागलें म्हणजे तिच्या अडचणी आपल्यास कळतात. आपलीं पावलें इष्ट दिशेनें पडतात. मग पैसा सहज मिळतो. म्हणून कायम फंडावर संस्था चालवू नये असा सल्ला गांधींनीं आपल्या अनुयायांना दिला. मात्र हे तत्त्व इमारतीचे बाबतींत ठेवण्याचें कारण नाहीं. इमारत बांधावयची असली तर त्याकरितां कायम फंड उभागवा लागला तर त्यांत वावगें असें कांहीं नाही.

**गांधींचा भ्रम**

मनुष्य थोर असला, जगाला संदेश देण्याइतके त्याच्यांत सामर्थ्य असलें तरी त्याच्या हातून चुका होत नाहींत असें मुळींच नाहीं. ज्या वेळीं मनुष्याला जगाचा विशेष अनुभव नसतो त्या वेळीं त्याचे हातून अनेक चुका होतात. मनुष्य कांहीं झालें तरी परिस्थितीचा थोडा बहुत गुलाम असतो. गांधींच्या तरुण वयांत नेमस्त विचाराची छाप पुष्कळ तरुणांवर होती. न्यायमूर्ति रानडे म्हणत, इंग्रजांचा आपल्या राष्ट्राशीं जो संबंध आला ती एक विधिघटना

होती. आपलें हित इंग्रजांच्या छत्राखालीं राहूनच होईल. रानडे यांचे शिष्य गोखले व गोखल्यांना गुरु मानणारे गांधी यामुळें गांधींनाहि वाटे कीं, ब्रिटिश साम्राज्यांत राहूनच आपलें कोट कल्याण होणार आहे. जें मनाला पटलें त्याप्रमाणें वागण्यांत कसूर करावयाचा नाहीं हा गांधींचा स्वभाव. यामुळें बोअर युद्धांत गांधींनीं इंग्रजांची बाजू घेतली. ज्या पुरुषानें आपल्या आयुष्याचा मोठा भाग स्वातंत्र्यप्राप्तीकरितां खर्च केला त्यानें स्वातंत्र्याचे शत्रूला मदत करावी हा दैवदुर्विलास म्हणावा कीं तरुणपणाचा भ्रम म्हणावा ? पण असें बोअर युद्धांत झालें खरें.

### बोअर स्वातंत्र्ययुद्ध १८९९

मागें आपण पाहिलेंच आहे कीं इंग्रजाप्रमाणें बोअर (डच) लोकांची वसाहत आफ्रिकेंत होती. इंग्रजांचें बल अधिक होतें. लहान मासा मोठ्या माशाला गिळण्याचा प्रयत्न करतो त्याप्रमाणें इंग्रजांनीं बोअर लोकांची वसाहत गिळंकृत करण्याचा प्रयत्न सन १८९९ मध्यें केला. पण बोअर लोक कडवे स्वातंत्र्यप्रिय होते. त्यांनीं म्हणजे स्त्रीपुरुषांनीं गनिमी काव्याचा अवलंब करून इंग्रज फौजांची दमछाट केली. शेवटीं दोन्ही बाजू थकल्या व कसाबसा तह झाला. इंग्रजांना विजय मिळाला पण नाममात्र. यामुळें बोअर लोकांना वसाहतीचें स्वराज्य मिळालें.

### इंग्रजांना मदत करण्याचें पहिलें कारण

या युद्धांत गांधींनीं आपल्या म्हणजे हिंदी लोकांनीं कोणाची बाजू घ्यावयाची याचा बरेच दिवस विचार केला. आपण ज्याअर्थीं ब्रिटिश प्रजाजन आहों, ब्रिटिश छायेचा उपयोग आपण करीत आहोंत त्याअर्थी त्यांच्या संकटकाळीं त्यांनाच मदत करणें आपलें काम आहे अशा दुदवी निर्णयावर गांधी आले. मात्र सुदैव इतकेंच कीं ही मदत जखमी झालेल्या शिपायांस मेण्यांत घालून हॉस्पिटलमध्यें नेण्यापुरतीच भूतदयेची होती.

### इंग्रजांना मदत करण्याचें दुसरें कारण

बोअर युद्धांत भाग घेण्याचें दुसरें एक कारण होतें. तें म्हणजे हिंदी लोक

भेकड आहेत, उदात्त भावना त्यांच्याजवळ नाहींत, ते स्वत:पुरतें पाहतात असा ग्रह गोरे लोकांचा झालेला होता. तो गांधींना घालवावयाचा होता. हा ग्रह कृतीनेंच निघणारा होता. गांधींनीं ११०० हिंदी लोकांचें शुश्रूषा पथक तयार केलें व ब्रि. सेनापतीला आम्ही शुश्रूषा पथकाचें द्वारें आपणांस मदत करण्यास तयार आहों असें कळविलें. ब्रि. सैन्याचा ठिकठिकाणीं पराभव होत होता. मदतीची त्यांना गरज होती. गांधींच्या मदतीचा स्वीकार केला गेला व या हिंदी शुश्रूषा पथकाकडे लढाईत जखमी झालेल्या शिपायांना डोलींत घालून इस्पितळांत पोहोंचविण्याचें काम दिलें गेलें. हें काम बरेंच धाडसाचें होतें. युद्धाच्या धुमश्चक्रींत जेथें तोफांचा व बंदुकींचा भडिमार होत असे तेथें जाऊन जखमी शिपायांना या मंडळींना उचलावें लागे. सैनिक हॉस्पिटल रणक्षेत्रापासून कधीं कधी वीस पंचवीस मैल दूर असे. तेथपर्यंत सैनिकांचा भार खांद्यावर घेऊन जावें लागे. पुष्कळ वेळां अन्नपाणी या लोकांना वेळेवर मिळत नसे व गांधी स्वत: डोलीला खांदा देत व २०–२५ मैल सैनिकांचा भार वाहून नेत. यावरून तरुण वयांत गांधींत श्रमसहिष्णुता व ताकद किती होती याची कल्पना होते. आज सिनेमाहून रात्रीं घरीं येतांना झोपलेल्या मुलाचा भार आईबापांना सहन होत नाही व मग एकदां आई व एकदां बाप आळीपाळीनें मूल घेऊन कंटाळत घरीं येतात. असो. असें हें कठिण, चिकाटीचें व धाडसी काम या पथकानें दीड महिना करून इंग्रज सेनापतीकडून वाहवा मिळविली. या प्रसंगानें गांधींनी आपल्या अनुयायांना धाडसी सेवेचे धडे दिले. हिंदी लोक धाडसी सेवेंत आपल्या मागें राहात नाहीत हें पाहून गोरे लोक हिंदी लोकांशी आदरानें व प्रेमानें वागूं लागले. एकदां सेनापति लॉर्ड राबर्टस्च्या जखमी मुलाला वाहून नेण्याचें काम हिंदी पथकाकडे आलें. मदतीला गोरे सोल्जर्स होते. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें सर्वांनाच तहान लागली होती. रस्त्यांत गोड्या पाण्याचा एक लहानसा झरा आढळला. पहिल्या प्रथम आपण पाणी न पितां आपल्या सहकाऱ्यांनीं पाणी अगोदर प्यावें असा आग्रह

काळे-गोरे शिपाई एकमेकांवर करीत होते. पण हें प्रेम चिरकाल टिकलें नाहीं. लढाईचें संकट टळतांच पुन्हां काळ्या गोऱ्यांत वितुष्ट आलें व त्यांतून सत्याग्रही युद्ध पुढें निघालें. पण त्याला अजून अवकाश होता.

## फकिरीच्या मार्गावर

बोअर युद्ध समाप्त झाल्यावर गांधींना वाटूं लागलें कीं, आपण आतां हिंदुस्थानांत परतावें. आपल्या मायभूमीत जाऊन कार्य केलें तर आफ्रिकेंतील प्रश्न सोडविणें सुलभ होईल. असा विचार करून नाताळमधल्या मित्रांची त्यांनीं १९०१ मध्यें परवानगी विचारली. प्रथम ती त्यांना मिळाली नाहीं. पण पुढें त्यांनीं बोलवाल तेव्हां येईन असें वचन दिल्यावर गांधींना मायभूमीस परतण्याची परवानगी त्यांच्या अनुयायांनी दिली. जिकडे तिकडे थाटाचे निरोपसमारंभ झाले. गांधीवर नानाविध मौल्यवान् वस्तूंचा नुसता वर्षाव झाला. या सर्व वस्तू त्यांनी नाताळमधील सार्वजनिक कार्यार्थ देऊन टाकल्या. लोकांनीं प्रेमानें दिलेल्या वस्तू परत करण्याचें कारण त्यांनीं असें दिलें आहे की, ही देणगी मीं लोकसेवा केली म्हणून दिली गेली. लोक-सेवा ही फुकटच केली गेली पाहिजे या तत्त्वाला धरून या देणग्या गांधींनीं परत केल्या. गांधी १९०१ सालीं हिंदुस्थानांत यावयास निघाले. तेथपर्यंत त्यांच्या सार्वजनिक आयुष्याचा आपण विचार केला. आतां त्यांच्या वैयक्तिक जीवनाचा थोडक्यांत परामर्ष घेऊं.

## गांधींचा संसार

गांधी आणि त्यांची पत्नी ही समान वयाची होती परंतु त्यांच्या स्वभावांत, शिक्षणात व विचारसरणीत जमीनअस्मानाचें अंतर प्रत्येक वर्षी पडत चाललें होतें. कस्तुरबांनीं लहानपणीं जे संस्कार घेतले होते ते शेवटपर्यंत त्यांचे कायम होते. पतीच्या विचारसरणीमुळें त्यांना कल्पनातीत त्रास झाला पण त्यांची पतीवरील निष्ठा रतिमात्र ढळली नाहीं. विचारसरणींत गांधी आपल्या पत्नीपासून प्रतिक्षणीं दूर जात होते तरी कस्तुरबावरचें त्यांचें प्रेम केव्हांहि कमी झालें नाहीं. प्रेमाशिवाय दुसऱ्या एका गोष्टीनें ही पति पत्नी

बांधली गेली होती ती म्हणजे स्वधर्मनिष्ठा. दोघांची हिंदु धर्मावर विलक्षण श्रद्धा होती. ह्या दोन गोष्टी सोडल्यानंतर गांधींचें आपल्या पत्नीशीं जमण्याजोगें कांहींच नव्हतें.

गांधींनीं आपल्या पत्नीला शिक्षण देण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण कस्तुरबांनीं म्हणावें आम्हांला शिकून काय करावयाचें आहे. स्त्रियांचा धर्म गृहव्यवस्था पाहणें, ती मी नीट पाहातें आहेच. आईनें सासूनें मला गृहव्यवस्थेंत तरबेज केलें आहे आणि तें कांहीं खोटें नव्हतें.

विलायतेहून गांधी आले ते बॅरिस्टरची पदवी घेऊन आले. इतकेंच नाहीं तर पुष्कळ नवविचार घेऊन आले व ते कस्तुरबाच्या गळीं उतरविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण कस्तुरबांना त्यांच्या कोणत्याच गोष्टी पसंत पडत ना! गांधीचें तें टेबलावर जेवणें, चमच्या काटयाचा भोजनांत उपयोग करणें, परजातीच्या माणसांच्या पंक्तीला बसणें या गोष्टी पाहून आपला पति धर्मभ्रष्ट होत चालला आहे अशी त्यांची समजूत होत चालली. आपल्या पतीनें वकिलीचा धंदा करावा, चांगला पैसा मिळवावा, घर चांगलें थाटावें, बायकामुलांना दागदागिने व कपडेलत्ते, सुग्रास भोजन द्यावें अशी त्यांची इतर स्त्रियांप्रमाणें आकांक्षा होती. हिंदी लोकांच्या हक्काकरितां लढणें, त्यांत वेळ घालविणें या गोष्टी त्यांस मुळींच पसंत नसत. आफ्रिकेंत बरेच दिवस त्यांचेपासून गांधी दूर राहिल्यामुळें पतीच्या विचारांची प्रगति जी होत होती ती त्यांचे लक्षांत आली नाहीं.

१८९७ सालीं गांधींनीं पत्नीला व मुलांना आपल्याबरोबर आफ्रिकेंत नेलें. बंदरावर उतरल्यावर गोरे लोकांनीं आपल्या पतीवर हल्ला केलेला पाहून त्यांनीं म्हणावें अशा संकटांत तुम्ही येथें राहतां कशाला? हिंदुस्थानांत चला तेथें काय पोटापुरतें मिळणार नाहीं? राजकीय लढयाचें महत्त्व, नागरिक स्वातंत्र्य, स्वाभिमानाचें रक्षण, स्वार्थत्यागपूर्वक लोकसेवा करण्याची सुशिक्षितावरील जबाबदारी या गोष्टी कळणें त्यांच्या आटोक्याच्या बाहेर खरोखरच होतें. बाहेरच्या गोष्टी राहो पण गृहव्यवस्थेंत दोघांचें जमत

होतें काय? नोकरांना आप्तांच्या दर्जाप्रमाणें वागविणें, स्नेहीमंडळींना कायमचें घरांत ठेवून घेणें व त्यांची सेवा कस्तुरबांना करावयास लावणें, या गोष्टी गांधींच्या पत्नीला अपमानाच्याच केवळ नव्हे तर छळणुकीच्या वाटूं लागत.

**मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न**

मुलांच्या शिक्षणाच्या बाबतींत पतिपत्नीला कांहीं कमी कटकटी झाल्या नाहींत. कस्तुरबा जरी विशेष शिकलेल्या नव्हत्या तरी मुलांचें शिक्षण चांगलें व्हावें, आपल्या पतीप्रमाणें त्यांनीं विद्वान् होऊन मान्यता मिळवावी व प्रपंचाचा भार घेण्यास पात्र व्हावें असें त्यांस वाटत असे.

मुलें पांच सात वर्षांचीं झाल्यावर "शाळेंत घाला" म्हणून त्यांनीं पतीच्या पाठीमागें लकडा लावावा. गांधी म्हणत "येथें हिंदी लोकांकरितां चांगल्या शाळा आहेत कुठें ? युरोपियन शाळेंत काळ्या मुलांना घेत नाहींत. माझ्या बाबतींत तो नियम ढिला होईल. पण मला तेथें मुलें मुळीं घालावयाला नको आहे. तेथें सर्व इंग्रजींतून शिकवितात. मुलांनीं आपल्या घरच्या भाषेंतून शिकावें असें माझें मत आहे."

"मग तुम्ही विलायतेला कसे गेलांत, तेथें काय तुम्हांला गुजराथींत शिकवीत होते."

"अग, मी तेव्हां मॅट्रिक झालों होतों."

"मग मुलांना काठेवाडांत पाठवा. ती आपल्या मामाच्या घरीं अगर चुलत्याचे घरीं शिकतील."

"होय, तो विचार वाईट नाहीं. पण––"

"आला का तुमचा पण––या तुमच्या पणाला मी कंटाळलें आहे.", कस्तुरबांनीं चिडून म्हणावें.

"अग तुला त्यांतलें कळावयाचें नाही."

"मला कळत नाहीं हे तर शब्द ऐकून माझे कान किटले आहेत विलायतेला चांगले गेला होतां मग आणावयाची होती एखादी हुशार मडम करून."

" पण मीं तुला शपथ दिली होती ना, कीं तुझ्या बाहेर जावयाचें नाही." गांधींनीं हंसत म्हटलें. कस्तुरबा या शब्दांनीं थोड्या प्रसन्न झाल्या व म्हणाल्या " मग मी सांगतें तसें करा, एक तर काठेवाडांत मुलें पाठवा नाही तर येथें चांगला शिक्षक ठेवा. "

" ठीक आहे, मी शिक्षक शोधतोंच आहे. आईबापापासून मुलांना लहान वयांत दूर ठेवू नये असें माझें मत आहे. मुलांचे मनावर सुशील घराण्यांतील आईबापाचे वागणुकीचा जो परिणाम होतो तो जन्मभर टिकतो. मीच मुलांचें शिक्षणांत लक्ष घालणार आहें. "

" तुम्ही लक्ष घालणार, माझेकरितां साड्या घ्यावयास तुम्हांला पांच मिनिटांची फुरसत होत नाहीं. आणि म्हणे मी मुलांना शिकविणार ! मुलांच्या आयुष्याचें वाटोळें करणार असें मला दिसतें आहे. "

" माझ्याजवळ राहून वाटोळें कसें होईल. उत्तमांतलें उत्तम शिक्षण त्यांना मी देणार आहे. पहा मी त्यांना घर साफ कसें ठेवावें हें शिकवीत नाही का ? त्यांचे त्यांना कपडे धुतां येतात, इस्तरी करावयास त्यांना धोब्याकडे जावें लागत नाहीं. अशीं एक ना अनेक कामें त्यांना येतात. त्यांच्या बरोबरीचीं मुले आपण पाहातों किती परावलंबी असतात बरें."

" पण या कामांनीं मुलांना समाजांत प्रतिष्ठा मिळेल का ?" कस्तुर-बांनीं व्यावहारिक प्रश्न विचारला.

" मी प्रतिष्ठेचा अर्थच बदलणार आहे. मी शिक्षणाचे नवे प्रयोग करणार आहे. "

" तुम्ही प्रयोगच करीत राहा. तुम्हांला सुधारणें मला नव्हे परमेश्व-राला सुद्धां शक्य नाहीं. पण हे प्रयोग माझे मुलांवर कां ? "

" तीं तुझ्याप्रमाणें माझीहि मुलें नाहींत काय ? "

## पुनश्च तुकाराम व जिजाई

आफ्रिकेंतून दुसऱ्यांदां गांधी जेव्हां परत आले तेव्हां तर पतिपत्नीचा चांगला खटका उडाला. आपण नुकतेंच पाहिलें आहे कीं, लोकांनीं दिलेल्या

हजारों रुपयांच्या देणग्या गांधीनीं परत केल्या. या देणग्यांत कस्तुरबांकरितां एक सोन्याच्या पन्नास पुतळ्यांची माळ होती. देणग्या परत करणें सहज घडून आलें नाहीं. कस्तुरबांचें मन वळविणें सोपें नाहीं हें पाहून गांधींनीं मुलांना म्हटलें, “ बाळांनो, आपण साधेपणानें राहात आहोंत. कधीं दागिने घालतों का ? मग हीं सोन्याचीं घड्याळें, हीं कडी, हे गोफ आपणाला काय कामाचे? हिऱ्याच्या आंगठ्या घालूं नका, दागिन्याचा हव्यास धरूं नका, म्हणून मी लोकांना सांगत असतो. मग मी हे दागिने सार्वजनिक कामाला देऊन टाकले तर तुमची हरकत नाही ना ?” मुलें होकार देतात इतक्यात कस्तुरबा माजघरांतून दिवाणखान्यांत आल्या व म्हणाल्या

“ मुलांना काय विचारतां ? त्यांना काय समजतें ? त्यांनीं द्या म्हटलें तरी मी ह्या वस्तू परत करावयास संमति द्यावयाची नाहीं. लोकांजवळ आपण कांहीं मागावयास गेलों नव्हतों, त्यांनीं आपण होऊन प्रेमानें ह्या वस्तू दिल्या आहेत. त्या परत करण्यांत आपण त्यांची मनें दुखविणार आहोंत.” तुकारामांच्या जिजाईच्या विचारसरणीचें अनुकरण कस्तुरबांनीं केलें.

गांधींनी थोडें स्मित करून म्हटलें “ अग मला माहीत आहे. तू हें दागिने मुळीच घालणार नाहींस.”

“ न घालावयास काय झालें ? पण तुम्ही मला घालूं द्याल तर. मला तुमच्या इच्छेविरुद्ध दागिन्यांनीं नटावयाला नको आहे, पण मला हे दागिने माझ्या सुनांकरितां हवे आहेत.”

“सुनांकरतां! ” गांधीनीं आश्चर्य दाखवीत म्हटलें, “अग त्याला अजून फार काळ आहे. आपलें लग्न जसें लवकर झालें तसें का आपल्या मुलांचें करावयाचें आहे ? त्यांच्या लग्नाचा समय येईल तेव्हां मला सांग. मी आहे ना तुझी हौस पुरवायला ! ”

“ तुम्ही हौस पुरविणार! आहे माहीत. माझे दागिने मला घालूं दिले नाहींत. आणि आतां म्हणे मी तुझी हौस पुरविणार ! मी सांगून ठेवतें माझ्या

मुलांना साधू बनविण्याचा तुमचा बेत मी चालू देणार नाहीं. मुलांच्या व तुमच्या दागिन्यांचा प्रश्न राहूं द्या. पण मला दिलेल्या पुतळ्यांच्या माळेवर तुमचा हक्क काय म्हणून ? तुम्ही देऊं लागाल तर मी ती परत देऊं देणार नाहीं."

" पण ही माळ लोकांनीं तुझ्या सेवेबद्दल दिली का माझ्या ?" गांधीनीं मुद्याचा प्रश्न काढला.

स्त्रिया वादविवादांत पुरुषांना कधींच हार जात नाहींत. वर्म काढून पुरुषांना गप्प बसविण्यांत स्त्रियांचा हातखंडा असतो. तेवढ्यानें साधलें नाहीं म्हणजे अश्रुपाताचें अमोघ अस्त्र सुटतें आणि मग त्यांचा तेवढ्यापुरता जय होतो.

गांधींनीं " माझ्या सेवेकरितां लोकांनी देणग्या दिल्या " असें म्हटल्याबरोबर कस्तुरबा उसळून म्हणाल्या—

" तुम्ही सेवा केली असेल पण मी नाही का तुमचेसाठीं राबलें ? रात्रंदिवस तुमच्या, तुमच्या नोकराच्या, तुमच्या स्नेही मंडळींच्या खस्ता काढल्या ती कांहींच का सेवा नाहीं ? तुम्हीं मला यांच्याकरितां गुलामाप्रमाणें राबवून घेतलेंत, मला पदोपदीं रडविलेंत तें कुठें गेलें ?" असें म्हणून कस्तुरबांनी रडण्यास प्रारंभ केला.

यावर गांधीं कांहींच बोलले नाहींत. कस्तुरबांनीं केलेला मर्मभेदक हल्ला परतवून लावणें शक्य नव्हतें व त्या क्षणीं तरी इष्ट नव्हतें. गांधींना कस्तुरबांनीं केलेल्या कष्टांची आठवण झाली. गोष्ट पटली म्हणून नव्हे तर पतीचा शब्द राखण्याकरितां कस्तुरबा राबली, आपण राबवली हा विचार मनांत येऊन त्यांनीं मौन स्वीकारलें.

**धर्मसंकट**

अशा प्रसंगास गांधी धर्मसंकट हें नांव देतात. पत्नीच्या म्हणण्यास मान द्यावा तर सार्वजनिक **सेवेला उच्च पातळीवर** नेण्याची संधि जाते व पत्नीची इच्छा धुडकवावी तर एका सोज्ज्वल, निष्पाप, कष्टाळु जीवाला

दुखविण्याचा प्रसंग येतो. कस्तुरबा नवीन असें काय म्हणत होत्या ? त्या परंपरागत विचारानें चालल्या होत्या. पण गांधींना जुन्या प्रवाहाच्या उलट जावयाचे होतें. या कार्यांत त्यांची स्वतःची शक्ति अपुरी पडत होती. कस्तुरबांच्या मदतीनें देणग्या परत होऊं शकत होत्या, हे त्यानीं जाणलें. त्या वेळेपुरते ते स्वस्थ बसले. दुसरे दिवशी कस्तुरबांच्या भावनांचा पूर ओसरल्यावर त्यांनीं काकुळतीनें कस्तुरबांना म्हटलें--

" हें पहा या देणग्या परत देण्यानें माझें सत्त्व राखलें जाणार आहे. तू मला या वेळी सहाय्य केले पाहिजेस. तू जर हे दागिने परत करशील तर मी सुखी होईन. "

" हे पाहा तुम्ही असे बोलू लागला की, माझे मन विरघळतें. तुम्हाला दु:खी करून मला काय मिळणार आहे, तुमच्या पावलावर पाऊल टाकणे हा माझा धर्म आहे. तुम्हांला जे योग्य दिसेल तें करा. पण एक सांगून ठेवतें, नव्या नव्या गोष्टी सुरू करून मला व्यर्थ कष्ट देत जाऊं नका."

झालें. गांधींना पाहिजे होते ते मिळाले. कस्तुरबांच्या त्यागाबद्दल त्यांचे मनात आदर उत्पन्न झाला. स्त्रियाबद्दल बोलतांना गांधी नेहमीं म्हणत कीं, स्त्री ही त्यागाची मूर्ति आहे. हें बोलणें स्त्रियाची स्तुति करण्याकरितां नव्हतें तर प्रचीतीचे होतें ही प्रचीति त्याना घरांतच कस्तुरबांचें जीवन पाहून आली होती.

गांधी जें कार्य बुद्धिपूर्वक करीत तेच कस्तुरबा पतीवरच्या श्रद्धेमुळें करून त्या कार्याला गोडवा आणीत. श्रीराम, हरिश्चंद्र यांचीं चरित्रें उज्ज्वल व आकर्षक होण्याचें कारण त्यांच्या राण्या आपल्या पतींच्या यथार्थतेनें सहचारिणी बनल्या होत्या. गांधीचें जीवन कृतार्थ होण्यास कस्तुरबांचा त्याग कसकसा कारणीभूत झाला हें ह्या प्रसंगावरून कळतेंच. राष्ट्रमाता ही पदवी त्यांना फुकट मिळालेली नाहीं.

---

## ७. मायभूमीचें दर्शन

गांधी मायदेशाला आतां तिसऱ्यांदां आले. प्रथम १८९१ सालीं बॅरिस्टर होऊन, पुढें आफ्रिकेंतील शेठ अबदुल्ला यांच्या दाव्याचा दोन्ही पक्षांना समाधानकारक निकाल करून व आतां १९०१ मध्यें नाताळमधील राजकीय चळवळीला व्यवस्थित स्वरूप देऊन ते मायदेशाला परत आले. दुसऱ्यांदां नाताळमध्यें गेल्यावर त्यांचे ध्यानांत आलें कीं, हिंदुस्थानची नुसती सहानुभूति मिळवून आफ्रिकेंतील प्रश्न सुटणार नाहीं. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न सुटला म्हणजे परदेशांत गेलेल्या हिंदी लोकांच्या हक्कांचा प्रश्न सहज सुटेल. म्हणून गांधी हिंदुस्थानांत आले.

### पुढाऱ्यांची परीक्षा

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न कॅाँग्रेसनें हातीं घेतला होता. गांधी मुंबईच्या किनाऱ्यावर उतरले त्या वेळी कॅाँग्रेसचें अधिवेशन कलकत्त्यास होतें. त्याकरितां फेरोजशहा मेथा बादशाही थाटानें तिकडे चालले होते. गांधीनीं त्यांची भेट एका स्टेशनवर घेतली. त्याबरोबर ते म्हणाले, " हें पाहा गांधी, तुमच्याकरितां आम्ही कांहीं करूं शकत नाहीं. फार तर तुमचा दक्षिण आफ्रिकेबद्दलचा ठराव पास करूं." असें हें सडेतोड बोलणें गांधीना कसेसेंच वाटलें. द. आफ्रिकेचा प्रश्न कठिण होता पण नकार देतांना थोरांनीं सहानुभूति तरी व्यक्त करावयाची होती असें त्यांचे मनांत आलें. कॅाँग्रेसच्या पुढाऱ्यांचा तो नवाबी थाट, कॅाँग्रेसच्या सेवकांशीं त्यांची बेपर्वाईची वागणूक या गोष्टी पाहून गांधी मनांत म्हणाले " हे पुढारी लोकांचीं मनें आकर्षून कसें घेणार ? कलकत्त्यास पोहोंचल्यावर गांधी कॉंग्रेसच्या मुख्य चिटणीसांकडे गेले व म्हणाले, "मला कांहीं काम द्या." "आमचेजवळ कांहीं एक काम नाहीं." असे मुख्य सेक्रेटरी म्हणतात तोंच दुसऱ्या सेक्रेटरीनें म्हटलें. "मजकडे शेंकडों पत्रें

येऊन पडलीं आहेत. लोक उगाच कांहीं तरी प्रश्न विचारतात. मला वेळ आहे कुठें? तुम्ही हीं पत्रें पहा ज्यांना उत्तरें द्यावीं असें तुम्हांला वाटेल त्यांना उत्तर द्या. बाकीचीं फाडून टाका."

गांधींना हें उत्तर चमत्कारिक वाटलें. ते मनांत म्हणाले, "लोकांच्या पत्रांची विल्हेवाट करण्याचा अधिकार ज्याचे नांव गांव अधिकार माहीत नाहीं अशांकडे हे कॉंग्रेसचे चिटणीस देतात कसा? पुढें गांधींच्या पाहण्यांत आलें कीं, हे लोक आपल्याच थाटांत असतात. बूट चढवावयाला व कोटाचे बटन घालावयाला यांना नोकर लागतो. गांधींच्या नजरेसमोर हिंदी स्वातंत्र्याचा लढा दिसत होता. तो लढा लढण्यास असलेच का सेनापती चालतील?

**स्वयंसेवकांची वृत्ति**

सेनापतीची पारख करून कॉंग्रेस स्वयंसेवकाकडे गांधी गेले. तेथें ते आपापसांत भांडत असतांना आढळले. ज्यांनीं शिस्त ठेवावयाची तेच शिस्त मोडीत होते. शौचकुपांत तर इतकी घाण होती कीं, नाक दाबल्या-शिवाय तिकडे जाणेंच शक्य नव्हतें. कॉंग्रेसला आलेले प्रतिनिधी याच मास-ल्याचे. मद्रासकडच्या प्रतिनिधीनी आपला रसोडा निराळा थाटला होता. कोणी तिकडे फिरकलेलें त्यांना खपत नव्हतें. हिंदी तेवढा एक अशी घोषणा तिकडे कॉंग्रेस करते आणि हे प्रतिनिधी लहानशा गोष्टींत भेदभाव राखतात.

**प्रतिनिधी कीं हौशे प्रेक्षक?**

अधिवेशनांत मुख्य मुख्य ठरावावर प्रमुख लोकांचीं सविस्तर भाषणें झालीं. पुष्कळसे ठराव लोक न समजतांच पास करीत. गांधींच्या ठरावाचें असेंच झालें. त्यांना फक्त पांच मिनिटें बोलण्यास मिळालीं होतीं. एवढा मोठा महत्त्वाचा ठराव पण तो पुरा समजून घेण्यास प्रतिनिधि कुठें तयार होते? त्यांना घरी पळण्याची घाई झाली होती. आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या गाऱ्हाण्याबद्दलचा ठराव चुटकीसारखा पास करून टाकून प्रतिनिधी मोकळे झाले. मुळींच कांहीं न करण्यापेक्षां कॉंग्रेसनें ठराव घेऊन पास केला हें काय

थोडें होतें ? पण ठराव पास करण्याची ही तऱ्हा स्वराज्य जवळ आणणारी नाहीं असें गांधीजींनीं मनांत म्हटले.

**आमचें सुंदर हिंदुस्थान**

कॉंग्रेस अधिवेशन संपल्यावर गांधींचा मुक्काम गोखल्याकडेच होता. गोखल्यांनीं मोठमोठ्या लोकांच्या गांधीशीं ओळखी करून दिल्या. गांधींच्या ह्या थोर लोकांकडे पाहण्याची एकच रीत होती. ती म्हणजे **ह्या थोर लोकांचे अंगांत हिंदी स्वातंत्र्य जवळ आणण्याला लागणारे गुण अगर शक्ति आहे का ?** बहुतेक ठिकाणीं त्यांची निराशा झाली. नामदार गोखले, पी. सी. राय यांचें चारित्र्य पाहून मात्र गांधीचें हृदय भरून येत असे. कलकत्त्यातील थोर लोकांचें जीवन पाहिल्यावर गांधींनीं सामान्य लोकांचें जीवन पाहण्याकरितां तिसऱ्या वर्गाच्या आगगाडीच्या डब्यांतून प्रवास करण्याचें ठरविलें. हा प्रवास करीत असतांना लोकांच्या घाणेरड्या संवयी अवलोकन करून त्यांना किळस आली. प्रवासी डब्यांत थुंकत व खाल्लेल्या शेंगांचीं टरफले तेथेंच टाकीत. विड्या ओढून दुसऱ्या पॅसेंजरना उपद्रव देत, क्षुल्लक कारणावरून भांडत, शिवागाळ्या करीत. सभ्य आचार असा क्वचितच दिसे. हें सर्व पाहून गांधी मनांत म्हणत स्वातंत्र्याचा लढा सुरू करण्यापूर्वी किती तरी विधायक काम हिंदुस्थानांत करावें लागेल. नुसता रेल्वे प्रवास सुखसोईचा करून घेण्याकरितां एखाद्या मनुष्याला आपलें उभें आयुष्य वेचावें लागेल. काशीला काशी विश्वेश्वराचें दर्शन घेण्याकरितां ते भक्तीनें गेले पण तेथें ही घाण व अव्यवस्था माजलेली दिसली. भिकारी इतके होते कीं, यात्रेकरूंना सुखानें चालणें मुष्कील होत असे. कलकत्त्याच्या कालीमातेच्या देवळातील भीषणता काशीविश्वेश्वराच्या देवळांत जरी दिसली नाही तरी देवगृहांत ज्या प्रशान्त व पवित्र वातावरणाची आपण अपेक्षा करतों तें गांधींना तेथें आढळलें नाही. या वेळीं त्यांनीं पाहिलेल्या ख्रिस्ती चर्चची त्यांस आठवण झाली. चर्चमधील वातावरण अधिक पवित्र, अधिक गंभीर व प्रशान्त असतें. आपल्या हिंदुधर्माचीं तत्त्वें इतकीं उच्च असून हा गलिच्छ आचार येथें कां शिरला ? व तो शुद्ध कोणीं करावयाचा ?

असे प्रश्न या प्रवासांत त्यांस भंडावीत होते. ते मनांत म्हणत, "आमच्या नेत्यांनीं थर्ड क्लासमधून प्रवास केल्याशिवाय लोकांच्या हालांची, लोकांच्या गलिच्छ संवयांची कल्पना त्यांना यावयाची नाही. तिसऱ्या वर्गांतून प्रवास करावयाचा म्हणजे अनेक गैरसोयी सोसाव्या लागणार. ह्या सोसण्यास कोण पुढें येणार? आज याला कोणी तयार नसल्यास, नव्या दमाचे नवे सेवक नको का तयार करायला?"

**सेवकाला कोण संसार करूं देणार**

उत्तर हिंदुस्थानांत थोडासा प्रवास करून गांधीनीं मुंबईत वकिली करावयाचें ठरविलें. खटल्याचें काळजीपूर्वक अवलोकन, कायद्याचा चांगला अभ्यास, सत्यानें चालण्याचा नियम यामुळें त्यांना मुबईंत यश मिळत गेलें. हायकोर्टांत ते आपल्या खोलींत बसले असतां नामदार गोखले तेथें वारंवार येत. त्यांच्या बरोबर असलेल्या प्रसिद्ध लोकांशीं गांधींचा परिचय करून देत. एवढा मोठा नामांकित पुढारी आपली आठवण ठेवून भेटीला येतो याचें गांधींना नवल वाटे. ते म्हणत गोखलेजींचा मजवर एवढा लोभ कां? गोखले गांधींकडे इतके आकर्षिले कां गेले होते याचा सविस्तर विचार पुढें योग्य स्थळीं करूं.

मुंबईंत गांधींचें बस्तान बसूं लागलें न लागलें तोंच एके दिवशीं आफ्रिकें-तून तार येऊन धडकली की, "ताबडतोब निघून आफ्रिकेंत या. ब्रिटिश प्रधान चेंबरलेन हे परिस्थिति समजावून घेण्याकरितां स्वतः दक्षिण आफ्रिकेंत येत आहेत. आमची कैफियत तुम्हीच मांडू शकाल तरी त्वरित निघा."

झालें दक्षिण आफ्रिकेंतील मित्रांना वचन दिल्याप्रमाणें गांधी १९०२ सालीं हिंदुस्थान सोडून निघाले.

थाटलेलें घर, बायकामुलें, मातृभूमि यांना सोडून जातांना गांधींना यातना झाल्या नाहींत असें नाहीं. थोर पुरुष आणि सामान्य गृहस्थ या दोघांना आप्तेष्टांची माया सारखीच असते. त्यांचेपासून दूर होतांना त्यांना यातना

होत नाहींत असें नाहीं. पण थोर पुरुष मोठ्या कार्याकरितां किंवा दिलेलें वचन पुरें करण्याकरितां ह्या यातना सहन करण्याचें ठरवितो. या ठिकाणीं महाकवि भवभूतीचें वचन आठवतें.

**स्नेहं दयांच सौख्यंच यदि वा जानकीमपि ।**
**आराधनाय लोकांना मुंचतो नास्ति मे व्यथा ॥**

राम म्हणतो——लोक कार्याकरितां स्नेहाचे पाश, सौख्याचें आकर्षण, फारच काय माझ्या प्रिय पत्नीला सोडण्याचा प्रसंग आला तरी मी मार्गे हटणार नाहीं. प्रिय जनांचा वियोग होतांना गांधीचे मनांत असेच विचार येऊन त्यांनीं आपलें मन घट्ट केलें असेल. नाहीं का ?



# ८. सत्याग्रही युद्ध

### आफ्रिकेची शेवटची वारी

गांधी हे हिंदुस्थानांतून आफ्रिकेला एकंदर तीनदां गेले. प्रथम १८९३ सालीं म्हणजे वयाच्या चोविसाव्या वर्षी शेठ अबदुल्ला यांचा खटला चालविण्याकरितां म्हणून. दुसऱ्यांदां नाताळ प्रांतांत हिंदी लोकांच्यावर होणाऱ्या अन्यायाचा प्रतिकार करण्याकरितां १८९७ सालीं. व यानंतर ट्रान्सवालमधील हिंदी लोकांवर अन्यायी कर लादला जात होता त्याविरुद्ध लढा करण्याकरितां १९०२ मध्यें. पहिल्या खेपेला आगगाडींत त्यांना अपमानानें वागविण्यांत आलें. दुसऱ्या वेळीं बंदरावर उतरतांच गोऱ्या लोकांनीं बेदम कसें मारलें हें आपण पाहिलेंच आहे.

### ब्रिटिश प्रधान आला तसा गेला

हिंदी लोकांच्या तक्रारी वारंवार ऐकून ब्रिटिश प्रधान चेंबरलेन हा दक्षिण आफ्रिकेंतील परिस्थिति स्वतः पाहण्यास आला होता. ट्रान्सवालच्या लोकांस वाटलें कीं, गांधीच आपली बाजू निःस्पृहपणें मांडूं शकतील. पण चेंबरलेनकडून उत्तर आलें कीं, "नाताळ वसाहतींत गांधींची भेट आम्ही घेतलीच होती. तेव्हां पुनःपुन्हा त्याच त्या माणसाचें बोलणें ऐकण्यापेक्षां दुसरे लोक आले तर वरें." हें मानभावी बोलणें होतें. गांधींची भेटच त्यांना घ्यावयाची नव्हती व त्याप्रमाणें त्यांनीं ती घेतली नाहीं. मग गांधींनीं लोकांच्या तक्रारी लेखी लिहून दिल्या. त्या चेंबरलेननें वाचल्या व मला काय करतां येईल तें पाहतों असें म्हणून तो आला तसा निघून गेला.

इंग्रज मुत्सद्दी वसाहतींच्या अंतर्गत कारभारांत सहसा ढवळाढवळ करीत नसत. ते म्हणत वसाहतींच्या राज्यकारभाराबद्दल तेथील सरकारला आम्ही जाब विचारूं लागलों तर त्यांचें स्वातंत्र्य तें काय राहिलें ? यामुळें गोऱ्या लोकांनी हिंदी लोकांवर अन्याय केला तरी इंग्रज सरकार त्यांत मन

घालण्यास नाखूष असे. एखादे वेळीं जर गोऱ्यांनीं अतिप्रसंगच केला तर तेवढ्यापुरती ब्रिटिश सरकार चौकशी करी पण त्यापलीकडे जाऊन कांहींच करीत नसे. आफ्रिकेंतील हिंदी लोकांना हिंदी व्हाइसरॉयच्या परवानगीनेंच हिंदुस्थानांतून नेलें होतें. यामुळें हिंदी व्हाइसरॉय मधून मधून या अन्याया-विरुद्ध आपला संताप एखाद्या भाषणांत व्यक्त करी. मग त्या जुलमाला थोडा वेळ आळा बसे. होऊं घालणारा अन्यायी कायदा कांहीं काळ तसाच सुप्तावस्तेंत राही पण वेताळ पूर्वपदावर आल्याशिवाय राहात नसे.

शेवटीं गांधीना निर्वाणीचें अस्त्र काढून अन्यायाचा सक्रिय प्रतिकार करावाच लागला. गांधींचें अस्त्र जितकें अभिनव तितकी त्याची साधना लोकांना अपरिचित होती. म्हणून या गांधींच्या आफ्रिकेंतील लढ्याला जागतिक महत्त्व आहे.

### युद्धाची सनातन पद्धत

अन्यायाचा प्रतिकार करण्याची सनातन पद्धत ठोशास ठोसा ही आहे. पुढें ठोंशास तरवार आली. तरवारीचा प्रतिकार बाणानें झाला, व त्यावर तोड बंदुकीची निघाली. मग जुलमी लोकांनीं तोफा व बॉम्ब काढले व त्यांचा प्रतिकार ॲटम बॉम्बनें झाला. अधिक तीव्र असें अस्त्र निर्माण करून जुलूम कांहीं काळ थांबवितां येतो खरा पण त्यामुळें महायुद्धें उत्पन्न होऊन जगाला आग लागते. कमावलेली अनेकविध संपत्ति नाश पावते. नैतिक बंधन ढिलें होतें व समाजस्थैर्याच्या अभावीं लहानथोरांना त्राहि भगवान् होतें. ज्यांना महायुद्धाचे चटके बसत नाहींत ते ठोशास ठोशाची भाषा बोलतात. पण जगतांत शांतता, सुबत्ता, सुशीलता नांदावी असें ज्यांना वाटतें ते अन्या-याच्या प्रतिकारार्थ बॉम्बपेक्षां दुसऱ्या साधनाच्या शोधांत आहेत. म्हणूनच गांधींच्या निःशस्त्रप्रतिकाराकडे जगताची चिंता वाहणारे लोक आस्थेनें व आशेनें पाहूं लागले. गांधींनीं हें अस्त्र कसें चालतें हें अफ्रिकेंतील लढ्यांत पाहिलें व नंतर त्याचे प्रयोग हिंदुस्थानांत केले. तेव्हां हें अस्त्र आहे तरी कसें हें पाहूं या. या अस्त्राच्या कार्यक्षमतेबद्दल खंडनमंडनात्मक पुष्कळ लिहिलें

जात होतें व आजहि जात आहे. त्या जंजाळांत आपण शिरणार नाहीं. आपण फक्त या अस्त्राच्या प्रणेत्याची दृष्टि काय होती हें समजावून घेऊं. ती एकदां नीट समजली म्हणजे मग त्या बाजूनें अगर विरुद्ध जे जे मुद्दे आपले वाचनांत अगर ऐकण्यांत येतील त्यांचें आकलन आपल्याला सहज होईल आणि मग आपल्या विचाराची बैठक चांगली तयार होईल, नाहीं तर आपल्या घरीं येणाऱ्या वर्तमानपत्राच्या संपादकाचे विचार आपण स्वीकृत करून आपले म्हणून जगांत मिरवीत राहूं व आपलें हंसें करून घेऊं.

**निःशस्त्रप्रतिकार ?**

गांधीच्या **निःशस्त्रप्रतिकाराकडे** जगाची चिता वाहणारे लोक आस्थेनें व आशेनें पाहात होते. निःशस्त्रप्रतिकार या शब्दापुढें प्रश्नचिन्ह जें घातलें आहे तें मुद्दाम घातलें आहे. गांधींच्या युद्धपद्धतीला पाश्चात्य लोक प्रथम प्रथम निःशस्त्रप्रतिकार म्हणत. पण गांधीनीं लवकरच आपली युद्धपद्धति निःशस्त्रप्रतिकार नसून सत्याग्रहाची आहे असें प्रसिद्ध केलें.

Passive Resistance चें भाषांतर निःशस्त्रप्रतिकार या शब्दानें केलें जातें. युरोपमध्यें अन्यायाचा प्रतिकार शस्त्रांनीं करणें ज्यांना शक्य नसे ते शस्त्र हातीं न घेता फक्त कायदेभंगाचा आश्रय करून राज्यसत्तेला सतावून सोडीत. १९११सालीं इंग्लिश स्त्रियांनीं मतदानाचा हक्क मिळविण्यासाठीं मोठी गडबड केली. दुकानाचीं तावदानें फोडावीं, ट्रामला अडथळा आणावा, मोठ्या लोकांची वाटच अडवावी अशा रीतीनें कोणाच्या जीविताला धक्का न लावतां सत्ताधारी लोकांचें चित्त त्यांनीं आपल्या प्रश्नाकडे खेंचून घ्यावें. ही युद्धपद्धति दुर्बल लोक सबलाविरुद्ध वापरतात. मनुष्यप्राण्याची हत्या ज्यांना विहित वाटत नाहीं ते हा अडवणुकीचा मार्ग पत्करतात. **ही पद्धति गांधींची नाहीं. सत्याग्रही युद्धपद्धतींत शस्त्र घेत नाहींत म्हणून ती निःशस्त्रप्रतिकाराची चळवळ होत नाहीं.**

गांधी म्हणतात—**सत्याग्रह हें दुर्बलांचें शस्त्र नाहीं. निरुपाय म्हणून**

ह्या शस्त्राचा उपयोग आम्ही करीत नाहीं तर हें सर्वश्रेष्ठ साधन म्हणून याला आम्हीं हातीं धरलें आहे. हा मार्ग स्वीकारणारे लोक शूर असावे लागतात. "हरिना मार्ग शूरानों, नहीं कयर नु काम" सत्याग्रह हा शूराचाच मार्ग आहे. भित्र्याचें येथें काम नाहीं. मात्र या मार्गात एखादा मनुष्य शरीरानें अशक्त असून मनाचा बळकट असला तरी चालतो. दुबळे, दुधखुळे, लेचेपेचे यांना सत्याग्रही सैन्यांत स्थान नाहीं हें गांधींनी अनेक वेळां बोलून दाखविलें आहे.

निःशस्त्रप्रतिकारांत स्वतःच्या बलिदानाला महत्त्व नाहीं. सत्याग्रही युद्धाचा मुख्य भर स्वतः झीज सोसून प्रतिपक्षाचा हृदयपालट करण्यावर असतो, त्याला शरण आणणें हा सत्याग्रहीचा हेतु नसतो. निःशस्त्रप्रतिकारांत प्रतिपक्षी हा आपला शत्रु आहे ही भावना शिल्लक राहते. सत्याग्रही प्रतिपक्षीला आपलाच पण मार्ग चुकलेला भाऊ असें समजतो ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे शस्त्रप्रतिकारानंतरची पायरी निःशस्त्रप्रतिकार ही आहे व त्यानंतरची पण याहून सर्वस्वीं भिन्न अशा पातळीवर सत्याग्रह राहतो. ही कल्पना आपल्याला नवीन आहे. यामुळें तरुण विद्यार्थ्यांनीं हें व यापुढील विवेचन दोन तीनदां वाचावें. नंतर गांधीच्या या विषयावरील लेखांचें परिशीलन करावें. ॲटम बॉम्बचें तत्त्व समजण्यास कठिण असलें तरी तें आपण उत्सुकतेनें समजून घेतों. "नाहीं बुवा समजत" म्हणून टाकीत नाहीं. तीच वृत्ति सत्याग्रहाची मीमांसा समजावून घेतांना ठेवावी.

## सत्याग्रहींची विचारसरणी

गांधींनीं जगांत वावरतांना हें पाहिलें कीं, कोणी तरी मनुष्य कोणावर तरी जुलूम करतो, त्याला अन्यायानें वागवतो, त्याची साधनसंपत्ति अगर हक्क हिरावून घेतो. अशा स्थितींत प्रतिकार अटळ आहे, शस्त्रानें प्रतिकार करावा तर यश निश्चित नाहीं. प्रतिपक्षाजवळ साधनें अधिक व प्रभावी असली तर आपला पराभव होऊन आपण अधिकच चिरडले जातों. बरें

प्रतिकार करणाऱ्याचा जय झाला तर प्रतिपक्षी शरण येतो, दबतो पण तात्पुरताच. त्याचे मनांत मग सूडाची भावना उत्पन्न होते. जुलूम करणारांच्या वृत्तींत फरक झाल्याशिवाय युद्धें थांबणार नाहींत. मनुष्य बाह्यतः कितीहि कठोर, स्वार्थी, लुटारू, असला तरी तो मानव असल्यामुळें त्याचे हृदयांच्या खोल भागांत प्रेम, बंधुभाव ह्या वृत्ती नांदत असतात. तेथपर्यंत आपण जाऊन पोहोंचलों तर त्याच्या सद्भावनांना वर आणणें सुलभ होईल व त्या एकदां वर आल्या कीं जुलमी वृत्ति अंतर्धान पावेल. मनुष्याच्या अंतरंगांत शिरावयाला प्रेम हेंच एक साधन आहे. प्रेम हे बंधुभावाच्या पोटीं उत्पन्न होतें व हा बंधुभाव ईश्वरनिष्ठेवर अवलंबून आहे. सर्वांचा बाप ईश्वर हा आहे ही कल्पना पटली तरच सर्व मानव आपले बंधु ही कल्पना आपण करूं शकू. म्हणून ईश्वरावर आपली श्रद्धा हवी. ती असली म्हणजे आपलें हित करणारा व अहित करणारा हे दोघेहि आपले बंधु आहेत ही गोष्ट आपण विसरणार नाहीं. आपण फार तर असें म्हणूं कीं, अहित करणारा हा आपलें नातें विसरला आहे. तो विसरो बिचारा पण मी तें विसरणार नाहीं. मी त्याच्याशीं प्रेमानेंच वागेन. असें वागतांना जो त्याग मला करावा लागेल तो करीन. आपल्यावर जुलूम करणारा विशेष कठोर असला तर आपल्याला अधिक त्रास सहन करावा लागेल. मोठा त्याग करण्याचा प्रसंग येईल. अशाच वेळीं आपल्या श्रद्धेची कसोटी लागते. त्रास झाला म्हणून आपलें नातें विसरावयाचें काय ? हें नातें जो विसरत नाहीं तो सत्याग्रही होय. असा सत्याग्रही हालअपेष्टा सहन करून प्रतिपक्षाला विचार करावयाला लावतो. ठोशाला ठोसा अंगीं शक्ति असून देत नाहीं व आपलें म्हणणें सोडीत नाहीं, हें जेव्हां जुलूम करणारा पाहतो तेव्हां तो मनांत म्हणतो " हा सामनेवाला विलक्षण दिसतो. हात उगारीत नाहीं म्हणून भित्रा, दुबळा म्हणावा तर आपलें स्थान न सोडतां दुःख सहन करतो. तेव्हां हा नेहमीं भेटणाऱ्या मनुष्यापेक्षां निराळाच आहे. नेहमीं आपण असें पाहतों कीं, शूर पुरुष ठोशास ठोसा देतो, व भेकड

रणभूमि सोडून पळून जातो तसें हा मनुष्य करीत नाहीं तेव्हां हा आहे तरी कोण असा विचार त्यांचे मनांत येतो. मग तो आपल्या वर्तनाचा फेर-विचार करण्यास तयार होतो. शांतपणें, लोभविरहित वृत्तीनें मनुष्य स्वकार्याचा विचार करूं लागला म्हणजे त्याची चूक त्याचे ध्यानांत येते. इतकेंच नाहीं तर ज्याचेवर आपण अन्याय केला तो बंधुभावानें, प्रेमानें प्रेरित होऊन कष्ट सहन करीत आहे हें त्यांचे ध्यानीं आलें कीं जुलमी मनुष्याचा कठोरपणा विरघळतो. त्याची सात्त्विक वृत्ति उदय पावते. अशा रीतीनें हृदयपालट झाला म्हणजे आपल्याला शत्रु वाटणारा मनुष्य आपला मित्र बनतो आणि मग अन्यायी वृत्तीचा खरा नायनाट होऊन सत्याग्रही मनुष्याचा विजय होतो. या विजयांत उन्माद नसतो. वाममार्ग सोडून मुलगा सरळ होऊन, बापाच्या घरी आला तर बापाला जो सात्त्विक आनंद होतो तोच आनंद सत्याग्रहयाला प्रतिपक्षाच्या हृदयपालट होण्यानें होतो अशी गांधींची विचासरणी आहे. व ती अनुभवावर अधिष्ठित आहे, असे ते वारंवार सांगत असत.

### सत्याग्रही युद्धाचें तंत्र

सत्याग्रहीची विचारसरणी समजल्यावर सत्याग्रही युद्धतंत्रहि समजून घेतलें पाहिजे. आपण घरगुती सत्याग्रहाचा आतां विचार करीत नाही. जुलमी राजकर्त्यांशीं गांजलेल्या प्रजेनें सत्याग्रही युद्ध कसें करावें याचा विचार आपण करणार आहों.

### देवांचा कैपक्ष घेणें

आपला पक्ष म्हणजे न्यायाचा असावा. दोन अन्यायी पक्षांत सत्याग्रही युद्ध संभवत नाहीं. आपला पक्ष न्यायाचा आहे अशी खात्री झाल्यावर मग प्रतिपक्षाच्या जुलुमाची माहिती लोकांना देऊन त्यांची सहानुभूति मिळवावी. पण लढा जो द्यावयाचा तो ज्यांवर जुलूम होतो त्यांनींच दिला पाहिजे इतरांचा सल्ला फारतर घ्यावा. आपण दुःख सोसल्याशिवाय, त्यागाचे यज्ञांत उडी घेतल्याशिवाय प्रतिपक्षाचें मन बदलणार नाहीं. म्हणून सत्याग्रहींनीं

बाहेरील मदत कमींत कमी घ्यावी. युद्धाचे अगोदर व युद्धकालांत विधायक कार्य चालूच ठेवलें पाहिजे. शस्त्रयुद्धांत साधनसामग्री तयार करण्यांत काय थोडीं माणसें गुंततात ? विधायक कामें करतांना संघटन वाढते, सहकार्याची संवय लागते, स्वावलंबन बळावतें, हे गुण संपादन केले म्हणजे युद्ध सुलभ होतें.

सत्याग्रही—युद्ध करावयाचें ठरल्यावर प्रतिपक्षाला युद्धाची पूर्वसूचना द्यावयाची असते. प्रतिपक्षी आपला शत्रु नाहीं व युद्धांत त्याला कैद करण्याचा अगर ठार मारण्याचा प्रश्न नाही तेव्हां आपले मार्ग त्याला कळविण्यास कांहींच हरकत नसते. आपली सूचना विनम्र भाषेंत हवी. कारण आपल्याला त्याला वळवून सन्मार्गावर आणावयाचें आहे. सूचना देऊन अगर विनंती करून तो ऐकत नाहीं हें पाहातांच त्याचेशीं असहकार करण्यास प्रजेला सांगावें. त्याचे अन्यायी कायदे मानूं नये. असें आपण करूं लागलों कीं, तो चिडून आपला छळ करील. तो सहन करावयाचा पण त्याबरोबर असहकार थांबवावयाचा नाहीं व कायदेभंग चालूच ठेवावयाचा. ह्या महत्त्वाच्या गोष्टी आहेत सत्याच्या आग्रहाशिवाय नुसत्या दुःख सहन करण्याला कांहीं किंमत नाहीं. ही गोष्ट दृष्टिआड होता कामा नये.

दिधलें दुःख परानें उसनें फेडूं नयेचि सोसावें ।
शिक्षा देव तयाला करील म्हणोनि उगीच बैसावें ।।

ही विचारसरणी सत्याग्रही युद्धांत नाहीं. सत्याग्रही उगीच नाहीं बसणार. तो अन्यायाचा प्रतिकार प्राण पणाला लावून करतोच. तो जितका झिजेल तितकें यश अधिक जवळ समजावें. गुप्तता, सत्याग्रही युद्धांत मोठेंच कुपथ्य समजावें. धैर्य, त्याग, चिकटी, पुढाऱ्याचे ठिकाणीं निष्ठा याशिवाय सत्याग्रहीचें पाऊल पुढें पडत नाहीं. शस्त्रयुध्दांत कपट, गुप्तता, हुलकावणी या आनुषंगिक गोष्टी मानण्यांत येतात. सत्याग्रहींना ह्या गोष्टी कटाक्षानें टाळावयाच्या असतात. सत्याग्रही युध्दांत प्रतिपक्षी आपण होऊन सत्पक्षाकडे येतो. ज्याचा जय होतो त्यास जयाबद्दल गर्व वाटत नाहीं. चुकलेला भाऊ अगर

मुलगा घरीं यावा तसें त्याना वाटतें, हें कसे होतें हें अनुभवाशिवाय कळाव-याचें नाहीं. शंभर वर्षांपूर्वी रेडिओ मशीनवर सहा हजार मैलावरचें भाषण आपण ऐकू शकूं अशी आपल्याला कल्पना तरी होत होती का? आजसुध्दां हें कसें घडतें हें विज्ञानशास्त्राचा अभ्यास केल्याशिवाय कळत नाहीं. सत्याग्रह युद्ध जिकण्यास प्रेमशास्त्राचा अभ्यास करावयाला हवा. प्रेमलता त्यागाच्या भूमींत वाढते व त्यागवृत्तीला साध्या राह-णीचें पथ्य पाळावे लागतें, अहंभाव दूर सारावा लागतो. ह्या गोष्टी साधावयास मन बळकट करावें लागतें. तें पिळदार बनण्याकरितां कांहीं व्रतें निष्ठापूर्वक आचरावीं लागतात. शस्त्रयुद्धांत, शरीर जसे श्रम सहिष्णु करण्याकरितां दौड, जोर, बैठका, डबलबार, डोंगर चढाई यांची आवश्यकता असते त्याप्रमाणें सत्याग्रही युद्धांत व्रताचरणाची आवश्यकता असते. या व्रतांत, सत्य भाषण, कोणाचा द्वेष अगर मत्सर न करणें, वृत्ति उन्मत्त होऊं न देणें, दुसऱ्याच्या वस्तूचा अपहार न करणें, वाजवीपेक्षां ज्यास्ती वस्तूचा संग्रह न करणें, जिव्हाल्यास स्थान न देणें अशा गोष्टी येतात. गांधीनीं सत्याग्रही युद्धाचें शास्त्र एका दिवसांत तयार केलेलें नाहीं. ते अनुभवांतून तयार झालें आहे असें गांधी आग्रहानें सांगत असत. असो.

### दक्षिण आफ्रिकेतील सत्याग्रही युद्ध

गोऱ्या लोकांनीं हिंदी लोकांविरुद्ध एक एक अन्यायी कायदा पास करून त्यांचे नागरिक हक्क काढून घेण्याचा चंग बांधला. तेव्हां गांधींच्या नेतृत्वाखालीं तेथील हिंदी लोकांनी अर्ज, विनंत्या, शिष्टाई, सभा इत्यादि सनदशीर मार्गांनी सरकारला आर्जवून पाहिलें. नंतर इंग्लंड व हिंदुस्थान येथें जाऊन थोरांपुढें आपलीं गाऱ्हाणीं मांडलीं, पण त्यांचा कांहीं एक उप-योग होईना. कोणीं म्हटलें, "गोऱ्या लोकांची सत्ता मोठी आहे. तुमचे जवळ शस्त्र, बळ, पैसा, सैन्य नाहीं. तेव्हां अनुकूल कालाची वाट पाहात बसा अपमान सहन होत नसेल तर हिंदुस्थानांत परत जा." हा उपदेश तेथील लोकांना मानवणारा नव्हता. ते म्हणत ही आफ्रिकेची वसाहत तयार कर-

तांना गोऱ्या लोकांपेक्षां आम्हीं अधिक घाम गाळला आहे. तेव्हां आमच्या हक्कांची भूमि आम्हीं कां सोडून द्यावी, आम्हांला गोऱ्यांच्या बरोबरीनें नागरिक हक्क हवेत. आमचा आग्रह न्यायाचा, सत्याचा आहे. दुसरी गोष्ट गोरे बलिष्ट आहेत म्हणून भ्याडपणा अंगीकारून हिंदुस्थानांत परत जावें तर माणुसकीला कमीपणा येतो. शस्त्र, बल कमी पडत असलें तरी जुलुमी कायदा आम्हांला मोडतां येईल पण तो मोडल्याबद्दल सरकार आमचा छळ करील. पण **भ्याडपणा पत्करण्यापेक्षां छळ सोसणें जास्त चांगलें**. त्यांत **शौर्य आहे**. दुष्कीर्ति मरणापेक्षां दुःसह होय.

ही विचारसरणी आफ्रिकेंतील हिंदी लोकाना एकदम सुचली नाहीं. गांधीनीं त्यांना ती शिकविली. तेथील हिंदी लोक अशिक्षित, दबलेले म्हणून भित्रे असेच बहुतेक होते. पण गांधींनीं या मूक जनतेंत एखाद्या जादुगाराप्रमाणें आपल्या मंत्रानें सजीवता आणली इतकेंच नव्हे तर त्यांना शूर सैनिक बनविलें. या सैनिकांच्या बलावर त्यांनीं बलिष्ठ शक्तीशीं विनाशस्त्रानें लढा दिला.

आफ्रिकन सरकारनें असा एक कायदा केला होता कीं, ट्रान्सवालमध्यें विनापरवाना प्रवेश करतां कामा नये. गोऱ्या लोकांना हे परवाने सहज मिळत पण काळयांना मिळत नसत. मग गांधींनीं हा कायदा मोडण्याचें ठरविलें. सत्याग्रही स्त्री–पुरुषांची सेना तयार केली व ते दरबानपासून या सेनेला घेऊन ट्रान्सवालला जाण्यास पायीं निघाले. या दौडीची जाहिरात खूप झाली. दर मुक्कामाला नवे नवे सत्याग्रही येऊन मिळत. या चालीला यात्रेचें अव्यवस्थित स्वरूप आलें असतें. पण गांधींनीं स्वयंसेवकांचे मदतीनें या लोकांमध्यें सैनिक शिस्त आणली होती. यामुळें गोरे लोक आश्चर्यचकित झाले. स्त्रिया सत्याग्रहार्थ कायदेभंग करण्यास सुसज्ज झालेल्या पाहून जगतांतील स्त्री-पुरुषांनीं तोंडांत बोटें घातलीं. गांधींवर पैशाचा व अभिनंदनाचा नुसता वर्षाव झाला. पण ते या स्तुतीनें हुरळून गेले नाहींत. आपल्या सैन्याचें धैर्य टिकवणें यांत सेनापतीचें कौशल्य असतें. ट्रान्सवालच्या हद्दींत गांधींनीं

प्रथम प्रवेश केला, नंतर इतर शिरले. सैनिकांत बेदिली व सेनापतीबद्दल अविश्वास उत्पन्न करण्याकरितां गांधींना **दोन महिन्यांची** व **इतरांना सहा महिन्यांची शिक्षा दिली गेली**. गांधींनीं कोर्टाला सांगितलें कीं, मी कायदेभंग स्वत: करून व लोकांस उत्तेजन दिलें तेव्हां मला **सर्वांत जास्त शिक्षा** द्यावयाला हवी. पण कोर्टानें वरील कारणाकरितां गांधींना दोनच महिन्यांची शिक्षा दिली. तेव्हां गांधींनीं शरमेनें मान खालीं घातली.

तुरुंगांत सत्याग्रह्यांना नाना प्रकारांनीं छळ झाला. आज आपण या गोष्टींना सरावलों आहोंत. पण १९१३–१४ सालीं तरी या गोष्टी जनतेला नवीन होत्या. पहिला प्रसंग असून सत्याग्रही स्त्री–पुरुषानीं अपूर्व असें धैर्य दाखविलें तेव्हां जनरल स्मटस्‌नें गांधींशीं समेट केला व तीन पौंडांचा कर माफ करण्यास आश्वासन दिलें. मग हा लढा थांबविण्यांत आला.

समेट झाला त्या वेळीं गांधींची प्रकृति बिघडली होती म्हणून ते हिंदुस्थानांत यावयास निघाले. मध्यंतरीं इंग्लंडमध्यें गोखले विशेष आजारी पडले होते. म्हणून गांधी इंग्लंडला गेले. नंतर ते हिंदुस्थानांत आपल्या परिवारासह आले. यानंतर इकडील राजकारणांत इतके पडले कीं, त्यांना आफ्रिकेला पुन्हां जाणें शक्य झालें नाहीं. आफ्रिकेंतील सत्याग्रही लढा १९०६ पासून कमी अधिक प्रमाणांत १९१४ सालच्या सुरुवातीपर्यंत चालला. त्यांत गांधींना तीन वेळां शिक्षा झाली. या लढ्यांत व तुरुंगांत गांधींना अनेक नव्या गोष्टी शिकावयास मिळाल्या. जनतेचा स्वभाव कळला. सामान्य मनुष्याच्या शक्तीचा अंदाज लागला. अशा युद्धांत कोणतीं विघ्नें हटकून उत्पन्न होतात, युद्ध चेतवावयाचें कसें व केव्हां, समेट केव्हां व कोणत्या अटीवर करून जनतेचा आत्मविश्वास कायम राखावयाचा अशा एक ना अनेक गोष्टींचा अनुभव गांधींनीं घेतला. यांतूनच पुढें सत्याग्रह शास्त्र तयार झालें.

### युद्धाची फलश्रुति

कोणत्याहि युद्धाचे फायदे व तोटे तत्काळ ध्यानांत येत नाहींत. हें युद्ध केलें म्हणून तेथील हिंदी जनतेला विशेष हक्क सरकारनें दिले असें नाहीं. पण एक

गोष्ट निश्चित झाली कीं, सरकार हिंदी लोकांना वचकू लागलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांचा बेकायदा छळ बंद झाला. लोकांत संघटना वाढली, सामुदायिक चळवळीचें महत्त्व व तंत्र लोकांना कळलें. हिंदी तेवढा एक ही भावना उत्पन्न होऊन गोऱ्या लोकांत हिंदी लोकांचें वजन वाढलें. सार्वजनिक कार्याकरितां त्याग केला पाहिजे ही गोष्ट हिंदी मजुरांना पटली. सत्याग्रही युद्धांत श्रीमंतांना गरिबांबरोबर राहण्याचा प्रसंग आला त्यामुळें श्रीमंताचा अहंकार कमी झाला व गरीब मजुरांचा आत्मविश्वास वाढला. ह्या नैतिक फायद्याची किमत अनमोल आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे गाधींनी मुक्या, जनावराच्या वृत्तीनें वागणाऱ्या लोकांना वीर बनविलें. पण हें साध्य होण्याकरितां गांधींना बॅरिस्टरच्या बाह्य वैभवाचा त्याग करून फकिरी पतकरावी लागली. ही फकिरी त्यानी बाह्य वेशा-पुरतीच मर्यादित न करितां आपलें अंतरंगहि फकिराचें बनविलें. तें बनवितांना त्यांना दीर्घ तपश्चर्या करावी लागली.

१८९३ सालीं गांधी व्यावहारिक दौलत मिळवावयास आफ्रिकेंत गेले ती त्यांनीं कल्पनेबाहेर मिळविली व ती तेथेंच लोककार्यार्थ खर्चून टाकली. जातांना ते बॅरिस्टर म्हणून गेले व येतांना ते **बॅरिस्टरचे फकीर बनून आले**. कोणीं म्हणाले ही परागति आहे, कोणी म्हणाले गांधीना अवदसा सुचली आहे. पण गाधींना तसें वाटलें नाहीं. श्रीमंतानी त्यांचा नाद सोडला पण असें हें नेहमींच होते. लोखंडाचा परिसाशीं संबंध झाला कीं, तें यथार्थनाम सुवर्ण बनतें पण मग लोहचुबक त्याला आकर्षून घेत नाही. श्रीमंत दूर झाले पण सामान्य जनता जवळ आली. गांधीना तेंच पाहिजे होतें. आफ्रिकेंतील जनतेनें त्यांना जितक्या प्रेमानें अश्रू गाळीत निरोप दिला तितक्याच आनंदाच्या आश्रूंनीं गांधींना हिंद जनतेनें स्वागत करतांना न्हाऊं घातलें.

## ९. मुशाफीर घरीं आला

१९१५ सालच्या जानेवारी महिन्यांत गांधी मुंबई बंदरांत उतरले. मधून मधून ते हिंदुस्थानांत येऊन गेले तरी १८९३ पासून १९१४ अखेर म्हणजे बावीस वर्षांचा दीर्घकाल त्यांनीं आफ्रिका खंडांत काढला. इंग्लंडाहून येतांना त्यांनीं हिंदुस्थानच्या लोकांकरितां ज्याप्रमाणें कांहीं नव्या चिजा आणल्या होत्या त्याप्रमाणें याहि वेळीं त्यांची सूटकेस अनेक अभिनव चिजांनीं कशी भरलेली होती हें आपण मागच्या प्रकरणांत पाहिलेंच आहे. आपला बंधु त्रिखंड कीर्ति मिळवून घरीं आला आहे. त्यानें आपल्याकरितां काय काय मजेदार वस्तू आणल्या आहेत हें पाहण्याची गांधींच्या देशबंधूंना उत्सुकता होती पण गांधींचे गुरु जे नामदार गोखले यांनीं त्यांना बजाविलें कीं, अरे बाबा तुझ्या सूटकेसमध्यें ज्या चमत्कारिक चिजा आहेत त्या एकदम येथल्या लोकांना दाखवूं नकोस, तूं आपली पेटी उघडूंच नकोस असें मी म्हणत नाहीं पण प्रसंगा प्रसंगानें त्या चिजा तूं बाहेर काढ नाहीं तर त्या चिजा पाहून लोक बिचकतील आणि तुझ्यापासून दूर पळून जातील.

गुरूचा उपदेश गांधींनीं शिरसावंद्य मानला.

### गोखल्यांचें आशास्थान

१८९६ साली गांधींना गोखल्यांनीं पाहिलें. तेव्हापासून गांधींविषयीं त्यांना आकर्षण वाटूं लागलें. गांधींचा प्रांजळपणा, लीनता, सत्यप्रीति, चिकाटी, इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व वगैरे गुण पाहून गोखल्यांना वाटे कीं, हा मनुष्य जर आपल्याला सहकारी मिळाला तर बरें होईल. वाढत्या वयाबरोबर गोखल्यांची वृत्ति अधिकाधिक धार्मिक होत चालली होती. राजकारणाला नैतिक अधिष्ठान आणि धार्मिक पावित्र्य हवें असें ते अलीकडे बोलूं लागले होते. गांधींचीं पावलें आपल्या कल्पनेप्रमाणें पडत आहेत हें पाहून गोखल्यांना वाटे कीं आपल्या मागें आपली जागा घेण्यास हा पुरुष योग्य आहे,

म्हणून गोखले गांधींना आपल्याकडे ओढीत होते. १९०१ सालीं गांधी जेव्हां कलकत्त्यास गेले तेव्हां गोखल्यांनीं त्यांना आपल्या बिऱ्हाडीं आग्रहानें नेलें व त्यांची व्यवस्था उत्तम ठेविली. इतकेंच नाही तर कलकत्त्यांतील थोरामोठ्यां-च्या ओळखीहि करून दिल्या. गांधींनीं तिसऱ्या वर्गानें प्रवास करावयाचें ठरविलें तेव्हां गोखल्यांनीं आपल्या हातानें त्यांचा फराळाचा डबा भरून दिला व स्टेशनवर त्यांना पोहोंचावयास गेले. तुम्ही एवढी तसदी कशाला घेतलीत असें गांधी म्हणाले. तेव्हां गोखले म्हणाले "तुम्ही पहिल्या वर्गानें बॅरिस्टरच्या थाटांत प्रवासास निघाला असतां तर कदाचित् आलों नसतों पण तिसऱ्या वर्गांतील प्रवाशाचे हाल समजून घेण्याकरितां तुम्ही तिसऱ्या वर्गानें निघाला म्हणून स्टेशनवर मुद्दाम आलों." या उत्तरांत गोखल्यांना गांधींची लोकसेवापद्धति मान्य होती इतकेंच नाहीं तर त्याबद्दल आदरहि वाटत होता असें दिसतें. गोखले हे नेमस्त विचारसरणीचे गृहस्थ; तेव्हां गांधींची सत्याग्रही युद्धाची कल्पना त्यांना किती रुचली असती हा प्रश्न होता, तरी पण त्याला त्यांचा संपूर्ण विरोध खास नव्हता. त्यांतील स्वत: कष्ट सोसून प्रतिपक्षाचा हृदयपालट करण्याची कल्पना गोखल्यांच्या प्रेमळ स्वभावास सहज आवडणारी होती. गांधींच्या चळवळींत हिंसेला स्थान नसल्या-मुळें तर गोखल्यांच्या राजकीय धोरणाच्या जवळजवळ ती येत होती. येऊन जाऊन कायदेभंगाबद्दल दुमत होणार होतें. पण गांधींचा स्वभाव दुसऱ्याशीं जुळतें करून घेण्याचा होता तेव्हां गांधी व आपण सहकार्यानें वागूं अशी गोखल्यांना आशा वाटत होती. गांधींसारखा शुद्ध चारित्र्याचा पुरुष आपल्या संस्थेचा जर प्रमुख झाला तर काय काय होईल याच्या मनोहर कल्पना करण्यांत गोखले सुख मानीत होते. ते मनाशीं म्हणत अहाहा! काय तें विमल चारित्र्य, काय तें लोकोत्तर व्यक्तिमत्व, काय ती प्रेमळ सेवावृत्ति, काय तो त्याग, काय तें धैर्य, हजारों अशिक्षित दलित लोकांत वीरवृत्ति उत्पन्न करण्याची ती शक्ति पाहून वाटतें कीं, "या पतित राष्ट्राचा उद्धार करण्याकरिता देव मनुष्यरूप घेऊन तर आला नाहीं ना? हा

मनुष्य जर आपल्याला पचवितां आला तर, माझी संस्था रानड्यांचें स्वप्न सत्यसृष्टींत आणण्यास समर्थ होईल" श्री रामकृष्ण परमहंस यांना स्वामी विवेकानंदांबद्दल जें प्रेम व जी आशा वाटत होती तीच गोखल्यांना गांधी-बद्दल वाटत होती म्हणून तर त्यांनीं गांधींना आपल्या संस्थेचा सभासद करून घेण्याची शिकस्त केली पण भारत सेवक समाजाच्या दूरदर्शी व आपली शक्ति ओळखणाऱ्या सभासदांनीं गोखल्यांना स्पष्ट सांगितलें कीं, "गांधी थोर गृहस्थ असले तरी आपल्या संस्थेच्या धोरणाशीं त्यांचें जमावयाचें नाहीं." गोखल्यांना हा निर्णय आवडला नाहीं. ब्रिटिशांच्या राजकीय धोरणाबद्दल पू. दादाभाईप्रमाणें ते निराश झाले होते कीं काय कोण जाणें. ह्या राज्यसत्तेला गदगदा हलवून वठणीवर आणील तर हाच पुरुष. असा पुरुष कांहीं तरी सबब काढून घालविणें हें कामधेनूला ओढाळ म्हणून घालविण्यासारखें होणार आहे. असेंहि ते मनाशीं पुटपुटले असतील. ब्रिटिशांची ताठरवृत्ति यत्किंचितहि नरम होत नाहीं, जहालांनीं आपला समेटाचा हात झिडकारला आहे आणि आज गांधीहि आपल्या हातचे जातात हें पाहून गोखल्यांनीं निराशेनें मान मागें टाकून प्राण सोडला ! गोखले गेल्यावर गांधींनींहि दूरवर विचार करून भारत सेवक संस्थेंत शिरण्याचा नाद सोडून दिला. गोखल्यांनीं मरणापूर्वीं आपल्या चिटणिसास सांगून ठेवलें होतें कीं, "गांधी आपल्या संस्थेचे सभासद झाले नाहींत तरी त्यांचे स्वतःचे व आश्रमाचे खर्चास जे पैसे लागतील ते देत चला." हाच गुरूचा प्रसाद समजून गांधी गुजराथेंत गेले व तेथें त्यांनीं १९१५ सालीं **साबरमती तीरावर** आश्रम काढला व त्याला **सत्याग्रहाश्रम** हें नांव दिलें. या आश्रमाच्या स्वरूपाविषयीं विशेष असें पुढें लि .

**तीर्थयात्रा**

विद्याभ्यास पूर्ण करून संसारास लागण्यापूर्वीं विद्यार्थ्याला तीर्थयात्रा करण्यास प्राचीन गुरु पाठवीत असत. ही रीत हिंदुस्थानांतच होती असें नाहीं, तर युरोपांत देखील अशीच पद्धत होती. महाकवि मिल्टन यानें आपला विद्या-

भ्यास संपविल्यावर युरोप खंडभर हिंडून निरनिराळ्या विद्यापीठांत जाऊन तेथील आचार्यांचा परिचय करून घेतला. मनुष्यानें जर डोळे उघडून प्रवास केला तर पुस्तकांत जे नाही असें किती तरी उपयुक्त ज्ञान त्याला होऊं शकतें आणि मग संसार करतांना त्याची पावलें चुकत नाहीत. नामदार गोखल्यांनीं पाहिलें कीं, गांधीन तेज आहे, निःस्पृहता आहे, त्यागांत ते कोणालाहि हरणार नाहींत, हिंदुस्थानचें स्वातंत्र्य हे त्याचें ध्येय आहे, अशा पुरुषाचे उद्योग यशस्वी होण्याला त्याला परिस्थितीचें यथार्थ आकलन झालें पाहिजे म्हणून त्यांनीं गांधींना सांगितले की, " हिंदुस्थानांत हिंडून ये. लोकस्थिति अवलोकन कर, इंग्रजांच्या शक्तीचा अंदाज घे, तेथील पुढाऱ्यांची विचार-सरणी व हिंमत लक्षात आण मग आपला कार्यक्रम ठरव." मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें हा उपदेश शिरसावंद्य मानून गांधींनीं प्रवासास आरंभ केला.

**अनिष्ट घाई**

गांधी हिंदुस्थानांत येण्यास निघाले तेव्हां त्यांची प्रकृति आमांशानें बिघडलेली होती येथे आल्यावर त्यांनीं लगेच सुदीर्घ असा प्रवास आरंभला, त्यामुळें त्यांना विश्रांति अशी मिळूच शकली नाही. त्यांची मूळची कणखर प्रकृति जी ढासळली ती अखेरपर्यंत सावरलीच नाही. १९१४ पासून जवळ जवळ त्यांनीं तीन तपे हिंदुस्थानांत इतका उद्योग केला की, तो पाहून लोक आश्चर्यचकित होत. पण ही कार्ये त्यांचे हातून उरकली याचें कारण त्यांनीं पुढें पुढें प्रकृतीची विशेष काळजी घेतली. पण १९१४ ते १९१८ पर्यंत त्यांना कार्याची जणूं घाईच सुटली होती. त्यांनीं साबरमतीच्या तीरावर आश्रम स्थापन केला खरा, पण सार्वजनिक कार्यांनी त्यांचा इतका वेळ घेतला कीं, आश्रमांत दीर्घकाल राहणें त्यांना अशक्य झालें. सुदैवानें श्री. मगनलाल-सारखीं माणसें त्यांना मिळाली व त्यांनीं गांधींची विचारसरणी नीट समजावून घेऊन आश्रमाला चांगलें वळण लावलें.

**प्रवासाचें धोरण**

कांहीं लोक सृष्टीनिरीक्षणार्थ प्रवास करतात, ते वनें, पर्वत, नद्या, सरोवरें, अवलोकन करतील, त्यांचें अनुपम सौंदर्य पाहून स्वतःला कृतार्थ समजतील. कांहीं लोक ताजमहाल, गोलघुमट, उंच उंच गोपुरें, डोंगरांतील लेणीं अवलोवन करीत फिरतात. टिळक किंवा गांधींसारख्या पुरुषांना नैसर्गिक सौंदर्य आकर्षित नाहीं. ते निसर्गापेक्षां मानवी सृष्टीकडे अधिक आकर्षिले जातात. **टिळक** जेव्हां विलायतेला गेले तेव्हां त्यांनीं इंग्लंडमधील ऐतिहासिक स्थळें क्वचितच पाहिलीं. **स्कॉटलंड**मधील सुंदर सुंदर सरोवरांनीं त्यांचें मन आकर्षित झालें नाहीं. ते आपले मानवी सृष्टींतच गर्क होऊन राहिले होते. तीच स्थिति गांधींची होती. त्यांनीं कलकत्त्यांत शिरतांना **हुगळी** नदीकडे नुसता कटाक्ष फेकला. तिचें तें विशाल पात्र पाहून ते क्षणभर तटस्थ झाले आणि लगेच आपल्या कार्याला लागले.

**नवे डोळे**

कलकत्त्याला गांधी **भूपेंद्रनाथ बसू** यांचेकडे उतरले होते. भूपेंद्र हे कलकत्त्यांतील एक बडे धेंड होते. कायदेपंडित म्हणून त्यांचा जेवढा लौकिक होता तेवढाच कॉंग्रेसचे एक बडे नेते म्हणून होता. बंगाली वकिलांची प्राप्ति इकडच्या वकिलांच्या प्राप्तीच्या मानानें बरीच मोठी असते. आणि प्राप्तीच्या मानानें त्यांची राहणीदेखील थाटामाटाची असते. सामान्य मनुष्य त्यांच्या दिवाणखान्यांत गेला तर गोंधळूनच जावयाचा. जिकडे तिकडे लखलखाट व चमचमाट. गांधी आपल्या आत्मचरित्रांत लिहितात कीं, " भूपेंद्रबाबूंच्या घरचा थाटमाट पाहून गोंधळून गेलों. " गांधींसारखा थोर पुरुष आपल्या घरीं पाहुणा आला म्हणून भूपेंद्रांनीं त्यांच्या सन्मानार्थ बडी मेजवानी दिली. भोजनास निवडकच मंडळी होती. पण सकाळपासून संध्याकाळपर्यंत घरांतील सर्व स्त्रिया पाकसिध्दचर्थ राबत होत्या. गांधींना फळें आवडतात म्हणून कलकत्त्याच्या मंडईतून सर्व तऱ्हेचीं फळें आणलेलीं होतीं. भाज्यांची तर गणना करणेंच मुष्किल. दुसरा एखादा भोजनप्रिय पाहुणा असतां तर, हा थाट

पाहून खूष झाला असता आणि भूपेंद्रांना त्यानें शतशः धन्यवाद दिले असते. गांधींना निराळीच दृष्टि प्राप्त झाली होती. ते या सत्कारपद्धतीकडे **नव्या डोळ्यांनीं** पाहात होते. ते म्हणत एका माणसाला एक वेळचें अन्न तें किती लागणार, तें तयार करावयाचें तर तास दीडतास पुरे आहे. मग हे सकाळ-पासून संध्याकाळपर्यंत झालेले कष्ट व्यर्थ नव्हेत का ? यात कालाचा, श्रमाचा, पैशाचा व वस्तूंचा केवळ अपव्यय आहे. इतकेंच नव्हे तर यजमान आणि अतिथी यांचा अहंकार अशा प्रकारानें वाढतो.

गांधींना एक दोन ठिकाणीं अशाच थाटाच्या मेजवान्या झाल्या. त्यांनीं शरीरपोषणास लागणाऱ्या साध्या अन्नाचें सेवन करण्याची स्वतःला संवय लावून घेतली होती. रसनेच्या गुलामगिरींतून ते सुटले होते. यामुळें रसनेच्या गुलामगिरींत शिरण्याची ही वैभवशाली तयारी पाहून गांधींना मनापासून चीड आली आणि भोजनांत पांच पदार्थांपेक्षां सहावा पदार्थ घ्यावयाचा नाहीं असा त्यांनीं या प्रसंगानंतर निश्चय केला. यामुळें पोळी, तूप, भाजी, मीठ, दूध याशिवाय अधिक पदार्थ ते आहारांत घेत नसत. आंब्यासारखें फळ घ्यावयाचें तर तुपाला फांटा ते देत. या व्रतामुळें पुष्कळदां अडचणी आल्या, पोटभर अन्न खातां येईना. पण एकंदरीनें आपली प्रकृति चांगली राहून माझे यजमानांचे श्रम व साहित्य वांचलें, असा अभिप्राय गांधींनीं एके ठिकाणी व्यक्त केला आहे.

आपल्या चरित्रातील अशा प्रसंगास गांधी फार महत्त्व देतात. सेनापती बापटांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं भोगी लोक हे ।। "**निकामी क्रांति-कार्यांत, असोत बहुभाषक**" ।। "**रसनेचा जो अंकित झाला.........तो नर योगाभ्यासा मुकला.**।" असेंही एक कविवचन आहे. राष्ट्राचा गाडा ज्याला ओढावयाचा आहे त्याची संयमशक्ति फार वाढलेली हवी.. अशी शक्ति ज्यांची वाढलेली नव्हती त्यांनीं स्वातंत्र्यसंग्रामांत कच खाल्लेली आहे. **गांधींचें आस्वादव्रत हें शरीर कृश करण्याकरितां कधींच नाहीं हें** लक्षात ठेवलें पाहिजे. शरीर कार्यक्षम ठेवण्यावर त्यांचा कटाक्ष होता. याकरितां

तर ते आहाराचे सारखे प्रयोग करीत. शरीर ज्यानें सुदृढ, व चपल राहील तेंच खावें. हितभुक् मितभुक हा त्यांचा दंडक होता. या दृष्टीनें त्यांना मेजवान्यांची किळस आली असल्यास नवल नाही.

**लोकांचा गलिच्छपणा**

याच काळांत ते ब्रह्मदेशांत जाऊन आले. बोटीत बसल्यावर जिकडे तिकडे दुर्गंधी पसरलेली त्यांस आढळली. शौचकूपांत दुर्गंधी पसरलेली होती, इतकेंच नव्हे तर प्रवाशांनीं आपल्याभोंवतीं कमालीची घाण करून ठेविली होती. बोट म्हणजे हिंदी लोकांच्या गलिच्छ संवयांचें एक प्रदर्शनच होतें. जो तो आपल्यापुरतें पहात होता व निर्मळ जीवनाबद्दल बेफिकीर होता. सर्वत्र शिस्तीचा अभाव असे **बेशिस्त लोक, शिस्त ज्यांच्या रोमरंध्रांत भिनली आहे अशा इंग्रजांशीं सामना कसा देणार?** हा प्रश्न गांधींच्या मनांत सारखा उभा राही.

**कुंभ मेळा**

जी गोष्ट बोटीत तीच त्यांना कुभमेळयांत हरद्वार येथें आढळली. बारा वर्षांनीं हा मेळा भरतो. पंधरा वीस लाख यात्रा या प्रसंगी येते राम-कृष्ण मिशन, भारत सेवक समाज अशासारख्या संस्थांचे लोक तेथें व्यवस्था करण्यास जातात. भारत सेवक समाजाच्या लोकांच्या विनंतीवरून गांधींच्या परिवारानें हरद्वारला यात्रेकरूंची सेवा केली. परंतु सेवेकरी थोडे व यात्रेकरू बेशिस्त. यामुळें या क्षेत्री पवित्र्याच्या दर्शनाचे ऐवजी दुर्गधींचें साम्राज्य त्यांस दिसलें. तेथे जमलेले लोक स्वतःस धार्मिक वृत्तीचे म्हणवीत होते आणि पवित्र गंगा नदीचा किनारा दुर्गंधीनें भरून टाकीत होते. थोडी गैरसोय सोसून डोंग-रांत जावें हेंहि या लोकांना सुचत नव्हतें.

गांधीं या प्रसंगाचें वर्णन करितांना म्हणतात की, "माझी माणसें सफा-ईचें काम करण्यांत गुतलीं असतां मला यात्रेकरूंनीं वेढून टाकलें होतें. जो तो माझें दर्शन घेऊन पवित्र होऊं पाहात होता. मी काय म्हणतों याकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें. ज्याला त्याला दर्शनाची व पादवंदनाची घाई सुटली होती.

पादवंदन केल्याचें सर्टिफिकिट मिळालें कीं आपला उद्धार नक्की होणार अशी लोकांची समजूत होती. धर्म **कर्तव्यांत नसून दर्शनांत आहे ही भोळी समजूत काढून टाकल्याशिवाय राष्ट्राचा उद्धार होणार नाहीं अशी खूणगांठ गांधींनीं या कुंभमेळ्यांत मनाशीं बांधली.**

मद्रासकडच्या दौऱ्यांत गांधींना कांहीं ठिकाणीं व्याख्यानें द्यावीं लागलीं. या व्याख्यानांत त्यांनीं आपल्या विचारसरणीची कांहींशी कल्पना लोकांना करून दिली. त्यांचीं भाषणें अपरिचित कल्पनांनीं भरलेलीं होतीं. यामुळें लोक गांधींची भूमिका नीट समजूंच शकले नाहींत, तरी पण त्याचे थोर गुण पाहून लोकांनीं त्यांचें स्वागत हर्षभरानें केलें.

गांधीनीं आपल्या भाषणांनीं मद्रासी लोकांना थोडें गोंधळांत टाकलें पण जबर धक्का जो लोकांच्या मनाला दिला नव्हता तो बनारस युनिव्हर्सिटीच्या उत्सवप्रसंगीं दिला. गांधीनीं या प्रसंगीं आपल्या विचारांचा बॉम्बगोळाच टाकून आपण कोण आहों हें जनतेस दाखविलें. गांधीचें तें विश्वरूपदर्शन पाहून राजेरजवाडे व नेमस्त लोक गोंधळले आणि पळून गेले. हा प्रसंग महत्त्वाचा आहे म्हणून त्याचें सविस्तर वर्णन देणें अप्रस्तुत होणार नाहीं.

**लग्नांत अनपेक्षित विघ्न**

श्री. मदन मोहन मालवीय आपल्या अलौकिक निर्मल चारित्र्यानें व अविरत लोकसेवेनें लोकांच्या आदरास पात्र झाले होते. त्यांना हिंदू संस्कृतीचा मोठा अभिमान होता. या संस्कृतीचा ओघ अखंड राहावा, त्यांचें अध्ययन तरुण पिढीनें करावें म्हणून त्यांनीं हिंदू विश्वविद्यालय काढण्याचें ठरविलें. मुलांचें शिक्षण एकांगीं होऊन तीं जगाच्या ओघांतून दूर फेकलीं जाऊं नयेत म्हणून त्यांनी पाश्चात्य शिक्षणाचा समावेश या विश्वविद्यालयांत केला व सरकारची मान्यता या संस्थेस मोठ्या कष्टानें मिळविली. आपलें विश्वविद्यालय ही संस्था केवळ परीक्षा घेणारी राहूं नये तर शिक्षण देणारी व्हावी म्हणून या संस्थेचा व्याप पंडित मालवीयजींनीं प्रचंड प्रमाणावर वाढविला व या कार्यांत लागणारा पैसाहि एक

कोटीच्यावर त्यांनीं राजेरजवाडे यांचेपासून मिळविला. या त्यांचे कार्याला देशांतील अनेक विद्वानांची सहानुभूति होती. ॲनीबिझांट यांनीं आपली पुण्याई व आशीर्वाद या संस्थेला दिला होता. सर्वांकडून उत्तम साहाय्य मिळाल्यामुळें पंडितजीनीं मोठ्या हौसेनें संस्थेचा कोनशीलासमारंभ थाटानें करावयाचें ठरविलें. अनेक राजेरजवाडे, थोर थोर अधिकारी, बडे बडे वकील, राजकरणी मुत्सद्दी, अनेक शास्त्रांत पारंगत असे पंडित यांना निमंत्रणें पाठविलीं होतीं। थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे देशांतील सत्ता, वैभव व पांडित्य मालवीयजींनीं एकत्रित केलें होतें. पंडितजीचें निमंत्रण स्वीकारून गांधी या वैभवशाली समारंभाला उपस्थित राहिले. समारंभास जातांना काशींतलें प्रचंड भिकार त्यांचे दृष्टीस पडत होतें. लोकांचें हें दारिद्र्य पाहून त्यांचे हृदयांत कालवाकालव चालली असतांना ते मंडपांत शिरले, तों त्यांना तेथें काय दिसलें--लहान मोठे राजे रेशमी जरतारी पोशाख परिधान करून अंगावर हिऱ्या मोत्यांचे दागिने घालून उच्चासनावर बसले आहेत, त्यांच्या दुसऱ्या बाजूला वकील, बॅरिस्टर, बडेबडे सरकारी अधिकारी परदेशीय उंची उंची वस्त्रांनीं विभूषित असे वेत्रासनें अलंकृत करीत आहेत, व सामान्य लोक व विद्यार्थी दूरवर कांहीं उभे व कांहीं बसलेले आहेत. ह्या श्रीमंत समाजाकडे पाहून एखाद्याला वाटावें की, हिंदुस्थान ही कुबेर भूमि आहे व येथें लक्ष्मीचा निवास अखंड आहे.

स्वागतपर पद्यें झाल्यावर मालवीयजींनीं अहवाल वाचला व या संस्थेला मदत करण्याऱ्या राजेरजवाड्यांची भरमसाट स्तुति केली. अध्यक्षांनीं व इतर वक्त्यांनीं पंडितजींना व आश्रयदात्यांना त्रिवार धन्यवाद दिले. कोणी या संस्थानिकांना धर्माचे रक्षक म्हटलें तर कोणीं त्यांच्या औदार्याची स्तुति केली. पंडितजींनीं गांधींनाहि बोलण्याचा आग्रह केला. प्रथम त्यांनीं नकार दिला. पण पंडितजी त्यांना कसचे सोडतात. फार आग्रह केला तेव्हां गांधींनीं तोंड उघडलें. गांधी हे सुस्वभावाबद्दल व मधुर वाणीबद्दल प्रसिद्ध होते. पण आज शीतल मधुर जलाचा वर्षाव

करणाऱ्या कारंजानें ज्वालामुखीचें स्वरूप धारण केलें आणि त्यांतून तप्त रसाचा वर्षाव होऊं लागला. गांधी म्हणाले " हे राजे महाराजे लोक हो, तुमची स्तुति धर्मात्मे म्हणून होत आहे ही खरी आहे का ? या मंडपाच्या बाहेर जाऊन पहा. सर्वत्र दुष्काळ, दारिद्र्य, रोग यांचें साम्राज्य पसरलेलें आहे. देशबांधव थंडीनें कुडकुडत असतां ही मौल्यवान् वस्त्रें तुम्हांला घालवतात तरी कशीं ? " गांधीना विषयांतर करूं नका म्हणून इशारा मिळाला पण गांधींनी तिकडे लक्ष दिलें नाहीं. ते आज दुःखितांच्या दुःखानें पेटले होते. ते पुढें म्हणाले "सज्जन हो! ही तुमची उंची वस्त्रें व मौल्यवान् दागिने तुम्ही कोठून आणलेत ? तुमच्या प्रजेला लुबाडून त्यांना भिकेस लावून हें वैभव तुम्ही मिरवितां याची तुम्हांला लाज वाटली पाहिजे." हें भाषण ऐकून ॲनीबिझांट गोऱ्यामोऱ्या झाल्या. अधिकाऱ्यांचे कान लाल झाले. राजे लोकांना काय करावें हें समजेना. अध्यक्ष घंटा वाजवून सूचना देऊन थबकले व शेवटीं उठून गेले. त्यांचेबरोबर बिझांटबाई गेल्या. मंडपांतील प्रतिष्ठित लोकांच्या जागा रिकाम्या झाल्या. गांधींनी अधिक्षेप केला. शिष्टाचाराचा भंग केला असें प्रतिष्ठित लोक म्हणत बाहेर गेले. पण विद्यार्थी व सामान्य लोकांनीं टाळ्यांचा कडकडाट करून गाधीच्या ज्वलत्जहाल भाषणाचें स्वागत केलें.

या भाषणानंतर कांही वर्तमानपत्रांत गांधींवर खूप टीका झाली तर कांहींनीं म्हटलें गांधी खोटे तें काय बोलले ? आजपर्यंत नेमस्त व श्रीमंत लोकांत मान्यता पावलेले गांधी आज समाजाच्या वरच्या थरांत एकदम अप्रिय झाले व त्याबरोबर सामान्य जनतेला वाटलें कीं, हाच पुरुष गरीबांचा खरा वाली व निःस्पृह व स्पष्टवक्ता आहे, हाच आमचें नेतृत्व करूं शकेल.

### गांजलेल्यांचा वाली

गांधींची कीर्ति दीनांचा कैवारी म्हणून पसरली होती पण त्यांच्या पराक्रमाचा प्रत्यक्ष प्रत्यय अजून हिंदुस्थानच्या लोकांस आला नव्हता. हिंदुस्थानांत अन्यायाला काय तोटा. काठेवाड संस्थानें व इंग्रजी अंमलाचा प्रांत यांचे सर-

हद्दीवर **विरमगांव** म्हणून एक मोठें स्टेशन आहे. संस्थानांतून येणाऱ्या मालावर इंग्रजी हद्दींतील कर घेण्यासाठीं उतारूंची तपासणी होई. ही तपासणी करतांना अधिकारी प्रवाशांना कल्पनातीत त्रास देत. प्रत्येक वस्तु जुनी का नवी याचा घोळ घालीत. उतारूला अडकावून ठेवणें, त्याला धाक दाखवून पैसे काढणें हा प्रकार नेहमीं चाले. लोकांनीं खूप तक्रारी केल्या पण दाद लागेना. शेवटीं मोतिलाल नांवाच्या एका शिप्यानें **विरमगांव** दुःखाची कहाणी गांधींच्या कानावर घातली व म्हणाला, "तुम्ही चळवळ करा आम्ही तुरुंगांत जावयास तयार आहों." गांधींनीं त्यांच्या स्वभावाप्रमाणें व कार्यपद्धतीला अनुसरून या प्रश्नाची नीट चवकशी केली. कागदपत्र जे मिळाले ते जमा केले व गव्हर्नरच्या सेक्रेटरीकडे दाद मागितली. तो म्हणाला " हें पहा गांधी ह्या जकातीचा प्रश्न आमच्या कक्षेबाहेर आहे. हिंदुस्थान सरकारकडे आम्हीं कागद पाठविले आहेत. तुम्ही तिकडे दाद मागा." गांधींनीं हिंदुस्थान सरकारकडे दाद मागितली पण उपयोग झाला नाहीं. शेवटीं व्हाइसरॉय लॉर्ड **चेम्सफर्ड** यांची गांठ गांधींनीं घेतली तेव्हां **विरमगांवचा** प्रश्न त्यांनीं त्यांच्याजवळ काढला. व्हाइसरॉय म्हणाला, मुंबई सरकारकडून कागद आले तरी मला त्याची दाद नाहीं आश्चर्य आहे. त्यांनीं लगेच विरमगांवचें दप्तर मागविलें. अधिकाऱ्यांचें म्हणणें ऐकलें व **जकात उठविली**. ही बातमी ऐकून काठेवाडी प्रवाशांनीं गांधींना धन्यवाद दिले. कोणी म्हणाले सरकार गांधींना भितें आहे.

विरमगांवचा प्रश्न सोडविल्यामुळें गांधींकडे अन्यायांचें निराकरण करण्याकरितां अनेक तक्रारी रोज येऊं लागल्या. त्यांत **चंपारण्याचा** प्रश्न महत्त्वाचा जितका होता तितकाच तो बिकटहि होता. **चंपारण्याच्या** प्रश्नाला हात घालणें बरेंच धोक्याचें होतें कारण त्यांत गोऱ्या लोकांच्या इभ्रतीच्या हृदयाला हात घालण्यासारखें होणार होतें.

*

# १०. सत्याग्रहाचीं पहिलीं पावलें

**चंपारण्यांतील लढा १९१७**

चंपारण्य या नांवाचा प्रांत गंगेच्या उत्तरेस, नेपाळच्या लगत, व हिमालयाच्या पायथ्याशीं बिहार प्रांतांत आहे. याच प्रदेशांत ध्रुवानें तप केलें होतें, येथेंच पौराणिक गजेंद्राची सुटका मगरमिठींतून भगवंतांनीं केली. अशा पुराणप्रसिद्ध प्रांतांत, इंग्रजाचें राज्य येथें स्थापन झाल्यावर निळीची लागवड गोऱ्या मळेवाल्यांनीं केली. आसाममध्यें चहाची लागवड करण्याकरितां गोरे मळेवाले आले तसेच या चंपारण्यांतहि आले. सरकारनें त्याना मोठमोठ्या जमिनी स्वल्प किंमतींत दिल्या. हे मळेवाले चांगले श्रीमंत होते. शेती करण्यामध्यें चांगले कुशल होते. त्यांनीं निळीची लागवड मोठ्या प्रमाणांत करून युरोपमध्यें ती पाठवून चांगला नफा मिळविला. ही लागवड ते नेहमीं स्वतः करीत नसत. आपल्या जवळच्या जमिनी ते चंपारण्यांतील गरीब लोकांना खंडानें देत. लावणी कबुलायतींत अशी एक अट असे कीं, **खंडकऱ्यांनीं आपल्या सहाव्या भागांत निळीची लागवड केलीच पाहिजे.** मळेवाल्यांना पाहिजे असलेली नीळ जर खंडकऱ्यांनीं उत्पन्न केली नाहीं, तर ते त्यांना मार झोड करीत. मळेवाले संघटित असत, सरकार त्यांची बाजू नेहमीं घेई यामुळें गरीब रयतेवर हे मळेवाले जो जुलूम करीत त्याची दाद लागत नसे. मळेवाले रयतेकडून घरगुती कामें फुकट करून घेत. शिवाय त्यांच्यावर वाटेल तसे कर लादीत. पौराणिक **राक्षस जे जुलुम करण्यास कचरला असता ते करण्यास हे मळेवाले कचरत नसत.** थोडक्यात सांगावयाचें म्हणजे **मनुष्याला मनुष्यावर जो जो जुलूम करतां येणें शक्य आहे तो तो हे गोरे मळेवाले करण्यास कधीं कचरत नसत.** अशा रीतीनें चंपारण्यांतील मूळचे रहिवाशी स्वतःच्या सुपीक देशांत गुलाम बनले होते.

**पापाला वाचा फुटली**

मळवाल्यांच्या पापाला **राजकुमार शुक्ल** नांवाच्या गरीब शेतकऱ्यानें वाचा फोडली. त्यानें गांधीच्या पाठीस लागून हा प्रश्न हातीं घेण्यास त्यांना भाग पाडलें.

**परिस्थितीची पाहणी**

लखनौ कॉंग्रेस १९१६ साली झाली. या कॉंग्रेसमध्यें चंपारण्यांतील शेतकऱ्यांना सहानुभूति दाखविणारा ठराव पास झाला. १९१७ सालीं गांधी बिहार प्रांतांत गेले. बाबू राजेंद्रप्रसाद व व्रजकिशोर बाबू यांचे मदतीनें चंपारण्यांतील परिस्थितीची त्यांनी माहिती करून घेतली. परंतु गांधींची पद्धति अशी होती कीं, **सांगोवांगीवर विश्वास ठेवून चळवळीला हात घालावयाचा नाहीं.** चंपारण्यांत जाऊन तेथील शेतकऱ्यांत राहून परिस्थितीचें निरीक्षण स्वतः करावयाचें. कोणत्याहि युद्धांत परिस्थितीचें निरीक्षण ही पहिली व महत्त्वाची पायरी असते. शस्त्रयुद्धांत हें काम गुप्त हेरांकडून होत असतें तर सत्याग्रही युद्धांत ते उघड उघड होतें. गांधींनीं सरकारला व मळेवाल्यांना कळविलें कीं, चंपारण्यांतील रयतेच्या बऱ्याच तक्रारी मळेवाल्यांच्या विरुद्ध मजकडे आल्या आहेत. त्यांनीं माझी मदत मागितली आहे. या तक्रारींत कितपत तथ्य आहे हें पाहण्याकरितां मी चंपारण्यांत येत आहे. तरी आपल्या मदतीची या कामीं मी अपेक्षा करतों.

गांधींची विनंति आणि भाषा जरी प्रांजल, सरळ, निष्कपटी होती तरी त्यांत जी मागणी केली होती, ती मळेवाल्यांच्या हितसंबंधाला घातक होती. आजपर्यंत त्यांना कोणी विचारता नव्हता म्हणून त्यांना वाटेल तसा नंगा नाच घालता आला. त्यांचीं पापें उघड उघड चालत होतीं त्यामुळें सरकारच्या मदतीनें मळेवाल्यांच्या देखत जरी चौकशी झाली असती तरीहि त्यांच्या पदरीं दोष आला असता म्हणून मळेवाले गांधींना म्हणाले "तुम्ही चंपारण्यच्या बाहेरचे गृहस्थ आहां तेव्हां आमची चौकशी करण्याचा तुम्हांला कांहीं एक अधिकार

नाहीं. तरी आलात तसे चालते व्हा." यानंतर त्या विभागाच्या कमिशनरला गांधीं भेटावयास गेले. त्यानें तर गांधींना दम द्यावयाला सुरुवात केली. व सांगितलें कीं, आतांच्या आतां आमच्या प्रांतातून चालते व्हा कसे?

**गांठ कोणाशीं होती?**

गांधींचें वर्णन कोणीं असें केलें आहे की, meek terrible म्हणजे ते जितके विनम्र तितकेच भयंकर होतात या वचनाचा प्रत्यय सरकार व मळेवाले यांना लवकरच आला. गांधींनीं दोघांनाहि कळविलें कीं, "चौकशी केल्याशिवाय मला परत जातां येणार नाही. शेतकऱ्यांना माझी मदत हवी आहे, तेव्हां त्यांचा देशाबांधव म्हणून मला ती द्यावी लागेल." झालें. सरकारला या उत्तरानें राग आला व त्यांनी चंपारण्य सोडून जाण्याचा हुकूम गांधींवर बजावला. गांधींनी तो मोडला तेव्हां त्यांचेवर खटला झाला. खटल्याच्या सुरुवातीला गांधींनीं गुन्हा कबूल केला व आपल्या भूमिकेचा खुलासा लिहून वाचून दाखविला. या खुलाशांत ते म्हणाले "मी कायद्याचा मान राखणारा नागरिक आहे. परंतु गरीब शेतकऱ्यावर जुलूम होतो आहे असें कळल्यावर त्याची चौकशी मी करावयास निघालों यात काय बिघडलें? सरकारनें मजवर जो हुकूम बजावला त्याला योग्य कारणें नव्हतीं. सरकारी हुकुमाची इज्जत राखण्याकरितां मीं चंपारण्य सोडलें तर शेतकऱ्यांविषयीं माझें जें कर्तव्य आहे तें करण्यास मी चुकेन. माझें काम उघड आहे. मी असंतोष पसरवीत नाहीं. फक्त अन्यायाची चौकशी व ती उघड करीत आहे."

हा खुलासा ऐकून मजिस्ट्रेटला काय करावें हें समजेना. लवकरच सरकारनें गांधींवरचा खटला काढून घेतला. आणि मग गांधींनीं शेतकऱ्यांवर होणाऱ्या जुलमाच्या चौकशीस जोरानें आरंभ केला. शेकडों शेतकरी आपलीं दुःखें निवेदन करीत. अन्याय कथन करतांना अतिशयोक्ति करण्यांत येऊं नये, सत्य तेवढेंच सांगावें असें शेतकऱ्यांस बजावण्यांत येत असे.

### विधायक लोकसेवा

हें चौकशीचें काम चालू असतां खेडोपाडी शेतकऱ्यांकरितां गांधींनीं शाळा काढल्या, सफाईपथकें काढून लोकांना निर्मल राहणीची सप्रयोग माहिती दिली. व औषधोपचाराकरितां मध्यवर्ती दवाखाना उघडला. अशा रीतीनें चंपारण्यांतील लोकांचें जीवन सुधारण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. या कामाकरितां निरनिराळया ठिकाणच्या माणसांना त्यांनीं बोलावून घेतलें. आपल्या महाराष्ट्रांतील अवंतिकाबाई गोखले, सौ. आनंदीबाई वैशंपायन, बाबासाहेब सोमण, गंगाधररावांचे मानस पुत्र पुंडलीकजी अशी मंडळी गेली होती. चंपारण्यांतील काम दिसावयास साधें पण अत्यंत कठिण होतें. प्रवास हत्तीवरून करावा लागे. हत्तीवर बसून प्रवास करणें अत्यंत धोक्याचें व शरीर खिळखिळें करणारें असतें. लोकांची घरें गलिच्छ असत, त्यांची भाषा समजणें मुष्किलीचें असे. तरी पण या मंडळींनीं रात्रंदिवस काम करून गांधींनाच केवळ नव्हे तर युरोपिअन लोकांनासुद्धां आश्चर्यचकित केलें.

### सरकार नमलें

शेवटीं सरकारनें एक चौकशी कमिटी नेमली त्यावर गांधींना घेतलें व झटपट हा प्रश्न निकालात काढला. गाधीनी सुचविलेल्या सर्व सूचना सरकारनें मान्य केल्या. गरीब रयतेवर होणारा जुलूम बद केला. यानंतर जर्मनीमध्यें स्वस्त कृत्रिम रंग तयार होऊं लागले यामुळें झाडापासून तयार केलेली नीळ महाग पडूं लागली तेव्हां गोरे मळेवाले चंपारण्य सोडून स्वदेशी परत निघून गेले:

हिंदुस्थानांत आल्यावर गाधीनी पहिला सत्याग्रही लढा जो केला तो चंपारण्यांत. हा लढा जिंकणें अत्यंत कठिण होतें. कारण प्रदेश एका बाजूचा, दळणवळणाचीं साधनें नाहींत, लोक मागासलेले व प्रतिपक्षी जबरदस्त अशाहि परिस्थितीत यश मिळविलें तेव्हां गांधींची कीर्ति हिंदुस्थानांत सर्वत्र पसरली. अज्ञानी लोक म्हणूं लागले या महात्म्याजवळ अद्‌भुत विद्या

आहे. त्याचे बळावर तो इंग्रजांचा पराभव करतो. नेमस्तांना गांधीचा कायदेभंग पसंत नसला तरी विनम्र कार्यपद्धति व समाजसेवा आवडली. गोऱ्यांची चांगली जिरवली म्हणून जहाल खूष झाले पण गांधीचे मार्ग त्यांना पूर्ण नापसंत वाटले. यश मिळाल्यावर मग मार्गाबद्दल लोक फार चिकित्सा करीत बसत नाहींत, यामुळें गांधीवर सर्वांनीच अभिनंदनाचा वर्षाव केला.

### महात्मा पदवी

आफ्रिकेत असताना गांधीना लहान मोठे लोक **भाई** या नांवानें संबोधित व तें नांव त्यांना फार आवडे. हिंदुस्थानात आल्यावर कांही दिवस ते बॅरिस्टर गांधी या नावानें प्रसिद्ध असत. चंपारण्यात गेल्यावर तेथील लोक त्यांना **महात्मा** म्हणू लागले. उत्तर हिंदुस्थानात कोणत्याहि थोर त्यागी जीवनाच्या माणसास महात्मा म्हणण्याची रीत आहे. टिळकांना देखील उत्तर हिंदुस्थानात महात्मा टिळक म्हणत. स्वामी श्रद्धानंदाना पूर्वाश्रमी महात्मा मुनशी राम असें म्हणत. महात्मा शब्दाच्या तोडीचा आपल्याकडचा शब्द म्हटला म्हणजे " महाराज " होय. चंपारण्यांत गांधीना **महात्मा** पदवी जी चिकटली ती कायमचीच. इतकेंच नव्हे तर ही पदवी लोकमान्य पदवी सारखी अनन्यसाधारण झाली. शेवटीशेवटी युरोपिअन लोकहि त्यांना महात्मा पदवीनें गौरवू लागले होते.

### घरच्या दारांत

चंपारण्यात चौकशी कमेटीचें काम चालू असताना गांधींना दोन पत्रे आली. एकांत लिहिले होते की, अहमदाबाद येथील गिरणी कामगारावर संकट आलें आहे तरी धावा. दुसऱ्या पत्रांत गुजराथमधील **खेडा जिल्ह्यांतील** शतकऱ्यांतर्फे करुणा भाकली होती.

### संवर्धक योजना मनांतच राहिली

चंपारण्यांतील अन्यायांच्या चौकशी कमेटीचें काम पुरें होत आलें होतें. गांधींचा जय झाला होता. तेव्हां गांधींनी सरळ आश्रमांत येणें साहजिक होतें. पण त्यांना वाटलें कीं, गोरे मळवाल्यांचा जुलूम थांबविण्यानें

चंपारण्याचा प्रश्न सुटत नाहीं. **जोंपर्यंत तेथील शेतकरी अशिक्षित आहेत तोंपर्यंत ते असंघटित राहणार आणि जोंपर्यन्त असंघटित राहणार तोंपर्यन्त कोणाचा तरी त्यांचेवर जुलूम होण्याचा संभव राहणार.** म्हणून तेथील लोकांना सुशिक्षित करण्याचा गांधींनी बेत केला. सुशिक्षणाबरोबर चंपारण्यांतील गोरक्षणाचा प्रश्न हातीं घेऊन गाईच्या रक्षणांत गोसंवर्धन दुग्धालय वगैरे गोष्टींचा समावेश गांधी करणार होते पण अहमदाबादेहून तातडीचें पत्र आलें म्हणून ते तिकडे गेले. मिल मजुरांचा प्रश्न घरचा आहे चुटकीसरसा आपण सोडवूं असें गांधींना वाटलें, पण बाहेरच्यापेक्षां घरचीच भांडणें पुष्कळदां अधिक वेळ लांबतात आणि तीं संपता संपतां नाहींत.

**नाजूक प्रश्न**

अहमदाबादेस मुंबईसारख्या पुष्कळ गिरण्या आहेत. जेथें गिरण्या पुष्कळ तेथें मालक मजुरांमध्यें तंटे चालावयाचेच. तसें अहमदाबादेस १९१८ साली झालें. मजुरांजवळ संपाचें हत्यार होतें, तें ते उपमणार इतक्यांत अनुसया बेन यांनीं त्यांना सांगितलें कीं, आपण गांधींना बोलावून घेऊं, तेच आपल्याला मार्गदर्शन करतील. अनुसया बेनच्या पत्राप्रमाणें गांधी अहमदाबादेस आले तेव्हां त्यांचे ध्यानांत आलें की, हा प्रश्न मोठा नाजूक आहे. पण नाजूक असला तरी तो सोडविला हा गेलाच पाहिजे.

**संपावर जा पण हटूं नका**

ज्या मिलमालकाशी तंटा होता त्यांचे पुढारी **अंबालाल साराभाई** हे होते. या अंबालालजींची बहीण अनुसया बेनेहि मजुरांचे हितार्थ नेहमी झटत असल्यामुळें तिनें मजुरांचा पक्ष घेतला होता. **अंबालाल** व **गांधी** याचे संबंध फार निकट आणि स्नेहाचे होते. त्यांची पत्नी **सरलादेवी** गांधीना आपले बंधू मानीत होती. गांधींनीं मजुरांचें बोलणें ऐकून घेतलें. नंतर ते मिल मालकांकडे गेले आणि म्हणाले "तुम्ही हा प्रश्न लवादाकडे सोपवा." तेव्हां **अंबालाल** म्हणाले "हें पहा मालक व मजूर यांचे संबंध बापलेकासारखे आहेत. तेव्हां आमच्या घरच्या भांडणांत तिसरा कशाला? आम्ही लवाद नेमणार नाहीं."

मग गांधी मजुरांना म्हणाले तुम्हांला संपावर जाण्याशिवाय गत्यंतर नाहीं. परंतु संप करणें ही गोष्ट सोपी नाहीं. मिलमालकाच्या घरांत अन्नाचा भरपूर सांठा आहे. त्यांच्या तिजोऱ्या भरलेल्या आहेत. ते उपाशी मरणार नाहींत. तुमचे जवळ आठवडयाला पुरेल इतकेंहि धान्य नाहीं. पण मी सांगतों त्याप्रमाणें वागाल तर मी तुमचे कामांत लक्ष घालतों. मजुरांनीं गांधींचा सल्ला मानावयाचें ठरविलें. तेव्हां गांधी म्हणाले, संपावर जर तुम्ही जाणार तर तुमच्या अटी मालकांनीं कबूल केल्याशिवाय अगर लवाद नेमल्याशिवाय संप मागें घेतां कामा नये. दुसरी गोष्ट जे मजूर संपांत सामील होणार नाहींत त्यांना मारहाण करावयाची नाहीं, त्यांचें मतपरिवर्तन करण्याचा प्रयत्न मात्र अवश्य करावा. संपावर असतांना मदत मागावयाची नाहीं, तिसरी गोष्ट कांहीं तरी उद्योग करून निर्वाह करावा. मिलमालकांना सार्वजनिक सभेंत शिव्या देणें, गांवांत दंगा धोपा करणें या गोष्टी संपवाल्यांनीं कटाक्षानें टाळाव्यात. गांधींच्या अटी मजुरांनी मान्य केल्या. मजूर शिस्तीनें वागत होते, त्यांचें धैर्य अभंग आहे असें दिसत होतें. मिलमालकांचे पुढारी माघार घेण्याचें चिन्ह दिसेना. असे एकवीस दिवस गेले. नंतर मात्र मजुरांचा निश्चय डळमळू लागला. सभेंतल्या भाषणांत पूर्वीचा आवेश राहिला नाहीं. इतकेंच नव्हे तर पुष्कळसे मजूर संप मागें घेण्याचा विचार करूं लागले, हें कळतांच गांधीना अतोनात दुःख झालें.

### दरिद्रता धीरतया विराजते

मजुराजवळ पैसा नाहीं, शस्त्रबल नाहीं. त्यांची धीरवृत्ति हेंच त्यांचें बल. तीच जर ते सोडू लागले तर मग त्यांच्या उद्धाराचा मार्गच खुटला. हे विचार गांधीनी मजुरांना सांगितले व म्हणाले तुम्ही माघार घेत असाल तर मी **यापुढें अन्नग्रहण करणार नाहीं**. हे शब्द गांधीचे तोंडांतून बाहेर पडतांच मजूर चमकले, कांहीचे नेत्रांतून अश्रू येऊं लागले. त्यांनीं म्हटलें कीं, आम्ही संप चालू ठेवतों. तेव्हां गांधी म्हणाले, तुम्ही आपले काम करा हा प्रश्न निकालांत निघेपर्यंत माझा उपवास चालूच राहील.

**प्रेमाचें अपार बल**

मजुरांना काम काय द्यावें याचा विचार वल्लभभाई वगैरे लोक करूं लागले. पुष्कळ भवति न भवति झाली. सत्याग्रह आश्रमाच्या एका इमारतीच्या पायांत घालण्याकरितां रेती हवी होती. तें साबरमतीच्या तीरावरची रेती आश्रमांत आणून टाकण्याचें काम मजुरांना देण्यांत आलें. **अनुसया बेननीं** पहिली पाटी डोक्यावर घेतली. तेव्हां मजुरांच्या उत्साहाला पारावार राहिला नाहीं. इकडे गांधींच्या उपवासामुळें मिलमालक डळमळूं लागले. गाधींच्या उपवासाबरोबर **अंबालालचें** घर हादरलें. त्यांची पत्नी सरलादेवी कष्टी झाली. अंबालालजींचें गांधीवर अपार प्रेम होतें. त्यामुळें त्यांनीं आपला हट्ट सोडला व लवाद नेमण्यास ते तयार झाले. सुदैवानें प्रि. आनंद ध्रुवासारखा निःपक्षपाती लवाद त्यांना मिळाला. मग संप मिटला व गांधींचा उपवास सुटला. गांधींनीं उपवास सोडल्याबरोबर मिलमालकांच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. त्यांनी मणोगणती मिठाई मागविली व आपल्या मजुरांना यथेच्छ खाऊं घातली. एवढें सर्व व्हावयास एकवीस दिवस लागले. अशा अनुपम गोडीनें मजूर मालकांतले तंटे क्वचितच मिटतात.

**बलसंवर्धनाची व्यवस्था**

संप मिटून लवाद नेमल्यानें आपलें काम संपलें असें गांधींनीं कधींच मानलें नाहीं. असे तंटे सलोख्यानें नेहमीं मिटावेत म्हणून कांहीं कालानंतर गांधींनीं **"मजूर–महाजन"** ही संस्था काढली व तिचेकडे मालक मजुरांमधले मतभेदाचे प्रश्न जाऊं लागले. आज ही संस्था अत्यंत कार्मक्षम म्हणून ठरली आहे. हिंदुस्थानबाहेर हिच्या यशस्वी कारभाराचा लौकिक पसरला आहे. मजुरांना पगारवाढ मिळवून देणें, एवढेंच काम अशा संस्थांचें आहे असें गांधीं समजत नाहींत. मजुरांत शिक्षणप्रसार करणें, सहकार्याची भावना त्यांच्यांत पसरविण्याकरितां संस्था काढणें, त्यांना निर्व्यसनी बनविणें, त्यांच्या आरोग्याची काळजी वाहणें इ. कामें करून मजुरांचें बलसंवर्धनाकडे ही संस्था लक्ष देते.

**गरिबांवरचे अन्याय दूर करून गरिबांचें हित होत नाहीं. त्यांच्यांतले अनेकविध दोष काढून त्यांना सज्ञान करण्यानेंच त्यांची शक्ति वाढते हें गांधींनीं ओळखलें होतें.**

**खेडाचा सत्याग्रह यशस्वी कीं अयशस्वी ?**

गुजराथ प्रांतांत **खेडा** या नावाचा आमच्या साताऱ्यासारखा एक जिल्हा आहे. ह्या खेडया जिल्ह्यावर १९१८साली दुष्काळाने डोळे वटारले. रुपयांत चार आणे किंवा अधिक असें पीक फारच थोडया पाटीदारांच्या वाटयास येणारसें दिसले. गुजराथेंत शेतकऱ्याना **पाटीदार** असें म्हणतात. सरकारनें म्हणजे मामलेदार लोकांनी पाटीदारांच्या शेतांत चार आण्यांपेक्षां अधिक पीक आहे असा खोटा रिपोर्ट सरकारास खूष करण्याकरिता केला. चार आण्यांपेक्षां ज्या वर्षी कमी पीक गेते त्या वर्षी सरकार सारा वसूल करीत नाहीं. पाटीदारानी सरकारकडे सारा तहकुबीकरितां अर्जावर अर्ज केले पण सरकार तिकडे लक्षच देईना. श्री. **अमृतलाल ठक्कर**, **मोहनलाल** पांडया, **शंकरलाल** पारख यानी हा प्रश्न धसास लावण्याचें ठरविलें. मुंबई विधिमंडळांत कै. **विठ्ठलभाई पटेल** आणि सर **गोकुळदास पारख** यांनीं सरकारला प्रश्नावर प्रश्न विचारले गव्हर्नरांची भेट घेतली पण व्यर्थ. शेवटी गांधींनीं पाटीदारांना सत्याग्रहाचा सल्ला दिला.

**समुद्रमंथन**

गुजराथेंत प्रथमच अशी चळवळ सुरू झाली होती. गाधीच्या वास्तव्यामुळें गुजराथेंत अगोदरच चैतन्य उत्पन्न झालें होते. समुद्रमंथनाचे वेळीं ज्याप्रमाणें अनेक तेजस्वी रत्नें बाहेर आली त्याप्रमाणे खेडा सत्याग्रहाचे वेळीं अनेक तेजस्वी कर्तृत्ववान् पुरुष पुढें आले. सर्वात वल्लभभाई पटेल हे अग्रेसर ठरले. या वेळीं वल्लभभाई वकिलीच्या धद्यात हजारो रुपये मिळवीत होते. वल्लभभाई बॅरिस्टर आहेत हे पुष्कळांना माहीत नसेल. गुजरात क्लबमध्ये गांधी आणि त्यांचे मार्ग याबद्दल प्रथम प्रथम ते तुच्छतेनें बोलत. पण पुढें

गांधींच्या पराक्रमाविषयीं खात्री पटल्यावर वल्लभभाई त्यांचे एकनिष्ठ भक्त झाले. वल्लभभाई भावनावश होऊन चटकन् कोणत्याहि चळवळींत पडत नाहींत. पण एकदां एखाद्या कामांत पडले म्हणजे त्याची तड लावल्याशिवाय राहात नाहींत. असे हे वल्लभभाई खेडा सत्याग्रहाच्या निमित्तानें जे सार्वजनिक कामांत पडले ते त्यांतून आजपर्यंत निघूच शकले नाहींत. वल्लभभाईच्या प्रमाणें गांधींना महादेवभाई देसाई हें दुसरें नररत्न या वेळीं लाभलें. याशिवाय **शंकरलाल बँकर, इंदुलाल याज्ञिक** अशीं अनेक गुणी माणसें मिळालीं. श्री. **अनुसया बेन** ह्याहि गांधींना मदत करण्यास पुढें आल्या. थोर पुरुष हे महान् वृक्षाप्रमाणें भमिगत असलेल्या अनेक चैतन्ययुक्त शक्ति आपल्याकडे खेचून घेतात व त्यांचे बलावर फल पुष्पन्वित होऊन जगाची सेवा करतात. अशी गुणी मंडळी मिळाल्यावर खेडा जिल्ह्यांत चैतन्य हां हां म्हणतां खेळूं लागलें. पाटीदार मोठमोठाल्या घोषणा करूं लागले. तेव्हां गांधींनीं त्यांना पुढच्या संकटाची नीट कल्पना दिली. ते म्हणाले " मी तुम्हाला सारा न भरण्याचा सल्ला देणार आहें. रयतेनें सारा दिला नाहीं तर सरकार त्यांच्या जमिनीचा लिलांव करून त्यांत मिळालेल्या पैशांतून सारा वसूल करतें. तुम्हाला अन्यायाच्या प्रतिकारार्थ आपल्या प्राणाहूनहि प्रिय अशा जमिनी गमवाव्या लागतील. असें करण्याची तयारी असेल तर हा मार्ग स्वीकारा नाहीं तर जुलूम सहन करीत राहा. " पाटीदारांनीं सांगितलें कीं, "आम्ही कोणताहि त्याग करण्यास तयार आहोंत." मग एक प्रतिज्ञापत्रिका तयार झाली व त्यावर सत्याग्रह करण्यास तयार असणारांच्या सह्या घेण्यांत आल्या. या पत्रिकेंत असें म्हटलें होतें कीं, जर सरकारनें पटटीचा **दुसरा हप्ता तहकूब केला तर ज्यांना ऐपत आहे, ते सारा भरतील.** याचा अर्थ असा होता कीं सरकारनें गरीब शेतकऱ्यांकडून सारा वसूल करून घेऊं नये.

**चळवळ रंगांत व दडपशाही जोरांत**

सरकारच्या मागणीचा मान राहावा म्हणून ऐपतदार लोकांनीं पीक कमी आलें असलें तरी सारा भरावा. असा सल्ला सत्याग्रह कमेटीनें

लोकांस दिला होता. पण सरकार गरीबांस सवलत देण्यास तयार होईना. प्रथम सरकारनें पाटीदारांच्या चळवळीकडे दुर्लक्ष केलें. पण त्यांना जेव्हां चोहोंकडून मदत मिळूं लागली तेव्हां सरकारी अमलदारांनीं दडपशाही आरंभली. गरीब पाटीदारांचीं गुरेंच जप्त करून न्यावीं, कोणाचीं भांडीकुंडीं बाहेर काढावीं. जमेल तेथें शिवीगाळ करावी; पण पाटीदार याला दाद देत ना, तेव्हां मग अमलदारांनीं उभी पिकें जप्त करण्यास सुरुवात केली. मग मात्र पाटीदार डगमगूं लागले. गांधींनीं पाटीदारांना सांगितलें कीं, सरकारनें पिकें जप्त केलीं असलीं तरीहि तुम्ही तीं कापून घेऊं शकतां, अशा वेळीं नेत्यांनीं आरंभ करून धडा घालून द्यावा लागतो. त्याप्रमाणें मोहनलाल-पांड्यानें जप्त केलेल्या एका शेतांतून कांदे कापून आणले. सरकारनें त्यांना पकडून कांदे चोरल्याबद्दल खटला करून शिक्षा दिली. श्रीकृष्णाला आपण ज्याप्रमाणें **गोकुळचा चोर** असें कौतुकानें म्हणतों त्याप्रमाणें मोहनलाल पांड्यांना खेड्याचे लोक **कांदेचोर** म्हणून गौरवीत असत.

**प्रायश्चित्त**

एखादी मोठी चळवळ सुरू झाली म्हणजे नेत्याची बदनामी करण्याचा अनेक रीतींनीं प्रयत्न होत असतो; तो अनुभव **मोहनलाल पांड्यांना** या सत्याग्रहांत आला. मोहनलाल यांच्या एका कुळानें पोलिसांच्या धाकानें सारा भरला हें मोहनलालजींना माहीत नव्हतें. पण ही बातमी लोकांना कळतांच लोक म्हणूं लागले, "पहा आम्हांला सारा भरूं नका म्हणून पुढारी सांगतात आणि आपल्या जमिनीचा लिलाव होऊं नये म्हणून मोहनलाल-सारखे लोक गुप्तपणें सारा भरतात." लोकांचा गैरसमज दूर करण्याकरितां ज्या जमिनीचा सारा चुकून भरला गेला ती जमीन मोहनलालजींनीं सार्वजनिक कार्याला दान म्हणून देऊन टाकली. समर्थांनीं महंताना म्हणजेच लोकनायकांना इशारा दिला आहे कीं, "अंखड सावधान असावें" तो किती अनुभविक व उपयुक्त होता हें या प्रसंगानें मनावर चांगलें ठसतें. सार्वजनिक काम म्हणजे तारेवरचा नाच आहे, त्यांत केव्हां तोल जाईल

याचा नियम नसतो. गांधींनीं खेडा सत्याग्रहांतले कटु व मानहानिकारक अनुभव सांगितले आहेत. ते म्हणतात, "जोंपर्यंत सरकार प्रत्यक्ष जमिनी जप्त करीत नव्हतें तोंपर्यंत पाटीदार धैर्य धरून होते पण जेव्हां जमिनी लिलाव होण्याचा प्रसंग आला तेव्हां त्यांचा निश्चय ढळूं लागला. असा पेंच सोडविणें पुढाऱ्याला कठिण असतें. जुलमी शक्तीला डिवचून मग पाटीदार शरण जर गेले असते तर त्यांच्यांत पुन्हां तेज आणणें दुर्घट होणार होतें म्हणून आब जाऊं न देतां माघार घेणेंच प्राप्त होतें. इकडे सरकारहि हातघाईला आलें होतें तेव्हां सरकारकडूनच निरोप आला कीं ऐपतदारांनीं जर सारा भरला तर गरीब पाटीदाराना सारा तहकुबी मिळेल." "सत्याग्रह प्रतिज्ञेंत हीच मागणी होती. तेव्हां सत्याग्रहीचा अनायासेंच जय होऊन त्यांचेवर चोहोंकडून अभिनंदनाचा वर्षाव होऊं लागला."

**तत्त्वबोध**

सत्याग्रहीना जरी बाह्यात्कारी यश मिळालें तरी ते खरें यश नव्हतें, कारण त्यांचें धैर्य अभंग राहिलें नव्हतें. सरकारनें जर अधिक ताणलें असतें तर पाटीदारांनी खालच्या मानेनें सारा भरला असता आणि मग अंमलदारांचे कटु बोल त्यांना ऐकून घ्यावे लागले असते. पण सरकारहि थोडें भ्यालेंच आणि त्यानें एक पाऊल मागें घेऊन तंटा मिटवला.

**लढाईपूर्वी बलसंवर्धनाची आवश्यकता**

रयतेचें धैर्य अभंग राहवयाला तिच्यामध्यें कित्येक दिवस राहून तिला सहकार्याचें आणि त्यागाचें शिक्षण द्यावें लागतें तें विधायक कामें करितां करितां मिळतें. खेडा जिल्ह्यांत अशी पूर्वतयारी झालेली नव्हती म्हणून पाटीदार कठिण प्रसंग आला तेव्हां कच खाऊं लागले. सत्याग्रह चळवळ सदोष ठरली तरी पण ती अगदींच निष्फळ झाली नाही. या चळवळीमुळें सबंध गुजरात जागृत झाला. समाजाच्या अग्रभागीं जे लोक होते त्यांना समाजाच्या तळाशीं असलेल्या लोकांबरोबर काम करण्याचें शिक्षण मिळालें. सरदार वल्लभभाई हे सार्वजनिक चळवळीला कायमचे मिळाले हा फायदा

कांहीं लहान सहान नव्हे. वल्लभभाईची उपयुक्तता पुढें महापुराचे व बार्डोली सत्याग्रहाचे प्रसंगीं कळून आली. पाटीदार लोकांना आपल्या शक्तीची जाणीव झाली. लोकांचा उद्धार हा शेवटीं दुसरा बाहेरचा कोणी येऊन करीत नाहीं, त्यांचा त्यांनींच करून घ्यावयाचा असतो हा धडा गुजरातच्या जनतेच्या हृदयावर कायमचा कोरला गेला. आपल्या शक्तीच्या, त्यागाच्या मानानें आपण पुष्कळच मिळविलें या विचारानें पाटीदार मंडळी नाचू बागडू लागली. गांधी मात्र मनांत म्हणाले गुजरातनें पुष्कळच मजल मारली असली तरी

"परिपुरे ही नसे व्हावया पुन्हा देश भेट"

**नदीमुखाजवळ**

आपण गांधींचा जीवनक्रम १८६९ पासून १९१८ पर्यंत पाहिला. या लहानशा पुस्तकांत त्यांच्या आयुष्यांत घडलेल्या सगळ्याच गोष्टींचा परिचय करून देतां येणें शक्य नव्हतें म्हणून ज्या गोष्टींनीं गांधींच्या जीवनाला विशिष्ट वळण लावलें तेवढ्याच गोष्टी आपण बारकाईनें पाहून घेतल्या. आतांपर्यंत गांधींचें जीवन लहानमोठ्या प्रवाहांतून चाललें होतें. त्यांनीं हातीं घेतलेल्या या काळांतील चळवळींना नैतिक महत्त्व कितीहि मोठें असलें तरी त्या देशव्यापी नव्हत्या. आतां गांधी नदींतून अथांग सागरांत शिरणार आहेत. तेथील प्रसंग रोमांचकारी वाटतील. कधीं वीर तर कधीं रौद्र रस मूर्तिमंत आपणापुढें येऊन उभा राहील. कधीं उत्साहातिरेक तर कधीं गुदमरून टाकणारी उदासीनता आपणाला भेटेल. कधीं कमालीच्या स्वार्थत्यागाचें पवित्र दर्शन होईल तर कधीं द्वेष आणि मत्सर यांचें अपवित्र थैमान अवलोकन करण्याचा प्रसंग आपणांवर येईल. एकंदरींत अद्भुतरम्य प्रसंगच आपल्या अवलोकनांत अधिक येऊन आपल्या भावना उदात्त आणि शुद्ध होतील.

ज्या अपार सागराच्या पार्श्वभूमीवर हे रोमांचकारी प्रसंग घडणार त्या सागराच्या मुखाजवळ आपण आतां आलों आहों. तेव्हां आपण जरा या

सीमारेषेवर थांबूं या, आणि चरित्रनायकाच्या जीवनांतील सुटलेले धागे एकत्र करून आपण पुढें जाऊं या.

आपण आतांपर्यंत गांधींचें सार्वजनिक जीवनच पुष्कळसें पाहिलें. तें पाहतांना त्यांच्या सांसारिक जीवनावर ओझरती नजर टाकली पण हें जीवन सारखें बदलत होतें. आफ्रिकेंतला त्यांचा काळ साधनेंत गेला यामुळें हा फरक होणें साहजिकच होतें. आफ्रिकेंत ते जेव्हां गेले तेव्हां युरोपिअन पोषाख, युरोपिअन राहणी त्यांनीं ठेवली होती. ऑफिसचा थाट बड्या बॅरिस्टराला शोभण्यासारखा होता. त्या वेळचे त्यांचे फोटो उपलब्ध आहेत. त्या फोटोंवरून हे गृहस्थ साधे असतील असें वाटत नाहीं. पण त्यांचें वाचन-मनन, संशोधन सतत चालू असल्यामुळें त्यांचे वागणुकींत अधिकाधिक सरलता व साधेपणा उत्पन्न झाला. नोकरचाकरांनाच नव्हे तर परधर्मीयांना कुटुंबियांप्रमाणें वागवितांना त्यांनीं उत्साहाच्या भरांत आपल्या पत्नीच्या पूर्वसंस्काराचाहि विचार केला नाहीं.

**आश्रमवासी**

लोकमान्य टिळक म्हणत लोकसेवा करतां करतां चित्तशुद्धि होते. गांधी जों जों लोकसेवेंत अधिकाधिक रमूं लागले तसतसें त्यांचें लक्ष वकिलीच्या धंद्यावरून उडालें. इतकेंच नाहीं तर ज्याला आपण भोग अगर चैन म्हणतों त्यांचा त्यांस वीट येऊं लागला. जीवन सेवामय आहे हा बोध झाल्यावर त्यांनीं १९०६ मध्यें वयाच्या ३७ व्या वर्षीं ब्रह्मचर्याची दीक्षा घेतली. एवढ्यानें त्यांचें समाधान होईना. त्यांचे वाचनांत असें आलें कीं, (१) सर्वश्रेष्ठ धंदा म्हटला म्हणजे शेतीचा. (२) वकिलीचा धंदा हा उत्पादक धंदा नव्हे. (३) स्वावलंबनानें जीवित कृतार्थ होतें. कोणताहि उपयुक्त धंदा मनुष्याला मानहानिकारक नाहीं.

**साधी राहणी व उदात्त विचारसरणी**

जो गोष्ट पटली ती आचरणांत आणल्याशिवाय गांधींना चैन पडत नसे. त्यांनीं मनांत आणलें कीं, आपण आतां वकिली सोडावी. शेतावर

जाऊन शेतकऱ्यांच्या जीवनाचा अनुभव घ्यावा. लगेच दरबान शहरापासून थोडया मैलावर त्यांनीं २५–३० हजार रुपयांना एक मळा खरेदी केला. तेथें झोपडया बांधल्या व मुलांबाळांसह ते तेथें राहावयास गेले, आणि आश्चर्याची गोष्ट ही की, त्यांचबरोबर त्यांचे **कांहीं युरोपिअन लोकहि गेले.** आज आपल्यापैकी, पुष्कळांना आश्रमाची कल्पना आली आहे. ती पहाटेची प्रार्थना, तें सफाईचें काम, तें दळण, तें भांडीं घासण्याचें किचकट काम, ती सूतकताई, तें कमालीचें साधें जेवण कोणाच्या परिचयाचें नाही? पण १९०७ सालीं ह्या गोष्टी लोकांना सुपरिचित नव्हत्या व आज त्यांना जो प्रतिष्ठितपणा प्राप्त झाला आहे तो त्या वेळीं या जीवनांत आलेला नव्हता. प्रत्यक्ष गांधींनासुद्धां हें जीवन अगदींच अपरिचित होतें. यामुळें शेतावर राहण्यास गेल्यावर त्यांच्या हातून अनेक चुका झाल्या, पण त्यांनी व त्यांचें कुटुंबियांनीं तें कठिण जीवन सहन केलें. याच आश्रमांत त्यांना भिन्नभिन्न धर्मांचे लोक येऊन मिळाले, यामुळें प्रार्थनेंत सर्व धर्माच्या लोकाचा समावेश झाला. मनें जर उदार असलीं तर भिन्न भिन्न धर्माच्या अनुयायांना एकत्र प्रार्थना करणें शक्य आहे असा त्यांना आफ्रिकेंत अनेकदां अनुभव आला होता म्हणून तर ते परधर्मीयांबद्दल असहिष्णु होऊं शकले नाहींत.

आश्रमांत स्त्री–पुरुष एकत्र काम करीत. अमुक एक काम स्त्रियांचें व अमुक एक काम पुरुषांचें असा भेद नसे. या आश्रमांतच पुढें एक मुद्रणालय ठेवण्यांत आलें व तेथेंच गांधीचें **इंडियन ओपीनिअन वृत्तपत्र छापलें जाई.** या शेताचें नांव **फिनिक्स फार्म** असें होतें. हिंदुस्थानांत आल्यावर साबरमतीच्या तीरावर गांधींनी जो आश्रम काढला तो आफ्रिकेंतील आश्रमाच्या धर्तीवर काढला. ही पद्धत फारशी पुढें बदलली नाहीं. या जीवनामुळें मनुष्य स्वावलंबी, साधा, सहकार्यात आनंद मानणारा, उद्योगी व परमेश्वराचा भक्त बनतो. इतकेंच नाहीं तर तो जें जें करतो तें तें सेवावृत्तीनेंच करावयास शिकतो. असा मनुष्य सार्वजनिक सेवेला उपयुक्त ठरतो. मग ही सेवा सत्याग्रही युद्धाची असली तरी त्यांत तो कमी पडत नाहीं. साबरमतीस आश्रम काढल्यावर

गांधींना **महादेवभाई देसाई** व **नरहरभाई पारख** ही तरतरीत वकिलांची जोडी मिळाली. बडोद्याचें बृहस्पतितुल्य **विनोबा भावे** हेहि याच काळांत आपल्या मित्रमंडळींसह येऊन मिळाले. गांधींशीं चर्चा करतांना बुद्धिवान् माणसांच्या लक्षांत चटकन् येईल कीं, हा सामान्य माणूस नाहीं, याचेजवळ कांहो अलौकिक कल्पना आहेत. हा नम्र असला तरी निर्भय लढवय्या आहे.

**गांधीकडे संशयित दृष्टीनें कांहीं पहात**

श्रद्धाळू लोक गांधीकडे आकर्षिले गेले पण बरेचसे संशयात्मे बुद्धिजीवि लोक गांधीकडे संशयित दृष्टीनें पाहात होते. यांत महाराष्ट्रीय बरेच होते. श्रीमंत खापडर्यांनीं हा आपला नव्हे असें मत देऊन टाकलें. टिळकांना मात्र गांधी (Coming Man) उदयोन्मुख पुढारी वाटे. इतकेंच नव्हे तर मला यांची साथ करण्याचा प्रसंग येईल. (I shall have to play second fiddle) असें तें म्हणत तरी पण सर्वांनाच गांधी एक कोडें वाटत होतें यांत संशय नाहीं. आम्हांला देखील १९२१ पर्यंत गांधीच्या धोरणाचा थांग लागला नाहीं. महाराष्ट्रांत टिळकांची छाप सर्वत्र पडलेली होती. त्यांच्या जहाल अनुयायांना गोखले यांच्या कृतींत देशद्रोह दिसे. गांधी गोखल्यांना आपले राजकीय गुरु समजत. हें पाहून गांधीबद्दल इकडच्या जहाल लोकांना संशय येई. लोकांचा संशय बळावेल अशी गोष्ट गांधीनीं पहिल्या युद्ध कालांत केली होती ती म्हणजे साम्राज्य सरकारास रिक्रूट मिळवून देणें ही होय. हे दोष सोडले तर गांधींचा तो विलक्षण त्याग, साधी राहणी, तपस्वी वृत्ति व सत्याग्रह धडाडीनें चालविण्याचें सामर्थ्य पाहून कांहीं जहालांना गांधींचें आकर्षण वाटेच.

आपण ज्या कालखंडाचा विचार करीत आहोंत त्या काळांत गांधी कसे होते हें आपण पाहून घेतलें. वर म्हटल्याप्रमाणें गांधींच्या चळवळी अजून अखिल भारतीय स्वरूपाच्या झाल्या नव्हत्या त्या आतां होणार. गिरणींतील वस्त्र कितीहि लांब रुंद असलें तरी त्याची विणाई जशी सारखी त्याप्रमाणें क्षेत्र व्यापक असो वा संकुचित असो गांधींचीं पावलें ठरीव पद्धतीनेंच पडलेलीं आपणांस यापुढें दिसतील.

## ११. भीषण कांड

### नोकरशाहीचा कावा

पहिलें महायुद्ध १९१४ सालीं सुरू झालें. जर्मनीचा पराभव करणें इंग्रजांना पुढें पुढें कठिण जाऊं लागलें. तेव्हां हिंदुस्थानांतील लोकांकडून पैसा व सैनिक मिळवावे म्हणून इंग्रज अधिकारी व अँग्लो इंडियन वर्तमानपत्रकार हिंदी लोकांच्या शौर्याची, राजनिष्ठेच्या भावनेची व उदार हृदयाची स्तुति करूं लागले. हिंदी राजेरजवाडे व पुढारी यांनीं सरकारला मदत केलीच पाहिजे असें म्हणूं लागले. पुढाऱ्यांना वाटलें कीं, सरकारच्या अडचणीच्या वेळीं आपण जर मदत केली तर इंग्रज सरकार कृतज्ञबुद्धीनें आपणांस पूर्ण स्वातंत्र्य राहिलें पण वसाहतीचें राज्य तरी देईल. इंग्लंडांतील उदार मुत्सद्यांच्या मनांत विशेष अधिकार देण्याचा विचार घोळत होता. पण येथील नोकरशाही हिंदी लोकांना राजकीय हक्क देण्याच्या नेहमीं आड येत असे. महायुद्धांत इंग्रजांचा जय झाल्यावर येथील नोकरशाहीनें राजकर्त्यांना असें भासविलें कीं, हिंदुस्थानांत कांहीं लोक सशस्त्र क्रांतीची तयारी करीत आहेत. त्यांची चळवळ प्रथम दडपून टाकली पाहिजे. ती पूर्णपणें दडपली गेली म्हणजे मग राजकीय हक्क देण्याचा बेत काढावा.

### रौलट कमिटीचा रिपोर्ट

आपला अंदाज बरोबर हें सिद्ध करण्याकरितां हिंदुस्थान सरकारनें क्रांतिकारक चळवळीची चौकशी करण्याकरितां रौलट नांवाच्या एका ब्रिटिश अधिकाऱ्याच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली. हिंदुस्थानभर ही कमिटी हिंडली व क्रांतिकारक चळवळ देशभर पसरलेली आहे, याबद्दल तिनें पुरावा गोळा केला व सरकारकडे रिपोर्ट केला कीं, ह्या क्रांतिकारक विचारांना वर्तमानपत्रांतील राजद्रोही लेखांनीं, सभेमधील उन्मत्त भाषणांनीं व गुप्त

समित्यांच्या कारवायांनीं उत्तेजन मिळतें. तरी या तीन गोष्टींवर सरकारनें कडक निर्बंध घातल्याशिवाय क्रांतिकारक चळवळी बंद पडावयाच्या नाहींत.

देशांत सशस्त्र बंड करण्याच्या चळवळी गुप्तपणें चालल्या होत्या यांत संशय नव्हता. पण त्या अगदीं थोडया व विखुरलेल्या होत्या. मध्यवर्ती सरकार जोंपर्यंत मजबूत आहे, तें सरकार चालवणारी नोकरशाही जोंपर्यंत राजनिष्ठ आहे, व जोंपर्यंत राष्ट्रांत शस्त्रनिर्बंध जारी आहे तोंपर्यंत सशस्त्र क्रांति यशस्वी करणें जवळजवळ अशक्यच असते. जुन्या तलवारी, गंजलेले भाले, जुनीं पुराणीं पिस्तुलें, अगर बंदुका फार तर हे तरुण मिळवूं शकतात. पिस्तुलानें फार तर एखादा अधिकारी ठार करतां येतो. क्रांतिकारकांच्या चळवळीची आतां बरीचशी माहिती बाहेर आली आहे. त्यावरून गुप्त चळवळ करणें अत्यंत कठिण असतें व झालेल्या चळवळींत फारच थोड्यांना काम करतां आलें आहे. गुप्त चळवळ करणें अत्यंत कठिण असलें तरी तिचें आकर्षण मात्र फार असतें. त्या गोष्टी करण्यापेक्षां त्यांची चर्चा करणारे फार. या चर्चांची बातमी ऐकून रौलट कमिटीनें हिंदुस्थानांत मोठा उत्पात होणार म्हणून आरोळी ठोकली. रौलट कमिटींतील सभासद हे जाणते लोक होते. सशस्त्र क्रांति यशस्वी केव्हां होते, याची त्यांस कल्पना होती. तरी देखील सरकारच्या हेतूप्रमाणें या कमिटीनें पराचा कावळा केला. व सरकारास दडपशाहीचे कायदे करण्यास उत्तेजन दिलें. लोकांचे पुढारी म्हणत कीं, असल्या लहान सहान कटांना सरकारनें बिचकून जाऊन सनदशीर चळवळ करणाऱ्यांना भरडून काढूं नये. सरकारनें लोकांना स्वराज्याचे हक्क दिले कीं, मग ही क्रांतिकारक चळवळ आपोआपच बंद पडेल.

### दडपशाहीचे कायदे व त्यांचा प्रतिकार

पण लोकांच्या पुढाऱ्यांचा उपदेश नोकरशाहीला नेहमींप्रमाणें मानवला नाहीं. तिनें रौलट कमिटीच्या शिफारसीप्रमाणें कायदा तयार करून तो विधिमंडळात मांडण्याची तयारी केली. लोकांच्या माहितीकरितां या कायद्याचे मसुदे प्रसिद्ध केले. ते गांधींच्या सहज वाचनांत आले. ते वाचतांना

गांधींच्या अंगावर शहारे आले. त्या वेळीं त्यांची प्रकृति अत्यंत क्षीण झालेली होती. गांधींचे दोन तरुण मित्र श्री. **शंकरलाल बँकर** आणि **उमरसोबानी** हे गांधीकडे रोज येत व म्हणत आपण कांहीं प्रतिकार नको कां करावयाला? गांधी म्हणत अवश्य केला पाहिजे. पण मी तर असा आंथरुणावर पडलों आहे. मला मूठभर लोकांचें जरी सहाय्य मिळालें तरी आपण या जुलमी कायद्यांना आपल्यापरी तोंड देऊं. याच वेळीं वल्लभभाई गांधीकडे रोज येत असत. रौलट बिलाचा प्रतिकार कसा करावयाचा याचा विचार करण्याकरितां एक प्राथमिक कमिटी बोलावण्यांत आली. दहा पंधरा जणांनाच निमंत्रणें गेलीं होतीं. या लहानशा सभेला श्री. **वल्लभभाई पटेल, सरोजिनी नायडू**, क्रॉनिकलचे स्वातंत्र्यप्रेमी युरोपियन संपादक **हॉर्निमन**, **शंकरलाल बँकर, उमरसोबानी** आणि **अनुसया बेन** ही मंडळी उपस्थित होती, यांपैकीं पहिलीं दोन नांवें सोडलीं तर इतर नांवें आजच्या पिढीला अपरिचित आहेत. म्हणून त्यांचेबद्दल चार शब्द लिहिले पाहिजेत.

**बेंजामिन हॉर्निमन**

हे स्वतंत्र मतवादी, उदार भावनेचे युरोपिअन गृहस्थ आहेत. इंग्रजी भाषा ते सफाईतदार लिहितात, प्रतिपक्षावर हल्ला करण्यांत त्यांचा हात धरणारा हिंदुस्थानांत दुसरा कोणी नाहीं. हिंदी स्वातंत्र्यपक्षाचे हे आहेत असें पाहून सर फेरोजशहा मेथा यांनीं त्यांना चांगला पगार देऊन बॉबे क्रॉनिकलचे मुख्य संपादक केलें होतें. हॉर्निमननीं आपल्या तडफदार लेखणीनें नोकरशाहीला हैराण केलें होतें, रौलट ॲक्टच्या निषेधार्थ जें हिंदुस्थानांत आंदोलन झालें त्यांत क्रॉनिकलची सेवा अविस्मरणीय आहे. त्यांच्या लेखणीचे फटकारे जेव्हां नोकरशाहीस सहन होईनासे झाले तेव्हां तिनें त्यांना उचलून इंग्लंडमध्यें नेऊन टाकलें व हिंदुस्थानांत येण्यास बंदी केली. हॉर्निमन यांच्या सेवेची हिंदी राष्ट्रानें चांगली कदर केली. त्यांच्यावर देणग्यांचा नुसता पाऊस पाडला होता पण त्यांच्या खर्चिक राहणीमुळें त्यांना मिळालेला पैसा त्यांस पुरा पडेना. हिंदुस्थानांत परत आल्यावर कॉंग्रेसच्या अनेक कार्य-

कर्त्यांशीं त्यांचें बिनसलें. आज ते काँग्रेसविरोधी पक्षांत आहेत पण हिंदी स्वातंत्र्याचा नेहमीं पुरस्कार करीत असतात.

**कै. शंकरलाल बँकर**

हे तडफदार व्यापारी १९१५ पासून राजकीय चळवळींत पडूं लागले, त्यांनीं व दुसरे एक तरुण व्यापारी **जमनादास द्वारकादास** यांनीं **'यंग इंडिया'** नांवाचें स्वातंत्र्यवादी इंग्रजी साप्ताहिक काढून मुंबईंत होमरूल लीगच्या चळवळीस जोर आणला. शंकरलाल बँकर यांनीं या चळवळींत खूप पैसा खर्च केला. गांधींकडे ते अधिकाधिक आकर्षित झाले. शेवटीं त्यांनीं आपलें 'यंग इंडिया' पत्राचें संपादकपद गांधींना देऊन टाकून आपण त्या पत्राचे फक्त प्रकाशक राहिले. गांधींबरोबर यांना दोन वर्षांची शिक्षा झाली होती. शिक्षा भोगून आल्यावर त्यांनीं खादीकार्यास पूर्णपणें वाहून घेतलें होतें. मुंबईला स्वातंत्र्याची चळवळी अग्रभागीं नेऊन ठेवण्यास शंकरलाल बँकर यांची निष्ठा व श्रम बरेच कारणीभूत झालेले होते.

**उमरसोबानी**

ह्या मुसलमान तरुणानें गांधींच्या पहिल्या चळवळीला खूप साहाय्य केलें. पैसा तर मुक्त हस्तानें दिलाच. शिवाय राष्ट्रकार्याची रात्रंदिवस काळजी वाहिली. टिळकांनीं १९०५ पर्यंत पुण्याहून मुंबईस येऊन धनाढ्य व्यापाऱ्यांच्या गांठीभेटी घेतल्या. पण व्यापाऱ्यांचें त्यांस हवें तसें साहाय्य मिळालें नाहीं. मात्र १९०८ सालीं टिळकांना शिक्षा झाल्यावर व्यापाऱ्यांनीं सहा दिवस कापडबाजार बंद ठेवला. टिळकांनीं पेटविलेल्या लहानशा ज्योतीनें हळूहळू ज्या तरुणांत जागृति उत्पन्न केली त्यांत **उमरसोबानी** होते. १९१८ सालीं शंकरलाल बँकर व उमरसोबानी हे दोघे मुंबईच्या राजकारणांत विशेष चमकणारे तेजस्वी तारे होते.

**अनसूया बेन**

वर उल्लेखिलेल्या तरुणांप्रमाणें अहमदाबादच्या तरुण महिला **अनसूया बेन** सार्वजनिक चळवळींत त्यागपूर्वक पडूं लागल्या होत्या. या **अहमदा-**

बादेचे कोटयाधीश व्यापारी श्री. **अंबालाल साराभाई** यांच्या भगिनी. गरिबांचा कळवळा त्यांना इतका होता कीं, त्यांनीं मजुरांच्या बाजूनें प्रत्यक्ष आपल्या भावाविरुद्ध लढा दिला होता.

### सत्याग्रह सभा

अशीं कळकळीची आपला शब्द झेलणारी माणसे गांधींना हिंदुस्थानांत आल्यावर मिळालीं. वरील तेजस्वी माणसांनी गांधींच्या सांगण्याप्रमाणें सत्याग्रहपत्रिकेवर सह्या केल्या. गांधींनी स्वत: वर्तमानपत्रांतून खूप लिहिलें. जुन्या संस्था सत्याग्रहाच्या नवीन अस्त्राचा अवलंब करणार नाहीत हें उघड होतें म्हणून सत्याग्रहसभा नावाची नवीन संस्था या मंडळींनी काढली. या संस्थेतर्फे अनेक सभा भरविण्यांत आल्या. नंतर सत्याग्रहपत्रिकेवर सही करण्याविषयीं लोकांत अहमहमिका लागली.

### ना. शास्त्री यांचा संताप

विधिमंडळापुढें रौलट कायदा पास होण्याकरिता मांडण्यात आला त्या वेळीं भारत सेवक समाजाचे अध्यक्ष **श्रीनिवासशास्त्री** यांनीं आपलें वक्तृत्व-पूर्ण भाषण करून सरकारचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. श्रीनिवासशास्त्री हे नामांकित वक्ते होते, त्यांचा आवाज अत्यंत मधुर होता पण तो प्रसंग-विशेषी तीव्रता धारण करू शके. शास्त्री यांची भावनाशील वृत्ति प्रसिद्ध होती. भारत सेवक मंडळाचे अध्यक्षपद त्यांनी देशप्रीतीने स्वीकारलेलें होते. आपल्या देशावर ह्या रौलट कायद्याचे काळेकुट्ट ढग दिसू लागतांच त्यांच्या भावना तीव्र झाल्या आणि मग त्यांचे मुखांतून अग्निवर्षाव होऊं लागला. कोणताहि सहृदय माणूस त्या भाषणानें विरघळता. पण जडप्रकृति, कठोर हृदयाचा चेम्सफर्ड व्हाइसरॉय याचेवर शास्त्रीजींच्या भाषणाचा एवढा देखील परिणाम झाला नाहीं. कारण हिंदी स्वातंत्र्य चळवळ त्याला मारून टाका-वयाची होती.

याच वेळी गांधींना मद्रासकडचें बोलावणें आले. तिकडे ते गेले त्यामुळें त्यांना पुढें जन्मभर साथ करणाऱ्या बृहस्पतितुल्य थोर पुरुषाचा लाभ झाला. हे

गृहस्थ दुसरे तिसरे कोणी नसून आपले सध्यांचे **गव्हर्नर जनरल श्री. चक्रवर्ति राजगोपालाचार्य हे होत.** राजाजी हे **सालेम** गांव सोडून मद्रासेंत वकिली करण्यास नुकतेच आले होते. यांचें मासिक उत्पन्न कित्येक हजारांचें होतें. मागें राहून काम करण्यांत ते संतोष मानीत. त्यांनींच **कस्तुरीरंग। आयंगारांना** सांगून गांधींना! मद्रासेंत आणलें होतें. गांधी हे राजाजींच्या घरीं उतरले होते 'पण कस्तुरी आयंगारांच्याकडेच आपण उतरलों आहों अशी गांधींची समजूत. शेवटीं **महादेवभाई** देसायांनीं सांगितलें कीं, राजाजी हे फार **संकुचित** गृहस्थ आहेत, त्यांची बुद्धिमत्ता अलौकिक दिसते. तुम्ही त्यांच्याशीं मैत्री करा.

**परिणामकारक कार्यक्रमाचें दर्शन**

मद्रासला सत्याग्रहाबद्दल खूप चर्चा झाली. पण लहानथोरांना सहज सुलभ होईल असा कार्यक्रम कोणालाच सुचेना. प्रत्येकानें आपलें डोकें खूप खाजविलें. शेवटीं एके दिवशीं पहाटेला गांधींना कार्यक्रम स्फुरला. तो अगदीं साधा पण मोठा परिणामकारक ठरेल असा होता. राजाजींना तो पटला मग लगेच गांधींनीं तो लिहून काढला. तो कार्यक्रम असा.

ता. ३० मार्च १९१९ रोजीं हिंदुस्थानांतील स्त्री-पुरुष, हिंदु-मुसलमान, पार्शी–ख्रिश्चन यांनीं रौलट कायद्याविरुद्ध म्हणून हरताळ पाळावा. नुसता धंदा बंद करून राहूं नये तर चोवीस तासांचा कडक उपवास करावा. या शिवाय सव स्त्री–पुरुषांनीं समुद्रावर, नदीवर, तळ्यावर अगर सार्वजनिक विहिरीवर स्नानार्थ जावें. " स्नान, उपवास व हरताळ या गोष्टी सर्वांना करण्यासारख्या सुलभ होत्या. इतकेंच नाहीं तर त्यांनीं आजपर्यंत झाली नाहीं अशी जागृति होणार होती.

हा कार्यक्रम ता. ३० ला करावा असें प्रथम जाहीर झालें होतें पण पुढें ही तारीख सहा एप्रिल ठरली.

**अपूर्व दृश्य**

ता. ६ एप्रिलला मुंबईच्या चौपाटीवर हजारोंनीं नव्हे तर लाखांनीं लोक जमले होते. हिंदुमुसलमानात एकी होती. यामुळें मुसलमानांनीं समुद्रस्नानांत

हौसेनें भाग घेतला: विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे हॉर्निमन सारखे युरोपिअन गृहस्थ यांनीं त्या दिवशीं हिंदी लोकांबरोबर समुद्रस्नान केलें. आमच्या धर्मांत ससुद्रस्नान नाहीं असें कोणींहि म्हटलें नाहीं. प्रत्येकाला तें आवडलेंच. सनातनी म्हणाले सरकारशीं पुढें जें युद्ध करावयाचें तें यज्ञस्वरूपी असणार. तेव्हां यज्ञापूर्वीं स्नान हें आवश्यक आहे. ख्रिस्ती म्हणूं लागले **जॉन डी बॅपटिस्ट** या साधूच्या सांगण्यावरून जर्डन नदींत ख्राईस्टनें असेंच स्नान केलें होतें. स्नान करून पवित्र होऊन देशकार्य करणें इष्ट होय. पुरुषांबरोबर स्त्रियाहि इतक्या मोठ्या संख्येनें ह्या राष्ट्रीय कार्यक्रमांत प्रथमच उपस्थित होत्या.

आम्ही एकादशी, शनवार, प्रदोष असे अनेक उपवास करतों पण यथेच्छ खाऊन. हल्लीं उपवासाची आम्हीं मुळीं एका प्रकारें थट्टा आरंभिली आहे. पण गांधींनीं सुचविलेल्या उपवासांत पाण्याशिवाय कांहीं घ्यावयाचें नव्हतें. गांधींच्या पद्धतीप्रमाणें सर्वांनीं कडक उपवास पाळून नवी प्रथा सुरू केली. "एकश्चद्रः तमो हन्ति " या वचनाचा अर्थ अशा प्रसंगीं चांगला कळून बिंबतो. उपवासाची सुंदर प्रथा जी मलीन झाली होती ती गांधींच्या प्रभावानें उज्ज्वल झालेली दिसली. असो. स्नानानंतर मुसलमानांच्या आग्रहावरून एका मशिदींत गांधींचें भाषण झालें.

**राजकारणांतला पेंच**

हिंदुस्थानांत राजकीय चळवळ **कॉंग्रेसनें** सुरू केली तेव्हां अन्यायाविरुद्ध राजकारणी पुरुष सभा भरवून सरकारनें केलेल्या चुक्यांचा निषेध करीत. लोकमत प्रदर्शित करणारा एक ठराव पास करून सरकारकडे धाडीत. सरकार त्याकडे ढुकूनहि पाहात नाहीं असें पाहून **टिळकांसारख्या** जहाल पुढाऱ्यांनीं निषेधाबरोबर **ब्रिटिश** मालावर बहिष्कार घातला पण कोणताहि सरकारी कायदा जाणून बुजून मोडला नाहीं. **कायदेभंग** ही गोष्ट जहाल व मवाळ पुढाऱ्यांना अमान्य होती. निदान तेथवर जाण्याचा काल अजून आला नाहीं असें **टिळकप्रभृति** लोक मानीत असत. अशा स्थितींत गांधींनीं जेव्हां **रौलट कायद्याच्या** निषेधार्थ **कायदेभंगाची** चळवळ सुरू करण्याचा आपला

मानस प्रकट केला तेव्हां **टिळक** विलायतेंत होते. त्यांचे जहाल अनुयायांना गांधींचा हा मार्ग मान्य नव्हता. म्हणून ते या वेळीं अलिप्त राहिले. मुंबईनें मात्र गांधींचा कार्यक्रम सर्वतोपरि उचलून धरला.

कायदेभंगाची कल्पना अभिनव होती पण ती अमलांत आणावयाची कशी हा प्रश्न होता. एखादी नोटीस मोडणें निराळें आणि सर्वसामान्यरीत्या सरकारी कायदे मोडणें निराळें. जुलमी सत्तेविरुद्ध बंड करणारांची नैतिक बाजू पक्की असावी लागते. म्हणून देशांत न्यायनीति राखण्याकरितां केलेले कायदे असंतुष्ट प्रजेला मोडतां येत नाहींत. जे **कायदे अन्यायी असतील, प्रजेच्या प्रगतीच्या आड येणारे असतील तेवढेच बंडखोर प्रजेला मोडण्याचा हक्क आहे.** उदाहरणार्थ, जंगल सत्याग्रहांत तुम्हांला परवानगी न घेतां गवत कापून आणतां येईल पण इमारती लांकडें वाटेल तशीं तुम्ही तोडू म्हणाल तर ते देशविघातक कृत्य होईल. कायदेभंगाची चळवळ सुरू करण्यापूर्वीं गांधींनी पुष्कळ विचार करून कांहीं निवडक निर्बंध मोडण्याचें ठरविलें. सरकारने अत्याचाराला उत्तेजन दिणारें वाङ्मय जप्त करतां करतां अनेक चांगली पुस्तकें त्यांना आवडलीं नाहींत म्हणून जप्त करण्याचा सपाटा चालविला होता. दे. भ. **शिवरामपंत परांजपे** यांचे 'काळांतील निवडक निबंध.' हे स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारे होते म्हणून सरकारनें जप्त केले. यामुळें लोकांना फार वाईट वाटलें. पण करतात काय ? फक्त मनगटें चावीत बसले. गांधींनीं **हिंद स्वराज्य** नांवाचें एक पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें होतें, त्यांत त्यांनीं हिंदी स्वराज्य कसें असावें हें दाखविलें होतें. त्यांत राजद्रोह नव्हता, अत्याचारास उत्तेजन नव्हतें, पण सध्यां प्रचलित असलेल्या राज्यपद्धती-विरुद्ध बरेंच कडक लिहिलें होतें पण एवढ्याकरितां तें जप्त करण्यासारखें खास नव्हतें. **हिंद स्वराज्य** यासारखें पुस्तक जप्त करणें हा धडधडीत अन्याय होता म्हणून या पुस्तकासंबंधींचा निर्बंध मोडण्याचें गांधींनीं ठरविलें. पुस्तकाच्या हजारों प्रती छापून घेतल्या. तत्पूर्वीं कांहींनीं शंका काढली कीं, जो मनुष्य हें पुस्तक छापील व विकील त्यालाच शिक्षा होईल असें नाहीं तर जो

तें घेईल त्यालाहि शिक्षा होईल. अशा स्थितींत तुम्हांला पुस्तक छापून कोण देतो. बरें एखाद्या छापखान्यानें तें पुस्तक छापलें तरी एवढ्या प्रती विकणारें कोण मिळणार बरें? जप्त वाङ्मय विकणारे कांही धाडसी तरुण तुम्हांला मिळाले तरी या मुबईत पाच सहा हजार लोक हें पुस्तक विकत घेऊन शिक्षा भोगण्यास तयार होतील हें शक्य नाहीं. शंका काढणाऱ्याची शंका वावगी नव्हती. **पुढें जावयाचें** कसें हा प्रश्न अनकांना अनेक वेळा पडतो

वानर सैन्य हिंदुस्थानच्या दक्षिण टोंकावर येऊन पोहोंचलें तों त्याना अफाट दुर्लंघ्य असा सागर दिसला. हा ओलांडल्याशिवाय लंकेंत जातां येत नव्हतें. सर्वांनाच प्रश्न पडला की आतां पुढें जावयाचें कसें? अनेक वानर वीर आपली शक्ति किती हें सांगत होते. कोणी म्हणे आपण दहा योजनें उडी मारू. दुसरा म्हणे आपली शक्ति पन्नास योजनांची आहे. असें करतां करतां एक जण म्हणाला, मी शंभर योजनें जाईन पण मग परत येण्याची शक्ति आपल्यांत राहणार नाहीं. शेवटीं मारुतीनें शतयोजनें पसरलेल्या सागरावरून उडी मारण्याचे धैर्य दाखविलें. त्या वेळीं हें शक्य आहे असें कोणास वाटलें नव्हते. **जेथें एका पिढीचे नेते पुढें प्रगति अशक्य म्हणून थांबतात, तेथें नव्या काळचा, नव्या दमाचा, नव्या कल्पनेचा पुरुष पुढें येतो व मागच्या पिढीला अशक्य वाटणाऱ्या गोष्टी करून टाकतो.** मागील पिढीला वाटत होतें कीं, कायदेभंग करावयाला लोक पुढें येणार नाहींत. असें वाटण्याचें कारण त्यांचा नव्या पिढीशीं निकट संबंध राहिला नव्हता. पण गांधींचा संबंध प्रतिक्षणीं वाढत होता. यामुळें गांधींचा हात राष्ट्राच्या नाडीवर आहे असें लोक म्हणत.

### मार्ग मोकळा झाला

कायदेभंग करावयाला लोक पुढें येतील असा गांधींचा अंदाज होता म्हणूनच त्यांनीं पांच हजार पुस्तकें छापली. ता. ६ एप्रिलला सायंकाळीं स्वयंसेवकांची भली मोठी फौज पुस्तके घेऊन बाहेर पडली. पुस्तकें विकत घेण्याकरितां लोक त्यांचेवर तुटून पडत होते. इकडे गांधी स्वतः सरोजनी नायडू

यांचेबरोबर मोटारींत बसून पुस्तकें विकण्यास निघाले होते. गांधींच्या हातून पुस्तक मिळावें म्हणून चार आण्यांच्या पुस्तकाला लोक रुपया, पांच रुपये, दहा रुपये द्यावयाला तयार झाले. दहा रुपयांच्या नोटा मोटारींत उडून येत आहेत असें दिसलें. एकानें तर एका पुस्तकास पन्नास रुपये दिले. त्या दिवशीं जप्त पुस्तकें **विकत घेऊन पांच हजार माणसांनीं आपणांस शिक्षेस पात्र करून घेतलें.** असा प्रसंग मुंबईंत केवळ नव्हे तर हिंदुस्थानांत पहिलाच होता. या प्रसंगाच्या वर्णनाच्या तारा जगभर गेल्या आणि जगांतील मुत्सद्दी आश्चर्यचकित होऊन क्षणभर तटस्थ झाले. ब्रिटिश नोकरशाहीला आपलें लोकांवरील वजन संपलें काय असा संशय पडला. हिंदी जुने मुत्सदी म्हणूं लागले कीं, ही सारी आतषबाजी आहे. ब्रिटिशसिंहानें गर्जना केली कीं, हे मुंबईकर किती टिकतात तें दिसेल.

गांधींचा कार्यक्रम मुंबईस विशेष आकर्षक झाला. तसे इतर लहान मोठ्या शहरीं हरताळ, सार्वजनिक स्नान, उपवास हे कार्यक्रम उत्साहानें पार पडून गांधींच्या मोहिमेस अखिल भारतीय स्वरूप आलें. जप्त पुस्तकें विकण्याच्या गुन्ह्याकडे सरकारनें जाणून बुजून दुर्लक्ष केलें. सरकार म्हणालें, "या गांधींच्या माकडचेष्टेला नसतें महत्त्व आम्ही देणार नाहीं."

**नोकरशाहीचा दुष्ट बेत**

अखिल हिंदुस्थानांत पंजाबचे अधिकारी अधिक कठोर केवळ नव्हे तर कमालीचे दुष्ट होते. हिंदुस्थानच्या लष्करांत पंजाबी लोकांचा भरणा विशेष होता. पंजाबी लोकांची इंग्रजी राज्याबद्दलची निष्ठा अविचल होती. १८५७ सालीं इतर प्रांतांतील सैनिक बंड करून इंग्रजांविरुद्ध उठले त्या वेळीं इंग्रजांची बाजू पंजाबी सैनिकांनीं राखली होती. यामुळें हिंदुस्थान सरकार पंजाबी सैनिकांना विशेष सवलती देई. पंजाबी लोकांना मोठ्या अधिकाराच्या जागा मिळत यामुळें ते लोक नेहमीं राजनिष्ठ राहिल्यास नवल नव्हतें. पण महायुद्धांत गोरे व काळे सैन्य जर्मनीविरुद्ध एकत्र लढले. त्या वेळीं पंजाबी सैनिकांना वाटूं लागलें कीं, **आपण गोऱ्या सैनिकांपेक्षां पराक्रमांत मुळींच**

**कमी नाहीं मग आम्हांला पगार कमी कां?** अननुभवी तरण्या गोऱ्या सोल्जराला अधिकारी म्हणून घेण्यांत येतें आणि आम्हांला जन्मभर खपून जमादाराच्या हुद्द्यापलीकडे जातां येत नाहीं, हा न्याय कोठचा? अशी चर्चा तरुण सैनिकांत नेहमीं चाले. यामुळें त्यांच्यांत असंतोष उत्पन्न झाला होता. इतकेंच नाहीं तर गोऱ्या लोकांचा दराराहि त्यांना वाटेनासा झाला होता. ही गोष्ट वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्यांना कळली होती. शिवाय गांधींबद्दल सैनिकांनाहि आदर वाटूं लागला होता. एकदां का सैनिकांची राजनिष्ठा डळमळूं लागली कीं, इंग्रजी राज्यसत्तेला धोका उत्पन्न होईल, या विचारानें लष्करी अधिकारी व गव्हर्नर सर **मायकेल ओडवायर** यांनीं संगनमत करून पंजाबी लोकांना अद्दल घडेल असें कांहीं तरी करावयाचें ठरविलें. ते संधि पाहात होते ती त्यांना रौलट कायद्याच्याविरुद्ध गांधींनीं चालविलेल्या चळवळीच्या वेळीं मिळाली.

**उपकाराची फेड अपकारानें**

हिंदी लोकांनीं महायुद्धाचे वेळीं सरकारला साहाय्य केलें या उपकाराची फेड अपकारानें कशी केली गेली तें आपण आतां पाहूं.

**दिल्लींतला भीषण प्रसंग**

महात्मा गांधींनीं राष्ट्राला दिलेला कार्यक्रम पार पाडण्याची जबाबदारी दिल्लींत **स्वामी श्रद्धानंद व हकीम अजमल खां** यांनीं घेतली होती. या दोघांचें दिल्लींत अतोनात वजन होतें. दोघेहि थोर हृदयाचे गृहस्थ होते. येथें एका गोष्टीचा थोडासा खुलासा केला पाहिजे. हरताळ, उपवास वगैरे करण्याचा दिवस प्रथम ३० मार्च हा ठरला होता. पुढें आयत्या वेळीं तो बदलून ६ एप्रिल केला गेला. पण दिल्लीकरांना ही बातमी फार उशीरा कळली. म्हणून त्यांनीं ३० मार्चलाच हरताळ पाडून एक जंगी मिरवणूक काढली. मिरवणुकींत हजारों हिंदु मुसलमान सामील झाले. हिंदु मुसलमान हातांत हात घालून चालतात इतकेंच नव्हे तर स्वामी श्रद्धानंदांना **जुम्मा मशिदींत** भाषण करण्यास बोलावतात व त्यांचा सन्मान करतात हें नोकर-

शाहीस कसें सहन होणार? **हिंदु मुसलमानांत जोंपर्यंत दुही आहे तोंपर्यंतच आपलें येथें राज्य राहील हें तिला माहीत होतें.** प्रो. **सिली** या नांवाच्या इतिहासाच्या इंग्लिश प्रोफेसरनें आपल्या तरुण विद्यार्थ्यांना इंग्लंडमध्यें स्पष्टपणें सांगून टाकलें होतें कीं, हिंदुस्थानांत जोंपर्यंत दुही आहे तोंपर्यंतच आपलें राज्य तेथें राहील. सूर्य **उगवला कीं, घनदाट अभ्र जसें क्षणांत नाहींसें होतें तसें आपलें साम्राज्य एक दिवस तेथें** एकी झाल्याबरोबर **एकाएकी नाहींसें झालेलें दिसेल.** सिली साहेबांचा इशारा नोकरशाहीनें चांगला लक्षांत ठेवून आमच्यात दुही उत्पन्न करून ती चालू ठेवण्याचा अविरत उद्योग चालू ठेवला होता. असो.

**पोलिस दंगा घडवून आणतात**

हिंदु मुसलमानांची मिरवणूक गाधीच्या आदेशाप्रमाणें शातपणें चालली होती. गांवांत कडक हरताळ असून एका मिठाईवाल्यानें स्टेशनांत मिठाई विकण्याचें धाडस केलें. कोणीं तरी त्याला हटकलें. तो चिडला व वावगें बोलूं लागला. लोकांनीं त्याला दरडावलें व कोणी तरी त्याला धक्का दिला. एवढेंच कारण पोलिसांना मध्यें पडावयाला पुरेंसें झालें. त्यांनीं मॅजिस्ट्रेटला सांगितलें कीं, भयंकर दंगा होण्याचा संभव आहे. लगेच त्याने त्या शांतपणें चाललेल्या मिरवणुकीला बेकायदा जमाव ठरविलें व "पांच मिनिटांत घरोघर चालते व्हा" म्हणून हुकूम सोडला. लोक अशा वेळीं हुकूम कसले ऐकतात? लोक घरी जात नाहींत असें पाहून त्यानें गोळीबाराचा हुकूम दिला. त्याबरोबर लोक चिडले व त्यांनीं दिल्लीचें स्टेशन जाळलें. मग सरकारने लष्करी कायदा जारी केला. **दिल्लीप्रमाणें** लाहोर व अमृतसर येथें नोकरशाहीनें कांहीं तरी कुरापत काढून लोकांना चिडविलें. मग लोकांनीं अत्याचार करण्यास कमी केलें नाहीं. यानंतर लष्करी कायदा पुकारून जनतेचा अमानुष छळ करणें सरकारला सुलभ झालें. हा **इंग्रजांच्या कीर्तीला कायमचा काळोमा लावणारा ठरला.** अमृतसर येथील प्रसंग अंगावर शहारे आणणारे आहेत. स्वराज्य मिळवितांना आपणाला कोणत्या

दिव्यांतून जावें लागलें हें तरुण पिढीला कळावें म्हणून या प्रसंगाच्या वर्णनाकरितां अधिक पानें खर्चीं घालावीं लागणार आहेत.

## सैतानी तांडव

हिंदुस्थानांत रौलट कायद्याच्या निषेधार्थ हरताळ, उपवास, मिरवणुकी ज्याप्रमाणें निघाल्या त्याप्रमाणें **अमृतसरला**हि मिरवणूक निघाली होती. ही मिरवणूक जितक्या शांतपणें जावयास पाहिजे होती तितकी ती गेली. सरकारविरुद्ध चळवळ करतांना लोकांना एक प्रकारचा उन्माद येतो. या उन्मादाचे भरांत लोकसमुदायाच्या इच्छेविरुद्ध जो कोणी जाईल त्याचा अपमान करण्यास मिरवणुकींतले लोक मागें पुढें पाहात नाहींत. याच वेळीं जुने हेवेदावे लोक उगवून घेतात. म्हणून लोकमत तापवितांना पुढाऱ्याला फार काळजी घ्यावी लागते. हजारों लोकांना कह्यांत ठेवील अशी स्वयंसेवकांची तुकडी नेत्याजवळ हवी. नाहीं तर कल्पना नाहीं असे अनर्थ घडतात आणि मग चळवळीचें पाऊल मागें येतें. अमृतसरला असेंच झालें. उत्सहाचे भरांत लोकांनीं अत्याचार केले तेव्हां खरें पाहिलें तर सरकारनें लोकांच्या पुढाऱ्यांना विश्वासांत घेऊन शांतता प्रस्थापित करावयास हवी होती. पण तसें न करितां सरकारनें एकदम लष्करी कायदा पुकारला. लष्करी कायदा पुकारल्यावर शहराच्या संरक्षणाची, वाहतुकीची सर्व व्यवस्था लष्कराच्या ताब्यांत जाते. आजकाल **"कर्फ्यू"**ची लोकांना संवय झाली आहे. १९१९ सालीं अशा गोष्टींना सामान्य लोक पारखे होते. यामुळें त्यांचे हातून लष्करी कायदा पालनांत चुका होत. त्या झाल्या म्हणजे शिपाई त्यांना गोळी घालून ठार करीत, किंवा त्यांना धरून उघडे नागडे करून भर रस्त्यावर फटके देत. अमृतसरमधील स्त्रियांची अब्रू या दिवसांत सुरक्षित नव्हती. कित्येक स्त्रियांना विवस्त्र करून फटके देण्यांत आले. एका गल्लीसंबंधानें असा कायदा केला होता कीं, त्या गल्लींतून जाणाऱ्या येणाऱ्या इसमानें उभें चालतां कामा नये. त्यानें पोटावर पडून सरकत गल्लींतून गेलें पाहिजे. अशा तऱ्हेचा उपमर्दकारक हुकूम निघण्याचें कारण असें सांगण्यांत येत असे कीं, ह्या गल्लींत एका युरोपिअन शिक्षिकेचा

अपमान हिंदी लोकांनीं केला होता; पण ह्या बाईनेंहि हिंदी लोकांसंबंधीं अपमानकारक भाषा वापरली होती. पण आज सत्ता होती गोऱ्या लोकांच्या हातांत. त्यांना हिंदी लोकांना दाखवून द्यावयाचें होतें कीं, एका गोऱ्या स्त्रीच्या वाटेस जाण्याचें काय परिणाम होतात ते. अमृतसरच्या लोकांना गोळ्या घालून उंदरासारखें मारणें अधिकाऱ्यांना त्या वेळीं सुलभ होतें. पण या कृत्यामुळें सबंध देशभर जो असंतोषाचाच केवळ नव्हे तर सूडाचा वणवा पेटला तो विझविणें त्यांच्या सर्वथैव आटोक्याबाहेरचें होतें हें पुढील घटनांवरून ठरलें.

**घुशीचा सांपळा**

नोकरशाहीचें समाधान एवढ्या छळानें झालें नाहीं. तिला रक्ताची चटक लागली होती. हजारों स्त्री–पुरुषांच्या रक्ताचे घोट आकंठ घेतल्या-शिवाय तिची तृप्ति होणार नव्हती. म्हणून तिनें लाला **हंसराज** नांवाचा एक उलटया काळजाचा मनुष्य गांठला. त्यानें लोकांना धडधडीत खोटें जाऊन सांगितलें कीं "ता. १३ रोजीं चार वाजतां **जालियनवाला** बागेंत सरकारच्या निषेधाची जाहीर सभा भरणार आहे. अध्यक्षस्थान लोकप्रिय पुढारी लाला **कन्हयालाल** स्वीकारणार आहेत." कर्फ्यू सुरू होण्याचे आंत आपण परत येऊं या विचारानें लोकांची रीघ जालियनवाला बागेकडे लागली. जालियनवाला ही बाग नसून एक विस्तीर्ण बखळ आहे. याचें सभोंवतीं मोठमोठ्या इमारती आहेत. बखळीला जुनें पुराणें विटांचें कॉम्पाउंड असून आंत शिरावयाला एकच लहान फाटक होतें. सायंकाळीं पांच वाजतां वीस एक हजार लोक या बखळींत जमले. त्या वेळीं लष्करी विमानें त्यांचेवरून घिरट्या घालून गेलीं. कांहींना थोडा संशय आला पण लोकांनीं **हंसराजवर** अंध विश्वास ठेवला. पाहिजे तितके लोक जमल्याची वार्ता लष्करी अधिकारी जनरल **डायर** याला कळतांच तो आपली लहानशी पलटण व तोफा घेऊन आला. जालियनवाला बागेच्याकॉम्पाउंडबाहेर ठाण मांडून जनरल डायरनें बागेंतील निःशस्त्र लोकांवर वीस मिनिटें सारखा गोळीबार केला. शेवटीं दारु-गोळा संपला तेव्हां तो आपलें सैन्य घेऊन छावणीकडे गेला. या कृत्यांत त्यानें

एक हजार लोक ठार व तितकेच जखमी केले. या कत्तलींत सात महिन्यांच्या बालकापासून सत्तर वर्षांच्या वृद्धापर्यंत लोक होते. या गोळीबारानें जितके अधिक बळी घेतां येतील तितके घेण्याचा आपला विचार होता असें जनरल डायरनें पुढें चवकशी कमिटीपुढें सांगितलें. विशेष क्रूरपणाची गोष्ट म्हटली म्हणजे गोळीबार सुरू झाल्यानंतर कांहीं लोक पळून जीव वांचविण्याचा प्रयत्न करीत असतां त्यांना लष्करी शिपायांनीं फाटकांतून जाऊं दिलें नाहीं व बखळींत कोंडून मारलें. गोळीबारानंतर जखमी लोकांना हॉस्पिटलांत पोहोंचविण्याची पद्धत आहे. त्याप्रमाणें अधिकाऱ्यांनी कांहींहि केलें नाहीं इतकेंच नव्हे तर कांहीं लोक जखमी लोकाची चवकशी करण्यास बखळींत जाऊं लागले तर त्यांना बाहेर अडविण्यांत आलें. रतनदेवी या नावाच्या स्त्रीनें या भीषण प्रसंगाचा स्वानुभव सांगितला आहे. “ रात्री पति घरीं न आल्यानें मी बागेंत जाऊन पतीचें प्रेत एकटीनें धुंडाळून काढले. तितक्यांत आठ वाजले.' शहरांतील सर्व रहदारी बंद झाली. मग मी घरोघर फिरून पतीचें प्रेत घरापर्यंत पोहोंचविण्यास मदत करण्याविषयीं लोकांना विनवणी केली असतां गोळीबाराच्या दहशतीनें कोणीहि बाहेर येईना ! मग मी परत त्या कत्तलखान्यांत जाऊन पतीच्या प्रेताशेजारी बसले लवकरच त्या मसणवटींत कुत्र्यांचा धुमाकूळ सुरू झाला. तेव्हां मी माझा व माझ्या नवऱ्याच्या प्रेताचा बचाव करण्याकरितां तेथील एक काठी घेतली व कुत्र्यांना दटावीत ती काळरात्र त्या स्मशानांत घालविली. ज्यांचा प्राण अद्याप गला नव्हता अशांचें विव्हळणें, कुत्र्यांचे भुकणें, दिवाभीतांचा घूत्कार, शेजारच्या इमारतींतील घड्याळाचे ठोके व आपल्या धडधडणाऱ्या छातीचे ठोके याखेरीज दुसरें कांहीहि ऐकूं येत नव्हतें. रात्रीं कांही चोर, भामटे तेथें आले व त्यांनीं मृतांचें खिसे चाचपून नोटा, घड्याळें, कांहीं रोकड हातीं लागतें काय हें पाहिलें. ”

**पापाला वाचा फुटली**

या भीषण कृत्यांची माहिती सरकारनें बरेच दिवस बाहेर येऊंच दिली नाहीं. पुढें साद्यंत वृत्तांत जेव्हां लोकांना कळला तेव्हां हिंदुस्थानांतील हिंदी

वर्तमानपत्रें पंजाबचा गव्हर्नर व त्याचे युरोपिअन हस्तक यांचेवर तुटून पडलीं. पंजाबमधील अत्यचाराची चवकशी व अपराधी अधिकाऱ्यांस शिक्षा करा अशी मागणी कॉंग्रस नेत्यांकडून झाली. तेव्हां सरकारनें **हंटर** नांवाच्या एका बड्या अधिकाऱ्याच्या अध्यक्षतेखालीं एक चवकशी कमिटी नेमली.या कमिटींतले सर्वच लोक सरकारची तळी उचलून धरणारे असल्यामुळें तिचा अहवाल कोणत्या स्वरूपाचा होणार याची कल्पना हिंदी नेत्यांना होतीच म्हणून सरकारवर अवलंबून न राहतां आपण आपली स्वतंत्र चवकशी कमिटी नेमण्याचें कॉंग्रेसने ठरविलें. लोकांच्या विश्वासाचें सरकार असलें म्हणजे लोक अशी स्वतंत्र कमिटी नेमीत नाहींत. ते सरकारजवळ एखाद्या कठिण प्रसंगाच्या चवकशीची मागणी करतात. उदा., परवां **रामदास बोट** बुडून शेकडों माणसें दगावलीं. अशा परिस्थितींत या अपघाताची जबाबदारी कोणावर, नियमनाच्या कायद्यांत कांहीं दोष राहिले आहेत काय, वादळाची पूर्व कल्पना हवामानखात्यानें दिली होती कीं नाहीं अशा अनेक प्रश्नांची चवकशी सरकारी कमिटी करते व यापुढें असे अपघात होऊं नयेत म्हणून काय उपाययोजना कराव्या हेंहि सरकारला सुचविते. व सरकार नंतर कमिटी अहवालाचा विचार करून त्या मूचना सर्वच्या सर्व किंवा त्याना पसंत पडतील त्या सूचना स्वीकारते. हंटर कमिटीवर लोकांचा विश्वास नव्हता. म्हणून कॉंग्रेसनें गांधींच्या नेतृत्वाखालीं एक वजनदार कमिटी नेमली.

**कमिटीचें काम सुलभ नव्हतं**

यांत **पंडित मोतीलाल नेहरू, देशबंधू दास, अब्बास तय्यबजी**, आणि **बॅरिस्टर जयकर** अशासारखे नामवंत लोकाग्रणी होते. हे सर्व पंडित **मदन मोहन मालवीय** यांनीं घडवून आणलें होतें. सरकारी कमिटीचें काम सुलभ असतें' अधिकारी लोक कमिटी ज्या जागीं जाईल तेथील अनेकविध कार्यांत सुलभता आणून देण्यास सिद्ध असतात. लोकहि निर्भयपणें माहिती देण्यास पुढें येतात. आपण स्वतः पाहिलेली, अनुभवलेली अगर ऐकलेली माहिती सांगणारांना कमिटीचे "साक्षीदार" अशी संज्ञा असते. पण खाजगी कमिटीचें काम निदान

१९१९ सालीं पंजाबातल्या भीषण हत्याकांडाची चवकशी करण्याचें अत्यंत कठिण होतें. अधिकाऱ्यांच्या भीतीनें कोणी खरें सांगण्यास येत नव्हता व सरकारी अंमलदार सरकारविरोधी कमिटीच्या कामांत विघ्नें न आणतील तर नवल. परंतु आमचे नेते असामान्य धीराचे, अलौकिक बुद्धीचे व विलक्षण चिकाटीचे होते. मानवी उद्योगाची परिसीमा गांठून या मंडळींनीं सरकारी जुलमासंबंधीं यथार्थ माहिती जमविली. पंजाबमधील खेड्यापाड्यांतून गांधी स्वतःहिंडले. अत्याचाराच्या जागा स्वतः पाहिल्या, ज्या स्त्रियांवर अत्याचार झाले त्यांच्याकडून माहिती घेणें किती तरी कठिण होतें. प्रत्येकाला विशेषतः [स्त्रियांना लज्जा असते यामुळें त्यांची साक्षच पुष्कळ वेळां मिळत नाहीं. आणि मग अत्याचारी लोकांचें पाप त्यांच्या पदरांत घालणें अत्यंत कठिण जातें. आपल्या महाराष्ट्रांत १८९७ सालीं प्लेगच्या दिवसांत गोऱ्या शिपयांनो पुण्यांतील कांहीं स्त्रियावर अत्याचार केले त्याची माहिती नामदार गोखल्यांना विलायतेंत पत्रें पाठवून कांहीं लोकांनीं कळविली. हिंदी स्त्रियांवर जुलूम होत आहे हें कळतांच तरुण गोखले रागानें लाल झाले व संतापाच्या भरात त्यांनीं ब्रिटिश सोल्जर्स पुण्यांत स्त्रियांवर अत्याचार करतात व सरकार दाद घेत नाहीं असें उघडपणें म्हटलें. सरकारनें व ब्रिटिश पत्रांनीं याला पुरावा द्या असें गोखल्यांना विचारलें पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं ज्यांवर अत्याचार झाले त्या स्त्रिया लोकलज्जेनें साक्ष द्यावयाला पुढें येत ना. स्त्रिया राहोत पण पुरुषहि ही गोष्ट उघड सांगावयाला तयार नव्हते. मग गोखल्यांना ब्रिटिश लोकांची आपण उगाच बदनामी केली म्हणून माफी मागण्याचा प्रसंग आला.

**गोषांतील स्त्रियांचा गांधींवर विश्वास**

पंजाबमध्यें गांधी चवकशी करतां गेले तेव्हां गोषांतील स्त्रियांनीं आपला गोषा झुगारून देऊन गांधींचें स्वागत केलें. आपल्या हातानें कातलेल्या सुंदर सुताच्या गुंड्याची रास गांधींच्या चरणीं अर्पण केली. विशेष सांगावयाची गोष्ट म्हणजे या स्त्रियांनीं गांधीजवळ मन मोकळेपणानें अत्याचाराची साद्यंत हकीकत सांगितली. कोणाला वाटलें आपला भाऊ

घरीं आला आहे, कोणाला पित्याची भेट झाल्याचा आनंद झाला तर लहान लहान चिमखडया मुली तर गांधींचे कपडे ओढून आपल्याकडे त्यांचें चित्त ओढूत घेत. असे प्रसंग पंजाबमधल्या अनेक खेडयांत घडले. गांधींना पंजाबी भाषा येत नव्हती. मोडकेंतोडकें हिंदी येत होतें. पण विश्वास व प्रेम यांना शब्दांची गरज नसते. स्त्रिया व मुलें यांना निष्पाप मनुष्याची स्निग्ध दृष्टि चटकन कळते. ज्या स्त्रिया आपल्या नातेवाईकांजवळ मन मोकळें बोलण्यास तयार नव्हत्या त्या गांधींना पाहिल्याबरोबर विश्वासानें त्याजवळ बोलूं लागल्या. यांतच गांधींची निष्पाप वृत्ति लोकांना प्रतीत झाली. अशा ह्या काळांत गांधींना "महात्मा" पदवी कायमची येऊन चिकटली यांत नवल नाहीं.

**सैतानी सरकार**

कॉंग्रेसच्या कमिटीनें एकंदर १७०० स्त्री–पुरुषांच्या साक्षी ऐकल्या पण त्यांतील ६५० च नमूद केल्या. गांधी हे सत्याचे पक्षपाती यामुळें, या साक्षींत सत्य तेवढेंच दिलें गेलें आहे. कोठेंहि अतिशयोक्ति अगर असत्य गोष्टी त्यांनीं नमूद करूं दिली नाहीं. गांधींनींच निम्म्यापेक्षां अधिक काम केलें व पंजाबच्या आंतरभागांत ते हिंडून आल्यामुळें त्यांनाच सरकारी अधिकाऱ्यांच्या अत्याचारांची खरीखुरी कल्पना आली. मग त्यांच्या अंगाची लाही होऊन सरकारला त्यांनीं " सैतानी सरकार " म्हणण्यास सुरुवात केली. पूर्वी त्यांना वाटे ब्रिटिश साम्राज्यांतच राहून हिंदुस्थानचें कल्याण होईल म्हणून ते महा-युद्धाच्या काळांत सरकारला साहाय्य करावें असें म्हणत होते. आतां त्यांना राम-राज्याचे ठिकाणीं यमराज्य दिसलें आणि मग मात्र ते ब्रिटिश साम्राज्याचे कट्टे दुष्मन झाले व आपले पुढील आयुष्यांत त्यांनीं हें साम्राज्य नाहींसें करण्याची शर्थ केली.

क्रोधाच्या आवेशांत तोल सुटून अधिकाऱ्यांनीं कांहीं अत्याचार केले असले तर सरकार त्यांना शासन करील अशी गांधींना आशा होती. म्हणून त्यांनीं कमिटीच्या रिपोर्टांत सरकारला विनंती केली कीं, " (१) जनरल

डायरला नोकरींतून बडतर्फ करा. (२) गव्हर्नर सर मायकेल ओडवायरनें आपली जबाबदारी ओळखली नाहीं व हाताखालील अधिकाऱ्यांना अत्याचार करूं दिले याबद्दल ठपका देऊन परत बोलवा. (३) ज्यांनीं प्रत्यक्ष अत्याचार केले त्यांना कडक शिक्षा द्या. (४) लष्करी कायद्याखालीं ज्यांना क्रूर शिक्षा दिल्या गेल्या आहेत त्यांना सोडून द्या." घडलेल्या अत्याचारांच्या भीषणतेच्या मानानें काँग्रेस कमिटीनें आपल्या मागणीचें स्वरूप अगदींच सौम्य ठेवलें होतें. अर्ध्या राज्याचे ऐवजीं पांच गांवें दिलीं तरी पुरेत ह्या पांडवांच्या मागणीसारखीच ही मागणी होती. **थोर पुरुष अशी अल्पमागणी करण्यांत प्रतिपक्षाचा सज्जनपणा कसाला लावीत असतात.** पांच गांवांच्या मागणीला दुर्योधनानें उत्तर दिलें कीं, सुईच्या अग्रावर राहील एवढी जमीन देखील देणार नाहीं. त्याप्रमाणें सरकारनें काँ. कमिटीच्या अल्प मागण्या धुडकावून लावल्या व गव्हर्नर ओडवायर याची पाठ थोपटली, डायरच्या गुन्ह्याला अनवधानपणें घडलेली चूक म्हटलें. एकंदरीनें सरकारला या हत्याकांडांत दोषास्पद असें कांहीं दिसलेंच नाहीं. जें बक्षिस घ्यावयाला सरकार कचरलें तें बक्षिस घ्यावयाला **मॉर्निंग पोस्ट** व **पायोनिअर**सारखीं अँग्लो इंडियन वर्तमानपत्रें पुढें आलीं. त्यांनीं डायरचें चिरस्मारक करण्याकरितां फंड जमा केला. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं हा फंड जमविण्यांत इंग्लिश स्त्रियांनीं विशेष पुढाकार घेतला. लंडनमध्यें मॉंटेग्युसारख्या सद्प्रवृत्त लोकांनीं पार्लमेंटमध्यें या अत्याचारांचा निषेध केला पण लॉर्डांच्या सभेनें **डायरचा** उद्देश लक्षांत घेऊन त्याला माफी द्यावी असा ठराव केला. मग काय हिंदी सरकारनें याच्या पुढें जाऊन ज्या लहान मोठ्या पोलिस व लष्करी अधिकाऱ्यांनीं अत्याचार केले त्यांना माफी देऊन टाकून हिंदी हृदयाच्या जखमांत मीठ चोळून त्यांच्या वेदना असह्य करून टाकल्या.

---

# १२. असहकारिता १९२०

पंजाब प्रकरणांत सरकारी अधिकाऱ्यांनीं जे भीषण आत्याचार केले त्याचा परिणाम हिंदी पुढाऱ्यांवर कल्पनातीत झाला. सरकारनें ज्या वेळीं सरकारी अधिकाऱ्यांना शिक्षा करावयाच्या ऐवजीं त्यांचें कौतुक चालविलें त्या वेळीं हिंदी पुढाऱ्यांच्या अंगाची लाही झाली. आतां या सरकारचें काय करावें असें त्यांस होऊन गेलें. कांहीं क्रांतिकारक तरुणांनीं गुप्तपणें शस्त्रास्त्रांची जमवाजमव चालविली होती. पण असे प्रयत्न अगदींच फुटकळ होते. वर्तमानपत्रांतून लेख लिहून आणि जाहीर सभांतून सरकारचा निषेध करून सरकारवर कांहीं एक परिणाम होणार नव्हता. आतां काय करावें, कोणत्या उपायांनीं नोकरशाहीस वठणीवर आणावें हें लोकनायकास समजेना.

**गांधींचे विचार**

गांधींचें विचारचक्र निराळ्याच दिशेनें चालू झालें होतें. ते मनांत म्हणत होते " राजसत्तेला अत्याचार दडपून टाकण्याकरितां कधीं कधीं थोडें उग्र स्वरूप धारण करावें लागतें. परंतु पंजाब प्रकरणांत जाणूनबुजून हजारों निरपराधी लोकांची त्यांना फसवून जी कत्तल केली ती काय देशांत शांतता प्रस्थापित करण्याकरितां ? लोकांना रस्त्यांतून सरपटत जाण्याचा जो हुकूम देण्यांत आला तो बंडाचा उपशम करण्याचाच एक मार्ग होता काय ? भर चव्हाट्यावर स्त्री–पुरुषांना नग्न करून फटके देण्यांत आले ते काय ब्रिटिश साम्राज्य सावरून धरण्याकरितां ? कितीहि विचार केला. सरकारच्या दृष्टिकोनांतून या अमानुष [गोष्टीकडे पाहिलें तरी अधिकाऱ्यांचें हें कृत्य कोणत्याहि तऱ्हेनें समर्थनीय ठरत नाहीं. त्यांत प्रजेवर सूड घेण्याचा उद्देश धडधडीत दिसतो. **राजा प्रजेचा सूड घेऊं शकतो काय ?** अपराध्यांना तो आईच्या ममतेनें शिक्षा करूं शकेल. परंतु प्रजापालक राजा जेव्हां सूड घ्यावयास तयार होतो, इतकेंच नव्हे तर आपल्या सूडाचें समर्थन करण्यास

पुढें येतो, आणि अत्याचारी अधिकाऱ्यांची पाठ थोपटण्यास सज्ज होतो त्या वेळेला **तो प्रजापालक म्हणून राहण्यास नालायक सर्वस्वीं नालायक ठरतो.** ब्रिटिश सम्राट हा स्वतः कांहींहि करूं शकत नाहीं." साम्राज्य संस्था ही सर्व कांही करते आणि तीच संस्था या पंजाबांतील भीषण अत्याचारास जबाबदार आहे. आजपर्यंत मला वाटत होते की, ब्रिटिश साम्राज्याच्या छत्राखालीं राहून हिंदुस्थानची सर्वांगीण उन्नति होईल. इंग्रज सरकार चुका करीत नाहीं असें नाहीं.परंतु आज नाहीं उद्यां आपण निरनिराळया मार्गांनीं चुकणाऱ्या सरकारला रस्त्यावर आणूं. परंतु पंजाबमध्यें सरकारनें आपलें जे स्वरूप दाखविले ते राज्यकर्त्याला शोभण्याजोगें नसून **सैतानाला शोभण्याजोगें** होतें. आतां ब्रिटिश सरकार हें सैतानी सरकार आहे याची मला पुरेपूर जाणीव झाली. ही जाणीव झाली नव्हती म्हणूनच मी आमचेवर आफ्रिकेंत अन्याय होत असतांना देखील **बोअर** युद्धांत सरकारला साहाय्य केलें. महायुद्धांत सरकार-करितां रिक्रूट मिळवून देण्याचें काम जनपवाद सोसून, प्रकृति बिघडवून घेऊन केलें.परंतु आतां या सैतानी सरकारला मदत करणें म्हणजे महापातकाचे धनी होणें होय. सैतानाशीं सहकार कोणी केव्हांहि करिता कामा नये. **प्रत्यक्ष पाप करण्याऱ्या मनुष्याइतकाच पापाला साहाय्य करणारा मनुष्य दोषी ठरतो. आतां यापुढें सरकारशीं सहकार नाहीं.** असहकार हेंच माझें आतां ध्येयवाक्य. मी असहकार करणार येवढेंच नाहीं तर कॉंग्रेसमार्फत सबंध हिंदुस्थानला टाहो फोडून सांगणार "लोकहो ! इंग्रज सरकार यापुढें मा बाप सरकार राहिलेलें नाहीं तें सैतानी सरकार आहे. तुम्ही त्याला कोणत्याहि तऱ्हेनें मदत करावयाची नाहीं, तुम्ही मदत थांबविलीत, सरकारच्या राज्ययंत्राशी असहकार केलात, कीं हें सैतानी सरकार चार दिवसहि टिकणार नाहीं."

**असहकारितेचा कार्यक्रम**

गांधींचे विचार अशा तऱ्हेनें चालू होते. एखादा प्रश्न हातीं घेतला कीं रात्रंदिवस त्याच विचारावर ते आपलें चित्त केंद्रित करीत. याला ते ( Furious Thinking ) तीव्रतेनें विचार करणें म्हणत. असहकारितेची

नुसती कल्पना करून ते राहिले नाहींत तर ती कल्पना प्रत्यक्ष व्यवहारांत जनतेनें कशी आणावयाची याचाहि विचार त्यांनीं कित्येक दिवस चालविला होता. आज त्यांनीं दिलेला कार्यक्रम तुम्हा आम्हाला माहीत झाल्यामुळें त्यांतील नावीन्य नाहींसें झालेलें आहे. परंतु हे उपाय त्या वेळीं मोठमोठ्या पुढाऱ्यांना सुचत नव्हते. इतर पुढारी जेथें अडत तेथें गांधी मुसंडी मारून पुढें जात, म्हणूनच त्यांची छाप हिंदी महान् नेत्यांवर हां हां म्हणतां पडली. गांधी कार्यक्रम ठरवितांना अगदीं गरिबांतल्या गरिबाचाहि विचार करीत व म्हणत आपला कार्यक्रम असा असावा कीं त्यांत अशिक्षित, गरीब अशा खेडवळालाहि भाग घेतां यावा.

**असहकारांतील प्रमुख गोष्टी**

(१) हिंदुस्थानांत सरकारच्या मर्जीतील मोठमोठाले लोक सरकारी किताब, **रावसाहेब, रावबहादूर, सर** हे धारण करणारे असत. त्यांना गांधी सांगणार होते कीं, बाबांनो तुम्ही आपल्या या मानाच्या पदव्या सैतानी सरकारच्या परत करून टाका. आपला राजा प्रजापालक आहे असें समजून तुम्ही हे किताब स्वीकारलेत पण ह्या देणग्या सैतानाच्या आहेत हें तुम्हीं ओळखून त्यांचा आतां त्याग केला पाहिजे.

(२) सरकारी नोकरांनो, तुम्ही पोटाकरितां सरकारची नोकरी करतां हें सत्य असलें तरी आपलें सरकार प्रजापालक आहे अशी कल्पना तुमच्या मनांत खोल रुजली होती. पण आतां हें सरकार प्रजापालक नसून तें **राक्षसी** बनलें आहे. तेव्हां **प्रजाभक्षक सरकारची** नोकरी तुम्ही करून प्रजानाश करण्याचें पातक करितां कामा नये. तुम्हीं आतां ही सरकारी नोकरी सोडून दिली पाहिजे.

(३) प्रजेला त्यांनीं सांगितलें कीं, या सरकाराचे हातून तुमचे हित कदापि होणार नाहीं. या सैतानी सरकारकडे तुम्हीं न्याय मिळविण्याकरितां जातां कामा नये. न्यायाधीश म्हणून त्याची प्रतिष्ठा उतरवून नोकरशाहीच्या हस्तकाला सांगितलें पहिजे कीं, तूं सैतान असल्यामुळें

न्यायासनाच्या पवित्र गादीवर बसण्याचा तुला आतां अधिकार नाहीं. आपापसांतील तंटे यापुढें तुम्ही लोकांनीं पंचामार्फत तोडण्याची वेळ आली आहे.

लोकांची बाजू घेऊन न्यायासनापुढें ती उत्तम रीतीनें मांडणाऱ्या **वकिलांनो** आतां न्यायकोर्टांत जाण्याचें बंद करा तें न्यायालय नाहीं. तें सैतानाचें वसतिस्थान आहे. सैतानापुढें तुम्ही कायदेपंडित आपली मान वाकवून जगांत हंसें करून घेणार का ? सैतानाशीं असहकार हाच तुमचा आजचा धर्म आहे. कोर्टाला न गेल्यामुळें तुमचा वृत्तिच्छेद होईल पण त्याला उपाय नाहीं. दुसरा उद्योग करून तुम्हाला आपलें पोट भरतां येईल. तुम्ही सुशिक्षित आणि समाजाचे नेते आहांत. तुम्हींच न्यायानें चालण्याचा धडा जनतेला घालून दिला पाहिजे.

(४) कोर्टाच्या बहिष्काराप्रमाणें सरकारी, निमसरकारी शिक्षणसंस्थांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना त्यांनीं सांगितलें कीं, सैतानी सरकारचें शिक्षण हें विषासारखें प्राणघातक आहे. तुमची उन्नति यानें कधींहि होणार नाही. या शिक्षणाचा तुम्हीं त्याग केला पाहिजे. शिक्षकांनीं स्वतंत्र होऊन राष्ट्रनेत्यांच्या मदतीनें राष्ट्रीय शाळा काढाव्यात आणि त्यांत आमच्या विद्यार्थ्यांनीं जाऊन शिकावें.

(५) विद्यार्थ्यांना अशा तऱ्हेचा कार्यक्रम सांगितल्यावर गांधी देशांतील राजकारणी मुत्सद्याकडे वळले आणि त्यांनीं त्यांना असें सांगितलें कीं, मीं ज्याप्रमाणें वकिलांना आणि त्यांच्या पक्षकारांना कोर्टावर बहिष्कार घाला म्हणून सांगतों त्याप्रमाणें तुम्हालाहि मला असें आग्रहानें सांगावयाचें आहे कीं सरकार आतां जीं कायदेकौन्सिलें नव्या कायद्याप्रमाणें सुरू करणार आहे त्यांत तुम्ही ती **सैतानी सरकारची विधिमंडळें** आहेत असें समजून त्यांत जातां कामा नये. **प्रजेनेंहि** अशा कौन्सिलकरितां होणाऱ्या **निवडणुकींत भाग घेतां कामा नये** याचा अर्थ असा कीं, कोणीहि मतदान देण्यास निवडणुकीच्या वेळीं पोलिंग स्टेशनवर (मतदानाच्या जागीं) जाऊं नये आणि कोणीहि विधिमंडळांकरितां उमेदवार म्हणूनहि उभे राहूं नये.

शेवटचा एक कार्यक्रम होता तो म्हणजे सर्व शेतकऱ्यांनीं सरकारला शेतसारा न देणें हा होय. पण हा कार्यक्रम सुरू करण्यापूर्वी जेथें जो सुरू करावयाचा असेल त्या तालुक्यानें कॉंग्रेस वर्किंग कमिटीची अगोदर परवानगी घेतली पाहिजे, असा दंडक घातला गेला होता. लोकांनीं लष्करांत न शिरण्याचाहि कार्यक्रम गांधींजवळ होता पण त्यांनीं त्यावर सुरुवातीस भर दिला नाहीं.

### आगींत तेल

पंजाब प्रकरणामुळे गांधीच्या अंगाचा अगोदरच भडका झाला होता त्यांत खलिफतच्या प्रश्नाच्या तेलाची याच वेळीं भर पडली. पहिल्या महायुद्धांत तुर्कस्थाननें दोस्ताविरुद्ध जर्मनीला साहाय्य केलें. जर्मनीचा पराभव झाल्यावर त्याला साहाय्य करणाऱ्या राष्ट्रांची वाटणी दोस्तांमध्यें कशी करावयाची याची चर्चा तहपरिषदेंत चालू होती. त्यांत टर्कीचें साम्राज्य मोडून टाकण्यांत आलें आणि त्या साम्राज्याची मुख्य खलिफाची गादी नाहींशी करण्यांत आली. खलिफत म्हणजे मुसलमान धर्माचें राजकीय आणि धार्मिक सत्तेचें केन्द्र होतें. या गादीवर बसणारा राजा हा मुसलमान धर्माचा राजकीय आणि धार्मिक प्रमुख मानला जात होता. पहिल्या महायुद्धांत हिंदी, मुसलमान शिपायाची मदत सरकारनें जेव्हां मागितली त्या वेळेस त्याना ब्रिटिश सरकारनें असें आश्वासन दिलें होतें कीं, या युद्धाचा निकाल कांहींहि झाला तरी आम्ही खलिफतचें संरक्षण करूं. तें वचन युद्धानंतर साम्राज्य सरकारनें पाळलें नाहीं. हिंदुस्थान सरकारनें त्याबद्दल थोडीशी तक्रार केली. पण ब्रिटिश सरकारनें म्हटलें कीं, हा आंतरराष्ट्रीय राजकारणाचा प्रश्न होता-एकट्या ब्रिटिश साम्राज्य सरकारच्या हातांतील ही गोष्ट नव्हती. या उत्तरानें हिंदी मुसलमानांचें समाधान झालें नाहीं. आपलें राजकीय आणि धार्मिक सत्तास्थानच नाहींसें झालें याचें दुःख हिंदी मुसलमानांस अत्यंत झालें. आपण ब्रिटिशांना महायुद्धांत व्यर्थ मदत केली. आतां या सरकारविरुद्ध आपण कांहीं तरी केलें पाहिजे असे विचार त्यांचे डोक्यांत येऊं लागले.

या कालात मुसलमानांचें नेतृत्व भावनाप्रधान आणि कडवी धर्मनिष्ठा ज्यांची होती अशा अल्लीबंधूकडे आलें होतें. अल्लीबंधू यांचे अंगीं धिटाई, वक्तृत्व आणि विद्वत्ता उच्च दर्जाची होती. यांना परंपरागत अशी जहागिरी होती. हे अल्लीबंधू स्वतःला टिळकांचे अनुयायी म्हणवीत. टिळकांच्या प्रेताला यांनीं खांदाहि दिला होता. देशाभिमानामुळें ते हिंदु लोकांत लोकप्रिय झाले होते. या अल्लीबंधूनी गांधीची भेट घेऊन त्यांना आपलें दुःख निवेदन केलें. गांधींनी खिलाफत प्रश्नाचा सांगोपांग अभ्यास केला. आणि मग त्यांची खात्री झाली कीं, सरकारनें मुसलमानांचा विश्वासघात केला आहे आणि मुसलमानांचें गाऱ्हाणे सत्य आहे. मुसलमान हे आपले देशबंधु आहेत तेव्हां शेजारी–देशबाधव या नात्यानें आपण त्यांना साहाय्य करणें इष्ट आहे.

**निर्भेळ मदत**

मुस्लीम लीगची कॉन्फरन्स जी झाली त्या वेळीं गांधींना तेथें बोलावण्यांत आलें होतें. कांही हिंदु पुढारीहि तेथे हजर होते. त्यांनी असा प्रश्न मांडला की आमच्या गाईच्या रक्षणाची हमी मुसलमान जर घेतील आणि गोहत्या जर बंद करतील तर आम्ही त्यास खिलाफतच्या बाबतींत मदत करण्यास तयार आहोंत. मुसलमानांना ही अट मान्य होती आणि ते गोहत्याबंदीचा ठराव या सभेंत आणण्यास तयार होते पण गांधींनी असा ठराव आणण्याच्या विरुद्ध मत दिलें. ते म्हणाले, " आपल्याला जी मदत द्यावयाची ती शुद्ध बंधूभावानें शेजारधर्मानें प्रेरित होऊन द्यावयाची आहे. अटी घालून दिलेली मदत ही खरी मदत नव्हे. कारण पुढे काही तरी सबबी काढून मनुष्य अटी मोडू शकतो. गोरक्षणाचा प्रश्न हा स्वतंत्र प्रश्न आहे. त्याबद्दल आपल्याला स्वतंत्र चळवळ चांगली सुदृढ पायावर उभारता येईल. गोरक्षणांत हिंदूप्रमाणें मुसलमानांचेंहि हित आहे. मुसलमान बालकांना गाईच्या दुधाची आवश्यकता आहेच. शिवाय हजारों मुसलमान शेती करतात त्यांना बैलाची गरज नाहीं असें थोडेंच आहे? गोरक्षणाचा हा प्रश्न हिंदूपुरताच मर्यादित

नाहीं. त्याला धार्मिक महत्त्व जितकें आहे तितकेंच आर्थिकहि आहे म्हणून तो अखिल भारतीय प्रश्न होऊं शकतो. गोरक्षणाची चळवळ आपण ज्या वेळेला हातीं घेऊं त्या वेळीं हिंदूंप्रमाणें मुसलमानांचें साहाय्य आपण हक्कानें मागूं. " ही गांधींची विचारसरणी, त्या वेळच्या हिंदु पुढाऱ्यांना मान्य झाली नाहीं. ते म्हणत मुसलमान बरे अडचणींत सांपडले आहेत तेव्हां गोरक्षणाच्या अटीवरच त्यांना मदत करणें इष्ट होईल. पण गांधींपुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं आणि हिंदूंनीं मुसलमानांना खिलाफतच्या बाबतींत अट न घालतां मदत करण्याचें ठरविलें. यापुढें गांधींच्या दौऱ्यांत अल्लीबंधू सामील झाले. आणि हे तिघे पंजाब प्रकरण आणि खिलाफत या जोडविषयावर व्याख्यानें देत फिरत होते.

**कॉंग्रेसची अनुमति**

पंजाब प्रकरण आणि खिलाफतचा प्रश्न या दोन गोष्टी ब्रिटिश सरकारशीं असहकार करण्यास पुरेशा आहेत असें गांधींना कितीहि वाटत असलें तरी ही विचारसरणी अखिल भारतीय कॉंग्रेसनें स्वीकारल्याशिवाय त्याला तेज चढणार नव्हतें. म्हणून गांधीनी कॉंग्रेस नेत्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न केला.

**देवलोकींचीं माणसें**

कॉंग्रेसमधील जुने मुरब्बी आणि वजनदार पुढारी म्हटले म्हणजे **लोकमान्य टिळक** होत. ते १९२० च्या ऑगस्ट महिन्याच्या पहिल्या तारखेस दिवंगत झाले होते. त्यानंतरचे **टिळकांच्या बरोबरीचे** पुढारी म्हटले म्हणजे **लाला लजपतराय** हे होत. पंजाबप्रकरण लजपतराय यांचे जिव्हारीं लागलें होतें. असहकाराची कल्पना त्यांच्याहि डोक्यांत होती पण तिचें स्वरूप गांधींच्या कल्पनेइतकें जाज्वल्य नव्हतें. ते म्हणत मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न यांत गोवूं नये. अशा रीतीनें लजपतरायांची कांहींशी सहानुभूति व अल्पसा विरोध गांधींना लालाजीचे ठिकाणीं दिसून आला. यानंतर संयुक्त-प्रांतांतील मोठे मानी रुबाबदार श्रीमंत आणि वजनदार पुढारी म्हटले म्हणजे **मोतीलाल नेहरू** हे होत. मोतीलालजींचा आणि गांधींचा अलीकडे अलीकडे

बराच निकट व घरगुती संबंध आला होता. पंजाब चौकशी कमिटीमध्यें दोघां-नींहि एकत्र काम केलें होतें. त्या वेळीं गांधींचा निरलस, श्रमसहिष्णु, कळ-कळीचा स्वभाव त्यांचे दृष्टोत्पत्तीस आला होता. नम्रतेबरोबरच त्यांचा स्पष्ट-वक्तेपणा, धैर्य आणि धाडसहि मोतीलालजींनीं पाहिलें होतें.गांधी आपल्या मधुर शिष्टाचारानें मोतीलालजींना मोहित करून टाकीत. यामुळें गांधींची धाडशी विचारसरणी मोतीलालजींसारख्या शूर पुरुषास मान्य होण्यास वेळ लागला नाहीं. ही मान्यता देणें कांहीं सोपी गोष्ट नव्हती. मोतीलालजीनीं असहकार करावयाचा म्हटला म्हणजे मासिक ३०–४० हजार रुपयांच्या मिळकतीवर पाणी सोडण्यासारखें होणार होतें. मोतीलालजींचा स्वभाव पहिल्यापासून मोठा चैनी आणि खर्चिक होता. त्यामुळें त्यांचेजवळ मोठीशी शिल्लकहि नव्हती. अशा स्थितींत बादशाही थाटानें आणि मिजाशीनें घालविलेल्या आयुष्याला फकिरी वृत्तीची दीक्षा घेण्यास तयार होणें ही कांहीं लहानसहान गोष्ट नव्हती. पण राष्ट्राच्या मानाचा प्रश्न स्वतःच्या चैनीपेक्षां मोतीलालजींना अधिक महत्त्वाचा वाटला आणि त्यानीं गांधींना पाठिंबा देण्याचें मान्य केलें. मोतीलालजींसारखे वजनदार, ऐपतदार लोक गांधीजींच्या मागें येऊं लागल्यामुळें गांधीचा उत्साह प्रतिक्षणी गंगेप्रमाणें वाढत चालला. अलाहाबादेहून गांधी कलकत्त्याला गेले तेथें त्याची अशाच एका थोर विभू-तीशीं गांठ पडली. ती विभूति म्हणजे **देशबंधू दास** ही होय. त्यागाबद्दल देशबंधू जगांत कोणालाहि हार जाणार नव्हते आणि देशाच्या अभि-मानाचा प्रश्न आला कीं देशबंधू नुसते बेफाम होऊन जात. देशाभि-मानाशिवाय देशबंधूंच्या अंगांत दुसरें कोणतेंहि द्रव्य नव्हतें असें म्हटलें असतां मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. देशबंधूंची आणि गांधींची गांठ पडल्यावर असहकारितेच्या कार्यक्रमावर बरीच चर्चा झाली. एकशिवाय करून बाकीच्या इतर मुद्यांवर दोघांचें एकमत होण्यास मुळींच वेळ लागला नाहीं. नेहरूंइतकेच देशबंधूहि आपल्या मासिक प्रचंड उत्पन्नावर देशाच्या अभिमानास्तव तिलांजलि देण्यास तयार होते. आपल्या राष्ट्राचें केवढें भाग्य

कीं अशा विभूति आपल्या देशाच्या वाट्यास आल्या. अशीं उदार माणसें कोणत्याहि राष्ट्रांत क्वचितच उत्पन्न होतात. पुराणांत आपण असें वाचतों कीं, परमेश्वराचा अवतार ज्या वेळीं भूलोकावर होतो त्या वेळीं मोठमोठे देवहि त्यांचे साहाय्य करावयास भूलोकांत जन्म घेतात. लजपतराय, नेहरू, दास अशांसारखीं माणसें ही पूर्वजन्मीचीं माणसें नसून कोणीतरी मोठ्या शक्तीच्या देवांचे अवतार असले पाहिजेत, असें भाविक मनाला वाटल्यास त्यांत वावगें असें कांही नाहीं. इतर कार्यक्रमास मान्यता दिल्यावर देशबंधू दास म्हणाले. "तुमचा कौन्सिल बहिष्काराचा ठराव तेवढा मला मान्य नाहीं. आपण कौन्सिलच्या निवडणुका जिंकू, लोकांचे प्रतिनिधी म्हणून कौन्सिलांत जाऊं, कौन्सिलांतून प्रत्येक वेळी उठून येऊ आणि सरकारला शरमावयाला लावू."

## बिनतोड विचारसरणी

यावर गांधींचें म्हणणें असें की, "तुमच्या म्हणण्यांतील तथ्यांश मला पटतो, परंतु तुम्ही असें पाहा की कौन्सिल हॉलमध्यें तुम्ही काय करतां हें खेडयांतील लोकांना समजू शकत नाहीं पण कौन्सिलच्या निवडणुकीवर जर तुम्हीं बहिष्कार घातला तर तुम्हाला खेडयापर्यंत जाऊन तेथील लहानमोठ्या मतदारांना सांगावें लागेल की, **ब्रिटिश सरकार जनहितकारी राहिलेलें नाहीं तें सैतानी बनलेलें आहे**. अशा सैतानाच्या कौन्सिलमध्यें आपले प्रतिनिधी कसें बरे पाठवितां येतील ? वगैरे विचार सांगतांना तुम्हाला पंजाबचे अत्याचार कथन करावे लागतील आणि मग जनतेला सरकारच्या सैतानी स्वरूपाची चांगली कल्पना येईल. सरकार-वरच्या परिणामाबद्दल म्हणाल तर कौन्सिलांतील विरोधापेक्षां खेडयांतील लोकांनीं केलेला असहकार हा शेवटीं सरकाला अधिक जाचेल—वगैरे. देशबंधूंना गांधींच्या सान्निध्यांत असतांना त्याचें बोलणें क्षणभर पटे परंतु बंगालमधील अनुयायांचाहि विचार त्यांना करावा लागत होता. म्हणून गांधींना त्यांनीं आपली संमति दिली नाहीं. पुढें सप्टेंबरमध्यें कलकत्त्याला स्पेशल कॉंग्रेस

झाली. या काँग्रेसपुढें गांधींचा असहकारितेचा ठराव हा एकच विषय होता. या ठिकाणीं गांधींना विरोध करणाऱ्या सर्व शक्ती एकत्रित झाल्या होत्या. गांधींचे अनुयायीदेखील मोठ्या संख्येनें उपस्थित होते. त्या स्पेशल काँग्रेसमध्यें वादविवादाची घनचक्कर लढाई झाली. गांधींच्या विरुद्ध जी मंडळी उभी राहिली ती सामान्यापैकीं नव्हती. एकेकाच्या पाठीमागें बाराबारा वर्षांची सेवा होती. वक्तृत्वांत ही मंडळी कोणाला हार जाणारी नव्हती. विद्वत्ता यांच्या घरीं पाणी भरीत होती. अशा वीरांशीं गांधींची आज गाठ पडली होती. गांधींना सर्वतोपरी विरोध जर कुणी केला असेल तर तो **ॲनीबिझांटबाईनीं.**

**ॲनीबिझांट यांचा कडवा विरोध**

ॲनीबिझांट यांनीं हिंदु धर्माची फार मोठी सेवा केली होती. बनारस हिंदू कॉलेज आणि युनिव्हर्सिटी स्थापन करण्यांत त्यांनीं आपली सर्व पुण्याई खर्च केली होती. युरोपिअन असून त्या स्वतःला हिंदु म्हणवीत होत्या. हिंदु धर्माचें स्वरूप समजावून देण्यासाठीं त्यांनीं सोप्या व सुमधुर इंग्रजींत अनेक पुस्तकें लिहिलेलीं आहेत. आमच्या विद्यार्थ्यांनीं त्यांचा जरूर अभ्यास करावा. या बिझांटबाई पुढें हिंदी राजकारणांत पडल्या. बाईंच्या अंगीं अलौकिक वक्तृत्व आणि सफाईदार व तेजस्वी असें लेखन-कौशल्य होतें. प्रचाराच्या बाबत त्यांची बरोबरी जगांत फारच थोडे लोक करूं शकत असत. महात्मा गांधी अणि लोकमान्य टिळक मात्र प्रचाराच्या बाबतींत तिला हार गेले नाहींत. या बाईंनीं इंडियन होमरूल लीग या नांवाची एक संस्था काढून तिचा प्रचार हिंदुस्थानांत धडाक्यानें सुरू केला. तो इतका कीं, सरकारला शेवटीं त्यांस कांहीं दिवस स्थानबद्ध करणें भाग पडलें. टिळकांच्या लोकमान्य या पदवीला त्यांनीं आपल्या इंग्रजी पत्रांत स्थान देऊन हिंदुस्थानभर त्या पदवीचा प्रचार केला. इत्यादि लोकसेवेमुळें बेझंटचें नांव हिंदुस्थानांत लोकप्रिय झालेलें होतें. पण बाईंना हिंदी राष्ट्राचा जेवढा अभिमान होता तेवढाच ब्रिटिश साम्राज्याचाहि होता. यामुळें गांधींनीं इंग्रजी राज्याला सैतानी सरकार म्हटल्याबरोबर बाईंना इंगळी चावल्यासारख्या वेदना झाल्या.

त्या नुसत्या गांधींवर दांतओठ खाऊं लागल्या आणि त्यांनीं स्पेशल कॉंग्रेसच्या विषयनियामक कमिटींत आपल्या वक्तृत्वाची शर्थ करून गांधींना विरोध केला. पण हा विरोध कॉंग्रेस नेत्यांना विशेष पसंत पडला नाहीं. पंजाबचे अत्याचाराची स्मृति त्यांच्या डोळ्यासमोरून नाहींशी झालेली नव्हती. असो. गांधींना दुसरा मोठा विरोध म्हणजे **बिपिनचंद्र पाल** यांचा होय. अलीकडील पिढीला पालबाबूंची विशेषशी माहिती नाहीं. पण १९०५ ते १९०८ सालीं पालबाबूंनीं सबंध बंगाल आपल्या जाज्वल्य वाणीनें हालवून सोडला होता. बंगालनंतर मद्रास इलाख्यांत त्यांनीं तुफानी दौरा काढून तेथें असंतोषाचा वणवा पेटवून दिला होता. एका बंगालचे दोन बंगाल सरकारनें केल्यामुळें जे बंगाली पुढारी खवळले होते त्यांत **पाल** हे अग्रेसर होते. पालबाबू प्लॅट-फॉर्मवर येऊन एकदां उभे राहिले आणि आपल्या प्रत्येक क्षणाला चढणाऱ्या धीरगंभीर आणि कांहीं क्षणाला तीव्र होणाऱ्या आवाजांत बोलूं लागले म्हणजे सभा नुसती स्तंभित होऊन जाई. त्यांची इंग्रजी भाषा विशेष कमा-विलेली होती. वक्तृत्वाचे नाना ढंग त्यांच्या भाषणांत आढळून येत. पाल-बाबूंच्या मुलुखमैदानी तोफेपुढें त्यांना विरोध करणाऱ्या लोकांच्या विचारां-तील मुद्यांच्या नुसत्या ठिकऱ्या उडत. १९०५ ते १९०८ या कालांत पाल-बाबूंना कोणीहि वक्ता विरोध करावयास धजत नसे. लोकमान्य टिळकांची लोकप्रियता महाराष्ट्रांत ज्या स्वरूपाची होती त्याच स्वरूपाची बिपिन-बाबूंची बंगाल्यांत होती. टिळक आणि बिपिनपाल हे या कालांत एकमतानें वागत असत. पण १९०८ सालीं लोकमान्य टिळक मंडाल्याला कारावास भोगावयास गेले आणि नंतर सरकारनें जी दडपशाही सुरू केली त्यांत बिपिनबाबूंचा टिकाव लागला नाहीं. कांहीं दिवसांनीं त्यांच्यावर खटला भरण्याची सरकारनें जेव्हां वेळ आणली त्या वेळीं डुरकळ्या फोडणारा हा बंगाली वाघ बिल्लीपेक्षांहि अगदीं नम्र झाला. नव्हे केविलवाणी मुद्रा करून सरकारची दया भाकूं लागला. हें दृश्य या वेळीं कोणा-लाहि पाहवलें नाहीं. बिपिनबाबूंनीं अशा रीतीनें राजकीय वातावरणांत

आपण होऊनच किंमत कमी करून घेतली. यापुढें ते सरकारच्या बाजूनें लिहूं लागले. लोकमान्य टिळक तुरुंगांतून परत आल्यावर देशांत राजकीय चैतन्य खेळूं लागलें त्या वेळीं पुन्हां बिपिनबाबूंनीं डोकें वर काढलें. बिपिनबाबूंचे पूर्वींचे अनुयायी जे आतां मवाळ बनले होते ते सर्व एकत्र झाले. त्यांनीं देशबंधूंच्या पाठीमागें उभें राहण्याचें ठरविलें. बिपिनबाबूंचा पाठिंबा आपणास हवा म्हणूनच देशबंधू गांधींना विरोध करीत होते. या स्पेशल कॉंग्रेसच्या विषयनियामक कमिटींत बिपिनबाबूंनीं जी उपसूचना आणली तिचा आशय असा : (१) पंजाबच्या अत्याचाराची हकीकत ब्रिटिश सरकारपुढें निवेदन करण्याकरितां एक **शिष्टमंडळ पाठवावें**. (२) शाळाकॉलेजांवर बहिष्कार न घालतां **लवादकोर्टें** स्थापन करावींत. आणि कौन्सिलवरती कोणत्याहि तऱ्हेचे बहिष्कार घालू नये. ह्या उपसूचनेचा असा स्पष्ट अर्थ होतो कीं, **सरकारशीं असहकाराची वृत्ति न ठेवतां** कांहीं विधायक कार्यक्रम तेवढा कॉंग्रेसनें स्वीकारावा. असा ठराव बिपिनबाबूंनीं आणावा आणि तोसुद्धां कलकत्त्यांत हें एक आश्चर्यच नव्हे तर काळानें घेतलेला एक सूड होता. तो कसा हें आपण थोडक्यांत पाहूं.

**थोडें मागें**

१९०६ सालच्या कॉंग्रेसमध्यें वंगभंगावरून लोक सरकारवर चिडले होते. सरकारला वठणीवर आणण्याकरितां **ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याचा** ठराव कॉंग्रेसपुढें त्या वेळेला होता. दुसरा ठराव स्वदेशीचा होता. पहिल्या ठरावाबद्दल फिरोजशहा मेहता, वाच्छा, गोखले वगैरे नेमस्त पुढारी म्हणत असत " ब्रिटिश मालावर बहिष्कार घालून तुम्ही इंग्रजांना चिडवू नका." स्वदेशीला उत्तेजन देण्याकरितां आम्ही स्वदेशी वस्तु वापरावी असा ठराव पास करतों. या वेळीं **पालबाबू** मोठ्या आवेशानें नेमस्तांवर तुटून पडून म्हणत होते " **नुसत्या स्वदेशीच्या ठरावानें इंग्रजांना आंच लागणार नाहीं.** त्यांच्यावर बहिष्कारच घातला पाहिजे." दुसरी गोष्ट स्वदेशीबद्दल नेमस्त साधा स्वदेशीचा ठराव पास करीत होते त्याला जहाल बिपिनबाबू

विरोध करून म्हणत " स्वदेशी मालाची साधी शिफारस करून भागणार नाहीं. झीज सोसून स्वदेशी माल घ्या अशी शिफारस कॉंग्रेसनें केली पाहिजे." आज गांधी तरी दुसरें काय म्हणत होते? ब्रिटिश सरकारशीं असहकार ही गोष्ट ब्रिटिशमालावरील बहिष्काराइतकीच सरकारला जाचणारी गोष्ट नव्हती का? शिष्टमंडळ पाठविण्याच्या कल्पनेचा फोलपणा बिपिनबाबूंनीं एके वेळीं उघड केला होता. आणि झीज सोसण्यासंबंधानें म्हणाल तर असहकारितेंत वकिलांना झीज सोसावी लागणार होती यांत संशय नव्हता. थोडक्यांत म्हणजे १९०६ सालचाच पण थोडा अधिक व्यापक बनलेला कार्यक्रम गांधींनीं आज कॉंग्रेसपुढें ठेवला होता आणि ह्या कार्यक्रमाचा उच्च स्वरानें टेबलावर बुक्क्या हापटून पुरस्कार करणारे बिपिनबाबू आज नेमस्तांचा कार्यक्रम पुढें करावयास तयार झाले होते. पण त्यांची उपसूचना लोकांनीं मानली नाहीं. शेवटी देशबंधू दास पुढें झाले. दासांचें भाषण अर्थात् उच्च भूमिकेवरून त्यागाची कास न सोडतां झालें यांत संशय नाहीं पण त्यांची कौन्सिलांत शिरण्याची सूचना मान्य करण्यांत आली नाहीं आणि गांधींचा ठराव प्रथम विषयनियामक कमिटी आणि नंतर उघड्या अधिवेशनांत प्रचंड मतानें जेव्हां पास झाला त्या वेळीं महात्मा गांधींच्या जयजयकारानें दशदिशा दणाणून गेल्या. गांधींच्या ठरावाला मोतीलाल नेहरूंनीं पाठिंबा दिला. अल्लीबंधू तर गांधींच्या मागोमाग होतेच.

### नागपूर कॉंग्रेस

१९२०च्या डिसेंबर महिन्यांत नागपूरला कॉंग्रेसचें मुख्य अधिवेशन भरलें. या अधिवेशनांत पुन्हां बडा सामना झाला. बॅ. जिनांनीं गांधींना शेवटचा विरोध करून पाहिला. ते बोलूनचालून नेमस्त विचारसरणीचे गृहस्थ होते. त्यांना असहकारितेंतील कोणताच कार्यक्रम पसंत नव्हता. देशबंधू दासांनीं बराच विरोध केला पण लोकमत गांधींच्या बाजूचें होतें. तेव्हां शेवटीं देशबंधूंनीं गांधींच्या ठरावाला उदार मनानें आणि देशभक्तीनें प्रेरित होऊन अनुमति दिली. या अनुमतीचा अर्थ काय होता याची कल्पना वाच-

कांना आतां आली असेल. ठरावाला अनुमति म्हणजे मासिक ३०–४० हजार रुपयांवर पाणी सोडणें होय. भर अधिवेशनांत एकानें टोचून देशबंधूंना विचारलें कीं, " तुम्ही ठरावाला अनुमति देतां पण तुमच्या प्रचंड प्रॅक्टिसचें काय ?" देशबंधूंनीं तत्क्षणींच उत्तर दिलें " प्रॅक्टिसचें काय घेऊन बसतां ? ती सोडून देण्याचा संकल्पच करून मी आज या ठरावाला अनुमति देत आहें. " झालें. टाळ्यांच्या कडकडाटानें सारा मंडप दणाणून गेला. दास, नेहरूंच्या प्रचंड त्यागाचे परिणाम सर्व देशभर विलक्षण झाले. तरुणांना कोणताहि त्याग करण्याला कांहीं वाटेनासें झालें. शेवटच्या डिग्री परीक्षा अगदीं जवळ आल्या असतां पुष्कळ हुषार विद्यार्थ्यांनीं शाळाकॉलेजांवर बहिष्कार घातला. कांहींनीं वकिल्या सोडून कायमची फकिरी स्वीकारली. असो.

## असहकारितचा व्यापक आणि विविध प्रचार

नागपूर काँग्रेसनंतर गांधी आणि त्यांचे अनुयायी यांनीं क्षणाचीहि विश्रांति घेतली नाहीं. प्रचाराला आरंभ मुंबईंत झाला. मुंबईंत गांधींना विरोध असा जवळजवळ नव्हताच. मुंबईंत येऊन जाऊन नेमस्तांचें प्रस्थ. पण नेमस्तांचे पुढारी फिरोजशहा मेहता, नामदार गोखले हे दिवंगत झाले होते. वाच्छा हे गलितगात्र होऊन राजकारणांतून जवळजवळ निवृत्त झाले होते. राहिलेल्या सामान्य नेमस्त राजकारणी मंडळींत असहकारितेच्या प्रचंड लोंढयाला प्रतिकार करण्याचें सामर्थ्य नव्हतें. जिनांनीं यानंतर बराच काल मौन धारण केलें यामुळें मुंबई ही सर्वस्वीं गांधींचीच होती. मौलाना महमदअल्ली शौकतअल्लींनीं मुसलमान मोहल्यांतून जोरानें प्रचार सुरू केला आणि गिरगांवांत महाराष्ट्रीय मंडळी पुढें सरसावली. मुंबईंत गंगाधरराव देशपांड्यांनीं ठाणें देऊन शाळाकॉलेजांवरील बहिष्काराची मोहिम जोरानें सुरू केली. गांधींना वेळ सांपडेल तेव्हां ते बोलतच असत. सभा, मिरवणुका यांना ऊत आला होता. विद्यार्थी भराभर शाळा कॉलेजांतून बाहेर पडत होते. त्या विद्यार्थ्यांनीं करावयाचें काय हा नेत्यांपुढें प्रश्नच होता. मेडिकल कॉलेजच्या विद्यार्थ्यांकरितां

डॉ. **भडकमकर**, डॉ. **देशमूख** अशांसारख्या मुंबईतील नामांकित डॉक्टरांनीं नॅशनल मेडिकल कॉलेज काढलें. हायस्कूलच्या विद्यार्थ्यांकरितां राष्ट्रीय शाळा निघाल्या. अनेक प्रौढ विद्यार्थ्यांना राष्ट्रसेवेचें शिक्षण देण्यासाठीं मुंबईजवळ **अंधेरीला बॅ. देशपांडे** या नांवाच्या जुन्या त्यागी राष्ट्रसेवकानें एक **साधकाश्रम** या नांवाची फार मोठी संस्था **सत्याग्रहाश्रमाच्या** धर्तीवर काढली. तेथें मुंबईतील हुषार नवतरुण एकत्रित झाले होते.

पुण्यामधील शंकरराव देवांनीं पुढारीपण स्वीकारून असहकारितेचा कार्यक्रम जारी केला. कांहीं वकिलांनी वकिल्या सोडल्या. प्रो. **घारपुरे** आणि सुप्रसिद्ध साहित्यिक प्रो. **ना. सी. फडके** यांनीं व्याख्यानाचा नुसता पाऊस पाडून शाळाकॉलेजांतील विद्यार्थी बाहेर काढले. प्रौढ विद्यार्थ्यांकरितां **टिळक महाविद्यालय** ही संस्था निघाली. हायस्कूलच्या विद्यार्थ्यांसाठीं **टिळक पाठशाळा** काढण्यांत आली. जी गोष्ट पुण्यांत तीच स्थिति महाराष्ट्रांतील प्रत्येक जिल्ह्याचे नव्हे तर तालुक्याच्या गांवीं घडून आली.

प्रत्येक तालुक्याच्या गांवीं निदान हायस्कुलें असतील तेथें राष्ट्रीय शाळा निघाल्या. या शाळा चालवावयास कॉलेजमधील विद्वान् आणि होतकरू तरुण पुढें आले. त्यांच्यापैकीं पुष्कळांनीं पुढें जन्माची फकिरी स्वीकारली.

**परदेशी कापडाच्या होळ्य।**

शाळा कॉलेजप्रमाणेंच केवळ परदेशी कापडावर बहिष्कार घालण्याची नव्हे तर परदेशी कापडाच्या होळया करण्याची चळवळ मोठ्या प्रमाणांत सुरू झाली. मुंबईंत श्रीमंत स्त्रियांनीं आपलीं बहुमोल दुकूल वस्त्रें या होळींत टाकण्यास दिलीं होतीं. बॅ. जयकरांच्या येथील १००० रुपये किंमतीचें वस्त्र होळींत पडलें होतें असें म्हणतात. त्यागवृत्तीला त्या काळांत नुसता पूर आला होता. परदेशी कापडाच्या होळया इकडे होत असतां लोक खादीचीं वस्त्रें वापरूं लागले. गांधी टोपी याच वेळीं प्रचारांत आली होती, लाख लाख लोकांच्या सभा जेव्हां भरत तेव्हां या पांढऱ्या टोप्यांचा समुद्र

सगळीकडे पसरलेला दिसतो असें परदेशी पत्रपंडित या देखाव्याचें वर्णन करीत (Sea of white caps).

**त्यागी लक्ष्मीपुत्र**

विद्यार्थ्यांप्रमाणें ठिकठिकाणच्या वकिलांनीं वकिल्या सोडून ते चळवळींत पडले होते, त्यांच्या योगक्षेमाची व्यवस्था करण्यासाठीं वर्ध्याचे शेठ **जमनलाल बजाज** हे श्रीमंत व्यापारी पुढें आले होते. ते स्वतःला गांधींचे पुत्र म्हणवीत. गांधींकरितां वाटेल तो त्याग करावयास त्यांना जन्मभर कांहींच वाटलें नाहीं. मुंबईत **बँकर** आणि वर्ध्यांत **जमनलाल** यांनीं गांधींना लागेल तेवढा पैसा पुरविला. पण सर्व देशव्यापी चळवळ चालवावयाची म्हणजे त्यासाठीं सार्वजनिक फंडहि हवा होता आणि त्याची तजवीज करण्यांत गांधी गुंतले होते.

**टिळक स्वराज्य फंड**

लोकमान्य टिळक दिवंगत झाल्यावर त्यांचें स्मारक करण्याची चळवळ हिंदुस्थानांत सर्वत्र सुरू झाली होती. या स्मारकाचें स्वरूप काय असावें याबद्दल चर्चा चालू असतां **असहकारितेचें** प्रचंड आंदोलन राष्ट्रांत सुरू होतें. गांधींनीं जो फंड सुरू करावयाचें मनांत आणलें होतें त्याला **स्वराज्य फंड** हें नांव पुढें ते देणार होते. टिळकांचें स्मारकहि त्यांतच होऊन जावें आणि द्रव्याची शक्ति विभागून जाऊं नये म्हणून त्यांनीं आपल्या फंडाला **टिळक स्वराज्य फंड** हें नांव देऊन एक कोटीचा फंड तीन महिन्यांत जमविण्याचा संकल्प जाहीर केला. ते व्याख्यानांतून सांगत कीं, स्वराज्याच्या इतकें टिळकांचें भव्य स्मारक आपण तें कोणतें करूं शकणार? या फंडांतून अनेक राष्ट्रीय चळवळींना आपल्याला मदत करतां येईल. एक कोटीच्या फंडाचा संकल्प जाहीर होतांच राष्ट्राला क्षणभर आश्चर्याचा धक्काच बसला. हिंदुस्थानांत या वेळेपावेतों दोन तीन लाखपर्यंत फंड जमा होऊं शकत होता. पण एक कोटी म्हणजे केवढी मोठी प्रचंड रक्कम झाली! एवढ्या मोठ्या फंडाची कल्पना करणें म्हणजेच प्रचंड धाडस होय. मग तो

मिळविणें दूरच राहिलें. पण कल्पना करण्याइतकीच ही कल्पना सत्यसृष्टींत उतरविण्याचा धमक गांधींत होती. राष्ट्राची त्यागशक्ति त्यांनीं बरोबर ओळखली होती. झाले, दोन तीन महिने हा टिळक स्वराज्य फंड जमविण्याचें वेडच राष्ट्राला लागलें होतें. आपल्या मासिक उत्पन्नाचा दशांश भाग गांधींनीं देशांतील नागरिकांजवळ या फंडासाठीं मागितला होता. **गांधी बोले आणि राष्ट्र हाले** अशी त्या वेळीं परिस्थिति होती. ठिकठिकाणांहून लहान मोठ्या रकमा मुंबईंत येऊन गोळा होऊं लागल्या. मनिऑर्डरवर नुसती सही करून देण्यास दोन, दोन चार चार कारकून अपुरे पडूं लागले. पांच, शंभर, हजार, लाख अशा रकमांनीं फंडाची भरती होऊं लागली. अडीच महिन्यांत अर्धी अधिक रक्कम जमा झाली. मग गांधींनीं मुंबईंत येऊन ठाणें दिलें. मोठमोठ्या व्यापाऱ्यांना बोलावून आणून त्यांना लाखाचे आकडे घालावयास लावले. गांधींचा शब्द प्रमाण मानून आठ दिवसांत व्यापाऱ्यांनीं ३८ लाख फंड दिला. मुंबईच्या खालोखाल २५ लाखांचा फंड देशबंधू दासांनीं बंगाल्यांत जमविला आणि मग ठरविल्या दिवशीं जवळजवळ ९९ लाख रुपये मुंबई कॉंग्रेस कचेरींत येऊन पडल्यावर गांधींनीं जाहीर केलें कीं, (As good as collected) संकल्पित फंड जमा झाला असें समजण्यास हरकत नाहीं. कांहीं रकमा वाट चालत होत्या आणि शेवटीं टिळक स्वराज्य हा एक कोटीचाच केवळ नव्हे तर जवळजवळ सव्वा कोटी जमा झाला.

### फंडाचा विनियोग

या प्रचंड फंडाची योजना प्रसिद्ध झाली त्या वेळीं गांधींनी जाहीर केलें होतें कीं, फंडापैकीं तीनचतुर्थांश रक्कम स्थानिक कार्याकरितां राखून ठेवण्यांत येईल. मोठा आकडा मुंबईंत जमा झाला होता. ठिकठिकाणीं जमा झालेल्या रकमेंतून तीनचतुर्थांश रक्कम स्थानिक चळवळीकरितां खर्च झाली. मुंबईंत मात्र गरजेपेक्षां जास्त रक्कम शिल्लक होती. तिचा एक ट्रस्ट करून गांधींनीं खादीच्या कार्याकडे या ट्रस्टचा विनियोग केला. आज अखिल भारतीय चरखा संघाचें काम याच ट्रस्टमधून चालत

आहे. इतर रकमेंतून राष्ट्रीय शाळा कांहीं दिवस चालूं शकल्या. कॉंग्रेसच्या प्रचारकांना यांतूनच पगार दिला गेला. प्रथम प्रामाणित खादी भांडारें निघालेलीं नव्हतीं म्हणून खादीचीं दुकानें, खादी तयार करण्याकरितां चरखे आणि माग या करितां बरीच रक्कम खर्च झाली. कांहींची कल्पना अशी होती कीं, हा एक कोटी फंड व्याजी लावावा आणि त्या व्याजांतून कॉंग्रेसचे नित्याचे काम चालवावें. गांधींचा त्यास विरोध होता. मागे एका ठिकाणी सांगितल्याप्रमाणें गांधींची विचारसरणी अशी होती की, कायमचे फंडानें जनतेशी आपला संबंध तुटतो. मिळविलेला फंड चळवळीत खर्च करून टाकला म्हणजे जें तेज निर्माण होतें; त्यांतून नवी कामे आणि नवे फड उत्पन्न होऊं शकतात. म्हणून टिळक स्वराज्य फंड हा कामे काढून त्यांतच खर्च करण्यावर गांधींनी भर दिला आणि तो थोड्याच वर्षांत खर्च करून टाकला. या फंडाचा हिशेब ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीने अनेक वेळां प्रसिद्ध केला आहे. हा हिशेब त्या काळच्या वार्षिक अहवालांत आपणाला अजूनहि पाहावयसा मिळूं शकतो.

## युवराजांचें आगमन

हिंदी लोक राजाला पूज्य मानतात. त्यानी कितीहि बंडखोरी केली तरी राजा वा राजपुत्र त्यांच्या समोर येऊन उभा राहिला म्हणजे त्यांच्या राजनिष्ठेला बहर येऊन हिंदी लोकांची बंडखोरी थांबेल असा सल्ला व्हाइसरॉय **लॉर्ड रीडिंग** यांना कोणीं तरी दिला. त्याप्रमाणे लॉर्ड रीडिंग यांनी विलायतसरकारशीं पत्रव्यवहार करून इंग्लंडच्या युवराजाला हिंदुस्थानांत आणविण्याचा बेत केला. इंग्लंडचा राजा व हिंदुस्थानचा सम्राट् म्हणून खरें पाहिलें असतां राजानेंच येथें यावयास हवे; परंतु व्हिक्टोरिया राणी वृद्धपणामुळें येऊं शकत नव्हती म्हणून तिनें आपला युवराज **प्रिन्स एडवर्ड** यांना हिंदुस्थानांत प्रथम पाठविलें होतें. एडवर्ड बादशाहा झाल्यावर त्यानें १९०५ सालीं आपल्या युवराज जॉर्जला हिंदुस्थानांत पाठवून परंपरा कायम राखली. आतां त्या परंपरेला अनुसरून जॉर्जचा पुत्र **एडवर्ड** यानें हिंदुस्थानांत यावयाचें

ठरलेलेंच होतें. लॉर्ड रीडिंगनें पाहिलें कीं, या वेळेला युवराजाला हिंदुस्थानांत आणलें तर त्याच्या भाषणाचा परिणाम हिंदी लोकांना शांत करण्यास कारणीभूत होईल. प्रिन्स ऑफ वेल्स म्हणजे इंग्लंडचा युवराज, यांच्या आगमनाची वाटाघाट चालू होती त्या वेळीं हिंदुस्थानांत नवीन कौन्सिलें सुरू व्हावयाचीं होतीं. या कौन्सिलच्या निवडणुकीवर लोकांनीं बहिष्कार घातलेला होता. कोणीहि नामवंत कॉंग्रेस पुढारी या निवडणुकीस उभा राहिला नव्हता. कांहीं नेमस्त, कांहीं सरकारचे बगलबच्चे, आणि कांहीं स्पर्धासाधू स्वार्थांध लोक, हे निवडणुकीस उभे राहिले व निवडून आले. अशा लोकांनीं भरलेलीं कौन्सिलें आतां सुरू व्हावयाचीं होतीं. नवा मनु आपण सुरू करणार म्हणून सरकारनें हीं कौन्सिलें उघडण्यासाठीं बादशाहाचे बंधु ड्यूक ऑफ क्यॅनॉट यांना हिंदुस्थानांत पाठविलें पण त्यांच्या आगमनावर हिंदी लोकांनीं कडक बहिष्कार घातला. शेवटीं ड्यूकसाहेबांनीं खिन्न वातावरणांत मध्यवर्ती कायदे कौन्सिल उघडलें आणि शेवटीं भाषण करितांना ते म्हणाले "मला सर्व हिंदुस्थानावर उदासीनतेची छाया पसरलेली दिसते. **मागें काय झालें असेल तें त्यांनीं उदार मनानें विसरून जावें** आणि हे जे नवे अधिकार सरकार देत आहे त्यांचा उपयोग करून आपली शक्ति वाढवीत जाऊन स्वराज्य संपादन करावें. या भाषणाचा हिंदी लोकांवर चांगला परिणाम झाला पण नोकरशाहीनें दुसरीकडे दडपशाही चालवून ड्यूकसाहेबांच्या भाषणाचा परिणाम नाहीसा केला.

**दडपशाही**

महात्मा गांधींची असहकाराची चळवळ जोरानें चालू असतांना ठिकठिकाणीं मोठमोठाल्या मिरवणुका, हरताळ, परदेशी कापडाच्या होळ्या वगैरे गोष्टी चालू होत्या. त्या बंद पाडण्यासाठीं सरकारनें सर्व प्रांतांतून दडपशाहीच्या सत्रास आरंभ केला. प्रत्येक प्रांतांत दडपशाहीचें स्वरूप जवळजवळ सारखेंच होतें. कोठें सभा झाली कीं बेकायदा जमाव म्हणून मॅजिस्ट्रेटनें प्रसिद्ध करण्याच्या अगोदर पोलिस समारंभावर हल्ले करीत. अधिकाऱ्यांच्या

हुकमाशिवाय बेगुमानपणें लाठीहल्ला चढवीत. लाठीहल्ल्याप्रमाणें पुष्कळ ठिकाणीं खुशाल गोळीबार करीत. गोळीबारानें मेलेल्या लोकांच्या प्रेतांची व्यवस्था न करितां तीं प्रेतें तशींच टाकून देत. कांहीं ठिकाणीं लहान लहान मुलांना गोळ्या घालून ठार मारण्यांत येई. असे प्रकार सर्वत्र चालू होते. याशिवाय रात्रीं अपरात्री कॉंग्रेस आणि खिलाफत या संस्थांच्या कचेरींत पोलिस घुसत असत आणि कागदपत्रांची नासधूस करीत आणि वाटेल ते कागद घेऊन जात. ह्या सर्व जुलमांची नोंद सरकार करीत नसे यामुळें दडपशाहीस अधिकच उग्र स्वरूप प्राप्त झालें होतें.

**स्वयंसेवक संघटना**

देशांतील कोणत्याहि स्वयंसेवक संघटनेवर सरकार बेकायदा म्हणून शिक्का मारीत असल्यामुळें स्वयंसेवक पथक उभारणें अशक्य झालें. मग लोकांच्या पुढाऱ्यांनीं स्वयंसेवकांबद्दलचा कायदा मोडण्याचें ठरविलें. प्रथमतः **मोतीलाल नेहरू** आणि त्यांचे **उदयोन्मुख पुत्र जवाहरलाल** यांनीं स्वयंसेवक पथकांत आपलीं नांवें नोंदविली. त्याबरोबर त्यांना अटक होऊन शिक्षा झाल्या. बंगालमध्यें **देशबंधू दासांना** याच गुन्ह्यासाठीं शिक्षा होऊन ते तुरुंगांत पडले. अशा प्रकारें कायदेभंगाला चोहोंकडून ऊत आला. गांधीइतकेंच सरकारहि हट्टाला पेटलें होतें. पं. मदन मोहन मालवीयांसारख्यांनीं मध्यस्थी करण्याचा प्रयत्न केला. सरकारला युवराजाचे आगमनाचे वेळीं देशांत शांतता हवी होती, पण सरकारी अधिकारी दडपशाही कमी करण्यास राजी नव्हते. यामुळें कॉंग्रेसनें युवराजांच्या आगमनावर बहिष्कार घालण्याचें ठरविलें.

**मुंबईचा दंगा**

नाहीं होय करितांकरितां इंग्लंडचे युवराज एडवर्ड हे मुंबई बंदरांत येऊन दाखल झाले. त्यांचें स्वागत करावयास नागरिकांनी जाऊं नये असें कॉंग्रेसनें ठरविलें होतें परंतु कांहीं राजनिष्ठ मंडळी विशेषतः पारशी स्त्रीपुरुष उत्तमोत्तम पोषाख करून बंदरावर जाऊं लागले. लोकांनीं त्यांना अडविण्याचा प्रयत्न केला त्याबरोबर पोलिस मध्यें पडले आणि मग दंग्याला सुरुवात झाली

पारशी लोकांना पोलिस कमिशनरनें आदल्याच दिवशीं संरक्षणासाठीं बंदुका देऊन ठेवल्या होत्या. पारशी गुंडांनी त्याचा दुरुपयोग करून हिंदी स्त्री-पुरुषांवर खुशाल गोळ्या झाडल्या. त्यामुळें लोक अधिकच चिडले. आज हिंदु मुसलमान काँग्रेसकडे व पारशी सरकारच्या बाजूला असा देखावा दिसत होता. पारशांचें जीवन धोक्यांत आले होतें. दंगा आटपेना तेव्हां गांधींनी "**दंग्याचा उपशम होईपर्यंत मी उपोषण करीत आहें.**" असें प्रसिद्ध केलें. आणि नतर मुंबईतील पुढारी व गांधी स्वतः मोटारींत बसून दंग्याच्या भागांत हिंडून लोकांना शांत करीत चालले होते. गांधीच्या उपवासाचा परिणाम जनतेवर खूपच झाला आणि दंगा तीन–चार दिवसांनंतर शमला. मग गांधींनी उपवास सोडला. त्या वेळी सर्व धर्मांचे लोक, हिंदु, मुसलमान, पारशी वगैरेनीं त्याचे भोंवतीं जमून प्रार्थना केली. गांधींनीं छोटेंसें भाषण केलें. ते म्हणाले " तुम्ही जोंपर्यंत शांततेनें चळवळ चालवणार नाहीं तोपर्यंत तुम्हाला यश लाभणार नाही. क्रूर कृत्ये करून सरकारचें तोंड काळें झालें आहे. त्यांना वर माना करून बोलायला जागा नाहीं. अशा वेळीं तुमचें आचरण निष्कलंक राहिलें पाहिजे तरच तुम्हांला न्याय मागण्याचा हक्क प्राप्त होईल. पारशी जातीवरील तुमचा राग तुम्हीं सोडला पाहिजे. जबरदस्तीनें कोणाचेंहि मन आपलेकडे वळत नाही. प्रेमळतेनेंच तें वळू शकतें." वगैरे वगैरे.

**कलकत्त्याचा हरताळ**

मुंबईस जसा हरताळ पडला त्याप्रमाणें किंबहुना अधिकच कडक हरताळ कलकत्त्यास पडला. कलकत्त्याचें महत्त्व युरोपिअन लोकांस अधिक. कलकत्त्याहून राजधानी हलवली होती तरी पण युरोपिअनांच्या मोठमोठ्या कंपन्या कलकत्त्यासच व्यापार करीत होत्या. त्यामुळें कलकत्त्याचा हरताळ युरोपिअन लोकांना आणि अधिकाऱ्यांना फारच अपमानकारक वाटला. ज्या दिवशीं युवराज मुंबई बंदरांत उतरले त्याच दिवशीं हा हरताळ पडल्यामुळें आपल्या साम्राज्याचा हा अपमान आहे असें इंग्रज स्त्रीपुरुषांना वाटलें. आणि मग दडपशाहीनें भीषण स्वरूप धारण केलें.

**कायदेभंग**

आतांपर्यंत No Tax Campaign म्हणजे करबंदीची चळवळ कॉंग्रसनें कोठेंहि सुरू केलेली नव्हती. शेतकऱ्यांनी संघटित होऊन सरकारी पट्टी सारा न देण्याच्या चळवळीला करबंदी चळवळ म्हणतात. ही चळवळ चालविणें अत्यंत कठिण गोष्ट असते. शेतकऱ्यांना आपल्या जमिनी प्राणापेक्षांहि मोलाच्या वाटतात. कर न दिला तर सरकार लोकांच्या जमिनी जप्त करतें. सबंध तालुक्यांत करबंदीची चळवळ जर सुरू झाली तर सरकारनें लिलावास काढलेल्या जमिनी कोणी लिलाव बोलून घेत नाही. मग दुसऱ्या प्रातांतील गिऱ्हाईक सरकार उभे करतें आणि मातीमोलानें म्हणजे २००० रु.ची जमीन कधींकधी वीसवीस रुपयांना देऊन टाकतें. आपल्या डोळ्यांदेखत जमीन परप्रांताचे लोक घेताहेत ही स्थिति शेतकरी सहन करूं शकत नाहीं. तो सारा तरी भरतो व जमीन सोडवतो किंवा दंगा तरी करतो. सारा भरला कीं चळवळ मोडते आणि दंगा केला कीं चळवळ कायमची हटते. ही विघ्नें करबंदीची चळवळ सुरू करणारानें लक्षांत घ्यावयाची असतात. म्हणूनच गांधी या कार्यक्रमाला हात घालावयास प्रथम तयार नव्हते पण ठिकठिकाणचे लोक करबंदी चळवळ सुरू करण्याचा आदेश आपले प्रांतिक कॉंग्रसजवळ मागत होते. बराच विचार केल्यावर गांधींनीं जाहीर केलें की, मी स्वत: गुजराथेंतील बारडोली तालुक्यांत करबंदीचा प्रयोग करून पाहा-णार आहे. ह्या प्रयोगांत काय अनुभव येतो तें पाहून नंतर इतर प्रांतांतील लोकांना परवानगी देतां येईल.

**बारडोलीची करबंदी**

गुजराथमध्यें सुरत जिल्हा हा अत्यंत सुपीक भाग समजला जातो. त्यांत बारडोली म्हणजे सोन्याचा तुकडा होय. तापी नदीनें वरून उत्तम मऊ असा गाळ आणून ही भूमि तयार केलेली आहे. यामुळें बारडोली तालुका अत्यंत सुपीक झाला आहे. तेथील शेतकरी मोठे काटकसरी, कष्टाळू आणि हिंमत-

वान आहेत. बारडोलींतील व्यापारी धंद्यानिमित्त नेहमीं आफ्रिकेंत जात असत. आफ्रिकेंत अगणित संपत्ति मिळवून कांहीं लोक बारडोलींत कायम वस्ती करून राहिले. या मंडळींचा गांधींशीं आफ्रिकेंत निकट परिचय झाला होता. यामुळें गांधींच्या सल्ल्यावर बारडोलींतील शेतकरी आणि व्यापारी यांचा विश्वास होता. आफ्रिकेंतील कायदेभंगाची चळवळ या लोकांनीं प्रत्यक्ष पाहिली होती. यामुळें बारडोलींतील लोक **करबंदी चळवळ** अंगावर घ्यावयास उत्सुक झाले होते.

**अटी**

गांधी हे कसलेले नेते होते. जनस्वभावाची त्यांस चांगली पारख असे. भावनेच्या भरांत मनुष्य वाटेल तीं वचनें देतो, पण संकटाची झळ लागूं लागली कीं, मनुष्य पाय मागें घेतो. असें करबंदीच्या चळवळींत होऊं नये म्हणून गांधींनीं विधायक कार्यक्रमाचें पथ्य बारडोलीच्या लोकांमागें लावून दिलें. बारडोलीतील नेत्यांची सभा घेतली आणि त्यांना सांगितलें की, मी सांगतों तीं पथ्यें तुम्हीं पाळली पाहिजेत. तुमच्या तालुक्यांत शांततेने लोक वागतील याची हमी तुम्हीं लोकांकडून घेतली पाहिजे. प्रथम लोक शांततेनेंच वागतात पण पोलिस त्यांना चिडवतात आणि मग लोकांचा तोल सुटतो असें होतां कामा नये. दुसरी गोष्ट तुम्हीं लोकांनीं खादीचा खूप प्रचार केला पाहिजे. बऱ्याच लोकांनीं खादी वापरावयास सुरुवात केली म्हणजे मग तुमची लायकी वाढेल. खादीनंतर सर्व जातींत सलोखा राहील याची काळजी तुम्हीं घेतली पाहिजे. सर्व जातींच्या पुढाऱ्यांनीं येऊन मला सांगितलें पाहिजे कीं, कांहीं झालें तरी आम्ही भावाभावांसारखेच वागूं. चौथी गोष्ट म्हटली म्हणजे अस्पृश्यतेच्या भावनेचें बहुतांशीं उच्चाटन झाल्याचें मला तुमच्या तालुक्यांत दिसलें पाहिजे. या गोष्टी तुम्हीं केल्या म्हणजे तुमच्यात एकीचें आणि त्यागाचें बळ खरेंखुरें वाढेल. आणि मग आपली चळवळ कोणीहि दडपूं शकणार नाहीं.

## बारडोलीची संघटना

गांधी अशा प्रसंगीं नुसता उपदेश करून थांबत नसत. त्यांनीं लगेच आपल्या आश्रमांतील कार्यकर्ते बोलावून घेतले आणि त्याना बारडोली तालुक्यांत ठिकठिकाणीं आश्रम उघडावयास सांगितलें. आश्रमांतील मंडळी कसलेली होती. त्यांनीं वरील कार्यक्रम लोकांना शिकवण्यास धडाक्यानें आरंभ केला. लहान आश्रमाचीं पुढें मोठमोठीं स्वयंसेवक शिबिरें झाली. प्रचार जारीनें सुरू झाला. प्रत्येक गांवचें टपाल मुख्य कचेरीवर आणविण्याची व्यवस्था करण्यांत आली. ह्या करबंदीच्या शांतियुद्धाचे सरसेनापति सरदार वल्लभभाई पटेल हे नेमले गेले. वल्लभभाईंची ती शिस्त व तें संघटनाचातुर्य याचें वर्णन काय करावें! वल्लभभाईच्या संघटनाचातुर्याला हिंदुस्थानांत तोड नव्हती; असा हा बारडोलीच्या सत्याग्रहाचा महायज्ञ पहावयाला हिंदुस्थानांतून लहानमोठे नेते रोज येत होते. पंडितांनीं बारडोलींत कायमचें ठाणें देऊन ठेविलें होतें. जोंपर्यंत शांततेनें काम चाललें होतें तोंपर्यंत सरकारनें त्यांत ढवळाढवळ केली नाहीं. शेवटीं गांधींनीं बारडोली तालुक्याची स्वतः पाहणी केली आणि असें जाहीर केलें कीं, बहुतेक अटी बारडोलीनें पुऱ्या केल्या आहेत तेव्हां आतां करबंदीच्या चळवळीला आरंभ करावयास हरकत नाहीं. पुढें काय होतें याकडे हिंदुस्थानांतील लहानमोठयांचेंच केवळ नव्हे तर सरकारचेंहि लक्ष लागून राहिलें होतें, इतक्यांत ह्या चळवळीवर कल्पना नाहीं अशा मार्गानें मोठा आघात पडला, आणि ११ फेब्रुवारी १९२२ ला असहयोगपर्व समाप्त झालें.



# १३. खग्रास ग्रहण

## लाल कंदील

महात्मा गांधी आफ्रिकेंतून हिंदुस्थानांत ९ जानेवारी १९१५ला आले त्या दिवसापासून त्यांच्या हालचाली विद्युत्‌वेगानें होत होत्या. प्रतिमासी त्यांची लोकप्रियता वाढत चालली होती. **चंपारण्य, खेडा, अहमदाबाद** येथील सत्याग्रहांनीं ते हिंदी राजकारणांत विशेष तेजाने चमकू लागले. पंजाब प्रकरणात त्यांनी जे दक्षतापूर्वक काम केलें तें पाहून हिंदी पुढारी आश्चर्यचकित झाले. यानंतर त्यांनीं जेव्हा असहकारितेचा व्यापक कार्यक्रम काँग्रेसपुढें ठेवून तो मोठमोठ्या पुढाऱ्यांचा विरोध असतांना काँग्रेसकडून मान्य करून घेतला तेव्हा त्यांच्याकडे राष्ट्रसभेचें नेतृत्व आलें. "गांधी बोले आणि हिंद हाले" अशी स्थिति या कालात झाली होती. बारडोलीच्या करबंदीची तयारी चालू असतां गांधींची लोकप्रियता कळसास पोहोंचली होती. ताशीं चाळीस मैल वेगानें पंजाब मेल धडाक्यानें धांवत असावी. तिची ती गति आणि आवेश पाहून गाडीत बसणारालाच केवळ नव्हे तर दुरून पाहणाराच्याहि अगांत विलक्षण उत्साह संचरलेला असावा अशा स्थितीत एकाएकीं पुढें धोका आहे (Stop dead, and move slowly) एकदम सबूर करून मंद गतीनें चला अशी पाटी एंजिन ड्रायव्हरच्या नजरेस पडून त्यानें भरवेगांत असलेली गाडी थाबवावी; तसें गांधींनीं असहकारितेची चळवळ एकदम स्थगित करून हिंदी लोकानाच केवळ नव्हे तर सरकारला आश्चर्यचकित केलें. मुंबईचे गव्हर्नर सर **जॉर्ज लॉईड** यांनी एके ठिकाणी पुढील उद्‌गार काढले होते : "गांधींनी आम्हांला गोंधळून सोडलें. गांधींचा करबंदीचा आदेश लोकांनीं अमलांत आणला असतां तर आमचें काय झालें असतें ईश्वरालाच ठाऊक!" गांधींचा संग्राम हा जगाच्या इतिहासांत एक भव्य प्रयोग ठरणार होता. आणि तो विजयाच्या अगदी सन्निध जाऊन पोहोंचला होता." सर

जॉर्ज लॉईड म्हणजे ब्रिटिश नोकरशाहीचा अर्क होता. अशा मुरब्बी मुत्सद्याचें गांधींच्या प्रयोगाबद्दल वरील मत होतें. विजय इतका जवळ आला असतां गांधींनी चळवळ एकदम स्थगित का केली, हें करणें युक्त कां अयुक्त यावर पुढारी मंडळींत भवति न भवति झाली. कॉंग्रेस किंवा ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी बारडोलीचा संग्राम थांबवावयास मनापासून तयार नव्हती पण या चळवळीचा नेताच जेव्हा **चळवळ स्थगित करा** असें म्हणू लागला तेव्हां इतरांचें कांहीं चाललें नाही. जगांत शेवटीं कर्तृत्ववान पुरुषाच्या शब्दाला मान आहे. येथें मताधिक्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. असो. गांधींच्या प्रतिपक्षानें या वेळीं त्यांचेवर यथेच्छ तोंडसुख घेतलें. प्रतिपक्षाचे राहो पण त्यांचे मित्रानाहि हा निर्णय मान्य झाला नाहीं. सर्वांना निराश करून, राष्ट्राचा "**अवसानघात**" करून गांधींनीं साधलें काय असा विचार पुष्कळांचे मनांत आला. आपण आतां गांधीना हा निर्णय घेण्याला कारणें काय झालीं हें पाहूं या.

**इच्छा तसा अर्थ**

म. गांधीनी असहकारिता सुरू केल्यावर देशात सभा, हरताळ, परदेशी कापडाच्या होळ्या इत्यादि कार्यक्रमानीं लोकांत विलक्षण लोकजागृति झाली होती. लोक वाटेल तो त्याग करावयास सिद्ध झाले होते. परंतु गांधींची विचारसरणी सर्वसामान्य लोकानाच केवळ नव्हे तर अनेक लहान मोठ्या पुढाऱ्यांना समजलीच नाहीं. गांधींचा प्रयोग अगदीं अभिनव होता. गांधी युद्धाचा अर्थ जो करीत तो परंपरागत विचारानें भारलेल्या लोकांना कळच शकला नाहीं. लोकांना इंग्रज सरकारबरोबरचें युद्ध आवडलें. गांधी शांततेवर, अहिंसेवर जोर देत होते. तेव्हां लोक मनांत म्हणत "हा महात्मा मोठा धोरणी आणि खराखुरा मुत्सद्दी आहे. आपला कावा इंग्रजांना कळूं नये म्हणून यानें अहिंसेचें पांघरूण घेतलें आहे. त्यानें अहिंसेचाच जप करीत राहिलें पाहिजे आणि आम्ही प्रसंगाला योग्य दिसेल तें केलें पाहिजे." ह्याचा अर्थ असा होता कीं, इंग्रजांविरुद्ध द्वेष उत्पन्न करणें, गुप्त कट रचणें

अधिकारी एकटे दुकटे सांपडले तर त्यांना धाकदपटशा देणें या गोष्टी आपण करून सरकारच्या मनांत कॉंग्रेसबद्दल धाक उत्पन्न केला पाहिजे. असा धाक दाखविल्याशिवाय स्वराज्य काय बऱ्या बोलानें इंग्रज देणार आहे? ही विचारसरणी पुष्कळशा पुढाऱ्यांची होती. त्यांचे हातांत शस्त्रें नव्हतीं म्हणून ते अहिंसक झाले होते. सामान्य लोकांना काय, हिंसा-अहिंसेमधील फरक समजू शकत नाहीं. समाज हा पुढाऱ्यांच्या मागे जात असतो. यामुळें मनांतून हिंसक असलेल्या पुढाऱ्यांचे अनुयायी हिंसक बनले असल्यास नवल नाहीं.

असहकारितेचा कार्यक्रम ३० मार्च रोजीं दिल्लीला सुरू झाला असता पोलिसांनी लहानशी आगळिक केल्याबरोबर लोकांनीं आपल्या जमावाचें सामर्थ्य वाढलेलें आहे हें पाहून दंगा करावयास सुरुवात केली व रेल्वे स्टेशन जाळून टाकलें. मग सरकारनें आपलें हिंसक शस्त्र बाहेर काढलें आणि लोकांचा खूप छळ केला हें आपण मागें पाहिलेंच आहे. दिल्लीची बातमी ऐकतांच गांधी तिकडे जावयास निघाले. सरकारनें त्यांना वाटेंत अटक केली ही बातमी **मुंबई, अहमदाबाद, विरमगांव** या ठिकाणीं कळतांच लोकांनीं एकदम चिडून दंग्यास आरंभ केला. गांधींची चळवळ अहिंसक असल्यामुळें व त्यांचे कार्यक्रम शांततेचे असल्यामुळें सरकारी अधिकारी बेसावध राहिले होते. सामान्य पोलिस आणि तेही अगदीं थोडे अशा कार्यक्रमाचे वेळीं उपस्थित राहतात. लोकांना वाटे कीं, आपला जमाव चाळीस ते पन्नास हजारांचा आहे तेव्हां पाच-पंचवीस किंवा शंभर पोलिसांना आपण भारी आहोंत. यांना ठोकलें कीं स्वराज्य हातांत आलें. परंतु लोक असा विचार करीत नव्हते कीं इंग्रजांची शक्ति म्हणजे चार पोलिस नव्हते. त्यांची शक्ति त्यांच्या सैन्यांत आहे. तें सैन्य सरकार थोड्या तासांत दंग्याच्या जागीं आणूं शकतें व लोकांची दाणादाण थोड्या वेळांत मशीनगन्सच्या साहाय्यानें करूं शकतें. पण एवढा विचार लोकांना सुचतो कशाला? यामुळें ठिकठिकाणीं भयंकर दंगे झाले. मुंबईचा दंगा कांहीं केल्या थांबेना. लोक म्हणत आमच्या पुढाऱ्याला तुम्हीं अटक

केली तर आम्ही तें सहन करणार नाहीं, त्याच्या केसाला धक्का लागला तर आम्ही हजारों इंग्रजांचे बळी घेऊं. ही विचारसरणी **शस्त्रयुद्धांत** ठीक होती. पण गांधींनीं सुरू केलेलें युद्ध हें शस्त्रयुद्ध नव्हतें, तें **सत्याग्रही युद्ध** होतें. सत्याग्रही युद्धांत बलाचा यत्किंचितहि उपयोग वावडा समजला जातो. बलानें केलेल्या अत्याचाराला ह्या सत्याग्रही युद्धांत बलानें तोंड द्यावयाचें नसतें. ही गोष्ट गांधींनीं वारंवार सांगितली होती. **ज्याचा मंत्र त्याचेंच तंत्र, आपण पाळलें तर मंत्रसिद्धि होते**. गांधी वारंवार असें म्हणत, " माझा मंत्र जर तुम्हाला हवा तर माझें तंत्रहि तुम्हाला शिकलें पाहिजे. शस्त्राचें वा शारीरिक बल जर तुम्हाला उपयोगांत आणावयाचें असेल, तर तुमचा मार्ग तुम्हाला मोकळा आहे. शस्त्रयुद्धांत आपण इंग्रजांपुढें टिकाव धरूं शकत नाहीं. एवढया बलवान् जर्मनीचाहि ज्याच्यापुढें टिकाव लागला नाहीं, त्याच्यापुढें आपला पाड तो काय ? असें तुम्ही आजपर्यंत म्हणत आलात. शस्त्रबलाचा मार्ग तुम्हीं आचरूं शकत नाहीं म्हणून माझ्या मार्गाला येऊन मिळाला आहांत. तेव्हा माझें तंत्र तुम्हीं मजवर विश्वास ठेवून पाळलेंच पाहिजे." गांधीजी हे जेव्हा उपवास आरंभीत तेव्हां लहान मोठे पुढारी वठणीवर येत व आपल्या दुर्बलतेबद्दल गांधींजवळ पश्चात्ताप व्यक्त करीत. मग गांधींना वाटे, "माझा मार्ग अगदीं नवीन व कठिण आहे. लोक प्रथम थोडयाफार चुका करणारच. आपण त्यांना दूर लोटून कसें चालेल ? त्यांना कधी दटावून तर कधीं चुचकारून सत्याचे मार्गावर आणले पाहिजे." अशा तऱ्हेची विचारसरणी स्वीकारून गांधींनीं देशांत जे थोडेफार अत्याचार चालू होते त्याकडे दुर्लक्ष केलें आणि आपला कार्यक्रम तसाच नेटानें पुढे ढकलला. हा कार्यक्रम पुढें ढकलीत असतां **गांधींच्या खोल अन्तःकरणांत नेहमीं रुखरुख दडून राहिली होती**. ते मनांत म्हणत, " मी हा जोरानें पुढें जात आहे खरा, परंतु माझ्या मार्गांत धोका आहे तिकडे मी दुर्लक्ष करीत आहें." धरणीकंप सुरू होण्याच्या अगोदर पृथ्वीच्या पोटांत बरेच दिवस मोठी उलघाल चाललेली असते. त्याची

आपणाला दादहि नसते. या गडबडीचा दृश्य परिणाम जेव्हां धरणीकंपांत होतो, तेव्हां आपण आश्चर्यचकित होतो तशीच गोष्ट महान् विभूतींच्या बाबतीत आपणास आढळून येते. त्यांच्या हृदयांत विचाराच्या मोठमोठ्या खळबळा कर्तव्याकर्तव्यांचे झगडे जे चालू असतात त्याची आपणाला प्रथम कल्पना नसते. ह्या खळबळीचा स्फोट केव्हा तरी एकदम होतो व मग आपल्याला आश्चर्याचे धक्क्यावर धक्के बसतात.

## हिमालयाएवढी चूक

अहमदाबाद, विरमगाव येथील दंगे पाहिल्यावर माझी हिमालयाएवढी चूक असें शीर्षक देऊन आपल्या मनातील खळबळ गांधींनीं जनतेपुढें निवेदन केली. या लेखांत ते म्हणाले कीं, विधायक कार्यक्रमाची शिस्त लोकांत बाणण्यापूर्वींच मीं कायदेभंगाला थोड्याशा घाईने--स्वराज्य जवळ आणण्याच्या आतुरतेनें--सुरुवात केली, ही गोष्ट माझी हिमालयाएवढी चूक ठरली आहे. गांधी आपल्या चुकीला हिमालयाएवढी चूक ज्या वेळेस म्हणत होते त्या वेळीं त्यांची विचारसरणी काय होती हें आपण आतां पाहू. गांधीं म्हणत कीं, सरकारच्या दडपशाहीला उत्तर म्हणून मी **सत्याग्रहाची जी चळवळ सुरू केली ती चुकीची होती असें मुळींच नाहीं**. जुलमी सत्तेला आळा घालावयाचा तर असहकारिता हाच उत्तम उपाय आहे. ही असहकाराची चळवळ सत्याग्रह पद्धतीनें चालविली गेली पाहिजे. लोकांनीं आपली वृत्ति अहिंसक ठेवावयास हवी. ही वृत्ति लोकांत एकदम उत्पन्न होत नाही. म्हणून कांहीं लोकांना सत्याग्रह शास्त्र समजावून देऊन त्याना शिस्तीचे धडे दिले पाहिजेत. कायदेभंग करतांना कोणचे कायदे मोडावयाचे व कोणते नाही ह्याचें तारतम्य स्वयंसेवकांना हवे नाहीं तर सायकलला रात्रीं दिवा लावला पाहिजे, गाड्या डाव्या बाजूनें चालवाव्यात, रस्त्यावर मलविसर्जन करूं नये, अशासारखे नागरिक स्वास्थ्याला उपयुक्त असे कायदे लोक विचार न करितां मोडतील म्हणून पूर्व शिक्षणाची आवश्यकता असते. गांधी म्हणत की, माझी जो चूक झाली ती ही कीं स्वयंसेवकांना शिक्षण न देता मीं चळवळील

एकदम आरंभ केला. कोणचाहि कार्यक्रम अंमलात आणण्याचे वेळीं ठिकठिकाणीं शिस्तबद्ध स्वयंसेवक दल जर तयार असतें तर मुंबई, अहमदाबाद, विरमगांव, येथें जे लोकांनीं अत्याचार केले ते त्यांनी केले नसते. **स्वयंसेवकांच्या शिक्षणाची तरतूद आपण न केल्याच्या चुकीला, हिमालयाएवढी चूक असें गांधींनीं म्हटलें होतें,** परंतु त्यांच्या प्रतिपक्षियानीं त्याचा भलताच अर्थ केला. ते लोकांना सांगू लागले " सत्याग्रह, कायदेभंग, ह्या गोष्टी तुम्ही या देशात सुरू करूं नका, ह्या गोष्टी आपल्याला पचणार नाहींत असें आम्ही कंठरवानें गांधींना सांगत होतों पण त्या वेळीं त्यांनीं आमचें ऐकलें नाहीं, आणि आतां आपली चूक कबूल करण्यास ते निर्लज्जपणें पुढें येत आहेत. हिमालयाएवढ्या चुका करणाऱ्या मनुष्याचे मागें यापुढें राष्ट्रानें जाऊ नये. वगैरे. "

### चौरीचुरानें चुराडा केला

देशांत मधून मधून होणाऱ्या अत्याचाराकडे पाहून गांधींना वाटे की, देव धोक्याची सूचना देत असता आपण तिकडे दुर्लक्ष करीत आहोंत. अशा मनःस्थितींत गांधी असतां उत्तर हिंदुस्थानांतील गोरखपूर जिल्ह्यांतील **चौरीचुरा** गांवीं एक भीषण अत्याचार लोकांनी केला. त्या गांवीं तारीख १४ फेब्रुवारी १९२२ रोजीं लोक मिरवणुकीनें चालले होते. पोलिसांनीं लोकांची कांहीं तरी आगळिक केली. त्याबरोबर लोक उलटले आणि त्यानी पोलिसांवर हल्ला चढविला. पोलिस घाबरून आपल्या चौकींत शिरले. मग लोकांनीं त्या चौकीलाच आग लावून दिली. या आगींत बावीस पोलिस भाजून मेले. ही बातमी गांधींना कळतांच त्यांच्या मनानें घेतलें कीं देशात कायदेभंगाबरोबर हिंसेचें वातावरण पसरलेलें आहे. हिंसक वातावरणांत सत्याग्रही करबंदीची चळवळ यशस्वी होऊं शकत नाही. म्हणून करबंदीची आक्रमक चळवळ एकदम स्थगित करून लोकांना अहिंसक चळवळ चालविण्याचें शिक्षण दिलें पाहिजे. हें शिक्षण विधायक कार्यक्रमाचें साहाय्यानें देतां येईल. सत्याग्रह, असहकार, सविनय कायदेभंग हे मार्ग चुकीचे नाहींत. परंतु त्यांचें अवलंबन कांही दिवस स्थगित करण्याची वेळ आली आहे. असा विचार करून गांधींनीं

बारडोलीची चळवळ एकदम बंद करण्याचा निर्णय घेतला. आणि आपल्या निर्णयाला काँग्रेस वर्किंग कमिटी आणि ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची अनुमति मिळविली. ही अनुमति सहजासहजीं मिळाली नाही. सभासदांचें असें म्हणणें होतें कीं, **चौरीचुरा** हें बरडोलीपासून शेंकडों मैल दूर आहे. तेथील लोकांनीं अत्याचार केला म्हणून बारडोलीची चळवळ तुम्ही बंद कां करतां ? यानें लोकांच्या उत्साहावर विरजण पडून देशांत निरुत्साहाचें वातावरण पसरेल. यावर गांधी म्हणाले कीं, " **चौरीचुरा** येथेंच हिंसा घडली असें नाहीं. देशांत ठिकठिकाणीं लहान मोठ्या हिंसा नित्य घडत आहेत. यांत काँग्रेसचे स्वयंसेवकहि भाग घेत आहेत असें माझ्या कानावर आहे. तेव्हां अशा हिंसक वातावरणांत मी जर करबंदीची चळवळ सुरू केली तर देशाचें मी भयंकर नुकसान करीन. आज जरी मी चळवळीचें पाऊल मागें घेतों आहें तरी तें पुढें जास्त जोरानें जाण्याकरितां आहे हें तुम्ही लक्षांत घ्या, आणि मी सांगतों त्या विधायक कार्यक्रमावर भर देऊन राष्ट्राला मोठ्या चळवळीकरितां तयार करा." गांधींची ही माघार दूर धोरणाची होती. पण राष्ट्राला ती पटली नाहीं. जनता मनांत म्हणाली **चौरीचुरानें आमच्या आकांक्षांचा चुराडा केला.**

**गांधींचें प्रायश्चित्त**

बारडोलीच्या करबंदीची चळवळ, चौरीचुरा येथें घडलेल्या अत्याचारामुळें गांधींनीं मागें घेतल्यावर जनतेच्या हिंसामय पापाबद्दल त्यांनीं पांच दिवसांच्या उपोषणाचें प्रायश्चित्त घेतलें. आपण रागाच्या भरांत सूडाच्या निरीमिरींत पोलिसांवर जे अत्याचार केले त्यामुळें आपल्या वंदनीय अशा पुढाऱ्याला पांच दिवस उपाशी राहावें लागलें. बारडोलींतील शेंकडो शेतकऱ्यांच्या उत्साहावर विरजण पडलें. आपल्या अत्याचारी वर्तनानें चळवळीचा तोटा होतो ही गोष्ट ५० लेख लिहून, १०० व्याख्यानें देऊन जो परिणाम लोकांवर झाला नसता तो गांधींच्या ह्या उपोषणांतील देहदंडानें सर्व देशभर झाला. गांधींचें पुढारीपण स्वीकारावयाचें तर अहिंसेचें पालन हें केलेंच पाहिजे अशी जनतेची खात्री झाली. परंतु काँग्रेस नेत्यांना मात्र गांधींचें हें

करणें मुळींच पसंत पडलें नाही. त्यांनीं गांधींना कलकत्ता व नागपूर येथील कॉंग्रेसच्या अधिवेशनांत कौन्सिल बहिष्काराच्या बाबतींत विरोध केला होता ती मंडळी आता गांधीना विरोध करण्यास पुनः एकदां सरसावूं लागली. स्वामी श्रद्धानंदासारखी मंडळी म्हणूं लागली " कायदेमंडळांत जावें आणि तेथील स्वराज्याचे अर्धेमुर्धे अधिकार चालवून पाहावेत." अहिंसेच्या पालनाच्या बाबतींत धोरण म्हणून अहिंसापालन नेहमीच करणें जनतेला शक्य नाहीं. २५ फेब्रुवारी १९११ रोजीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा भरली आणि तेथ राष्ट्रसभेच्या ब्रीदवाक्याचा प्रश्न पुनः पुढें आला. "न्याय, शांततापूर्ण " शब्दांचा अर्थ अहिंसापूर्ण व सत्यपूर्ण असा गांधींनीं सांगितला पण तो ह्या पुष्कळांना पटला नाहीं म्हणून गांधींना तो आग्रह सोडून द्यावा लागला.

गांधींची चळवळ राज्याला विघातक अशी होत चाललेली पाहून सरकारनें त्यांचेवर खटला भरून त्यांना तुरुंगांत टाकावयाचें ठरविलें होतें. परंतु बारडोलीची करबंदीची चळवळ गांधीनीं मागें घेतली. हिंसेचा कडक शब्दांत निषेध केला आणि कॉंग्रेसला विधायक कार्यक्रम करण्याचा आदेश दिला, हें पाहून सरकारचें मन खटला न करण्याकडे झुकूं लागलें होतें. परंतु दिल्ली येथें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटींत कॉंग्रेसच्या ब्रीद–वाक्यावर जी चर्चा झाली ती ऐकल्यावर सरकारला वाटलें कीं, गांधींना सोडलें तरी त्यांचे सहकारी ह्यांची वृत्ति हिंसेकडेच झुकत आहे. नेत्याच्या फुशीमुळें लोक अत्याचार करण्यास मागें घेणार नाहींत. तेव्हां गांधींसकट कॉंग्रेस नेत्यांना पकडून तुरुंगांत टाकणें इष्ट होईल असा विचार करून सरकारनें गांधींवर खटला भरावयाचें ठरविलें आणि गांधींच्या 'यंग इंडिया'तील तीन लेखांवरून गांधींवर राजद्रोहाचा खटला भरण्यास मध्यवर्ती सरकारनें प्रांतिक सरकारला परवानगी दिली.

**अटक**

आपल्या अटकेची कुणकुण गांधींच्या कानीं आधींच आली होती.

आपल्याला पकडलें तर लोकांनीं कांहीं एक गडबड न करितां शान्ततेनें वागावें, **कॉंग्रसचें काम निर्भयपणें चालवावें**, खादी कार्यावर आणि हिंदु मुस्लीम एकी ह्यावर भर द्यावा वगैरे.ता. १०मार्च रोजीं सायंकाळची प्रार्थना आटोपल्यावर गांधी आश्रमवासीयांना म्हणाले "बहुधा आज रात्रींच सरकार मला पकडील." नतर ते आपल्या खोलींत गेले. आपल्या सहकाऱ्यांशीं थोडा वेळ बोलून महत्त्वाच्या पत्रांना त्यांनीं उत्तरें सांगितलीं. आपल्या अटकेनंतर 'यंग इडिया' कोणों कसा चालवावा याच्या मूचना त्यांनीं आपल्या सहकाऱ्यांना दिल्या. रात्रीचे दहा वाजल्यावर "आता तुम्ही येथून जाऊन झोपा मीहि झोपतों." असें म्हणून गांधी उघड्यावर नेहमींप्रमाणें जाऊन झोपले. **अनुसया बेन** आणि **शंकरलाल बँकर** आपल्या घिऱ्हाडीं जाण्यासाठीं आश्रमापासून फार दूर गेले नाहींत, तोंच त्यांना पोलिस सुपरिंटेंडेंट भेटले, " तुम्हीं अटकेत अहांत असे समजा " असें पोलिस अधिकाऱ्यांनीं **शंकरलाल बँकर** यांना सांगितलें. मग सारे जण आश्रमांत आले. सुपरिंटेंडेंटनीं **अनुसया बेन**बरोबर **गांधींना** अटकेचा निरोप पाठविला व त्याबरोवर सुचविलें कीं, तुम्हाला पाहिजे असेल तितका वेळ तयारीसाठीं तुम्हीं घेऊं शकतां. हां हां म्हणतां अटकेची वार्ता आश्रमाच्या कानाकोपऱ्यापर्यंत जाऊन पोहोंचली. सारे आश्रमवासी जन त्यांचे भोंवती जमा झाले. प्रत्येकाजवळ चार्चार शब्द ते बोलले. मुलांबरोबर हसत त्यांनीं विनोद केला "आतां नरसी मेहताचे आपलें आवडतें गीत म्हणा पाहूं" असें गांधींनीं म्हणतांच;

**वैष्णव जन तो तेने कहिये**
**जो पीड परायी जाने रे**

या गीताचे निनाद सर्वत्र पसरले. आश्रमवासीयांना वाटलें **नरसी मेहतानें** वर्णिलेल्या सर्व सात्त्विक गुणांचा पुतळा आपल्या डोळ्यांपुढून हेलावला जात आहे. गांधी जरी स्थितप्रज्ञाच्या वृत्तीनें त्या प्रसंगीं गंभीर आणि शांत होते तरी आश्रमांतील स्त्रीपुरुषांच्या डोळ्यांना या प्रसंगीं पाणी आल्याशिवाय राहिलें नाहीं गांधींची युरोपिअन शिष्या **मिराबेन** हिनें म्हटलें "येशू

ख्रिस्ताला अशाच एका शांत रात्री गुपचुपपणें रोमन शिपायांनीं पकडून नेलें होतें." गीत संपल्यावर आश्रमवासीयांनी गांधीचें पादवंदन केलें. त्यांनी सर्वांना आशीर्वाद दिला. नंतर ते आश्रमांतून निघून पोलिसांच्या मोटारींत जाऊन बसले. ती मोटार सरळ जवळच असलेल्या साबरमती तुरुंगाच्या दारापर्यंत गेली. शंकरलाल बॅंकर आणि गांधी त्या प्रचंड लाल दरवाजातून आत शिरतांच तो दरवाजा धाडकन् बंद झाला. आणि गांधी व जनता यांचा संबंध दीर्घकालपर्यंत तुटला.

गांधींचें सर्व जीवन गीतेंतील उपदेशानुसार चाले. लोकमान्य टिळकांप्रमाणें गांधीहि गीतेच्या चिंतनांत दिवसाचा कांहीतरी काळ घालवीत. आयुष्यांतील महत्त्वाचे प्रसंगीं " मामनुस्मर युध्य च " ह्या उपदेशाप्रमाणें वागत. तुरुंगांत जाण्याचे प्रत्येक प्रसंगी, प्राणांतिक उपोषणास आरंभ करतांना, उपवास मोडतांना आपल्या स्वजनांना घेऊन प्रार्थना करण्यास ते चुकत नसत.

अटक झाल्यावर सेशनमधला खटला चालण्यास आठ दिवस अवकाश होता. आरोपी हा काळ बहुतकरून वकिलांचे साहाय्याने बचावाची तयारी करण्यांत घालवितात. गांधीचें बचावाचें भाषण लो. मा. टिळकांच्या भाषणाप्रमाणें पांच सात दिवस तरी चालेल अशी कल्पना लोक करीत होते. पण याहि प्रसंगीं गांधींनी निराळाच मार्ग स्वीकारून जनमनाला आश्चर्याचा धक्का दिला.



## १४. अलौकिक खटला

दुसऱ्या दिवशीं गुन्ह्याची प्राथमिक चौकशी झाली. मॅजिस्ट्रेटनें खटला अहमदाबादच्या सेशन कोर्टाकडे पाठविला. १८ मार्च रोजीं हा खटला सेशन कोर्टांत सुरू झाला. कोर्टाभोंवतीं पोलिस आणि सोल्जर यांचा कडेकोट बंदोबस्त होता. कोर्टांत गांधींना आणण्यांत आलें तेव्हां **सर्व अधिकारी वर्ग उठून उभा राहिला. ॲडव्होकेट जनरल (सरकारी वकील) नंतर आले व त्यांनीं गांधींकडे पाहून आपली मान लवविली व गांधींना अभिवादन केलें.** राजद्रोही गुन्हेगाराला सरकारी अधिकारी व सरकारी मुख्य वकील यांनीं अभिवादन केलें अशी गोष्ट जगाच्या इतिहासांत आजपर्यंत घडली नाहीं. महाकवि भवभूति अशा प्रसंगांना अनुलक्षून म्हणतो,

**"ईदृशानां विपाकोऽपि जायते परमाद्‌भूतः"**

महान् विभूतींचे संकटकालदेखील अद्‌भुतरम्य प्रसंगानें भरलेले असतात. हें सत्य ह्या खटल्याचे वेळीं पुन्हां लोकांच्या प्रत्ययाला आलें.

ठरलेल्या वेळीं न्यायमूर्ति **ब्रूमफील्ड** हे उच्चासनावर येऊन बसले. त्यांचेपुढें अशा तऱ्हेचा हा पहिलाच खटला होता. आरोपी जसा अलौकिक त्याप्रमाणें त्याचा इन्साफ करणारा न्यायाधीशहि अलौकिकच ठरला.

### इंग्रजांच्या आदराची मीमांसा

गांधी इंग्रजी राज्यसंस्थेला **सैतानी सरकार** म्हणून तें नष्ट करण्याकरितां जीवाचें रान करीत असतांना देखील **इंग्रज** अधिकारी गांधींशीं नेहमीं आदरानेंच वागत. गांधी हे जागृत जनतेचे पुढारी म्हणून सरकार त्यांच्याशीं वाईट वागण्यास धजलें नाहीं. ही गोष्ट सत्य असली तरी गांधींना आदर दाखविण्याचें गोऱ्या अधिकाऱ्यांना कांहीं एक कारण नव्हते. मग हे इंग्रज अधिकारी कलेक्टरपासून व्हाइसरॉयपर्यंत **गांधींशीं** आदरानें कां वागत

हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. याचें कारण राजकीय नसून धार्मिक वृत्तींत सांपडू शकतें. आपला रामकृष्णांबद्दल जो आदर तोच इंग्रज स्त्रीपुरुषांचा येशू ख्रिस्ताबद्दल असतो. ख्राईस्टच्या चरित्राचा अभ्यास त्यांनीं लहानपणापासून केलेला असतो. ख्राईस्टची शिकवण व त्याच्या चरित्रांतील प्रसंग त्यांच्या मनांत खोल रुजलेले असतात. गांधींची भाषा, उपदेश, भूतदयेची वृत्ति, अहिंसेवरचा कटाक्ष व एकदर वागणुकींतलें मार्दव पाहून इंग्रज स्त्री–पुरुषांना गांधी हे ख्रिस्ताचा अवतार वाटत असत. राजकीय धोरणामुळें त्यांना गांधींना पकडून अटकेंत ठेवावें लागे पण तसें करीत असतां त्यांचें धार्मिक मन त्यांना सांगे कीं, "भगवान येशू ख्रिस्ताला तूं कैद करीत आहेस." हा विचार मनांत येतांच इंग्रजांची विरोधी वृत्ति मावळे आणि ते त्यांच्याशी आदरानें वागूं लागत. अधिकारी आपल्याशीं नम्रतेनें वागतात म्हणून गांधींनीं त्याचा फायदा घेतला असें कधींच घडलें नाहीं. यामुळें अधिकाऱ्यांचा आदर अधिकच दुणावे. हिंदुस्थानांत आल्यावर गांधींना चार पांच वेळां तुरुंगवास घडला. पण प्रत्येक वेळीं सरकार त्यांच्याजवळ आदरानेंच वागत आलें आहे. राजकीय कैद्याला, ज्या सवलती कोणत्याहि राष्ट्रांत मिळत नाहींत त्या गांधींना मिळत गेल्या याचें कारण गांधींचें अलौकिक व्यक्तिमत्व व येशू ख्रिस्ताचा अवतार वाटावा असें जीवन या गोष्टी तरुण वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्याव्या.

न्यायमूर्ति ब्रूमफील्ड आसनस्थ झाल्यावर आरोपपत्र वाचण्यांत आलें. या आरोपपत्रांत गांधींनीं 'यंग इंडिया' या नांवाच्या साप्ताहिकांत तीन लेख लिहून राजद्रोहाचा गुन्हा केला आहे असें म्हटलें होतें. गुन्हा आरोपीला कबूल आहे का असें प्रथम विचारण्यांत येत असतें. आरोपी बहुत करून गुन्हा नाकबूल करीत असतो. लोकमान्य टिळकांनींदेखील आपण गुन्हेगार नाहीं असेंच म्हटलें होतें आणि आपण कसें गुन्हेगार नाहीं हें त्यांनीं ज्यूरीपुढें पांच दिवस भाषण करून सिद्ध केलें होतें. टिळक म्हणत कीं सरकारचे दोष दाखवून त्याला लोकहितकारक गोष्टी करावयाला

लावणें हें वर्तमानपत्रकर्त्यांचें आद्य कर्तव्य आहे, राज्यकारभारांतील दोष दाखविणें हें इंग्लंडमध्ये राजद्रोहाच्या सदरांत मोडत नाहीं, मग हिंदुस्थानांत सरकारनें वर्तमानपत्राच्या टीकेला राजद्रोह समजून वर्तमानपत्राच्या संपादकावर खटला कां करावा ही विचारसरणी सर्व संपादक राजद्रोही खटल्यांत अवलंबीत असत.

**धक्का देणारीं उत्तरें**

गांधींनी ही पद्धत अजिबात टाकून देऊन आजपर्यंत कोणी अवलंबिला नाहीं असा मार्ग अवलंबून सरकारला, कोर्टाला आणि जनतेला चकीत केलें. तुम्ही गुन्हा केला काय असें गांधींना विचारण्यांत आलें तेव्हां ते शांतपणें म्हणाले 'होय' मला गुन्हा कबूल आहे. नंतर तुमचा धंदा काय म्हणून दुसरा प्रश्न त्यांना विचारण्यांत आला. खरे म्हटलें असतां त्यांनी 'बॅरिस्टर' अगर 'वर्तमानपत्राचा संपादक' असें आपल्या धंद्याचें नांव सांगावयास पाहिजे होतें. परंतु तसें न करितां गांधी म्हणाले "मी धंद्यानें शेतकरी आणि विणकर आहे," हे शब्द ऐकतांच कोर्टाला देखील आश्चर्य वाटलें. गांधींनीं बॅरिस्टरचा धंदा सोडून आश्रमीय जीवन पत्करल्यावर त्यांनीं शेतीवर प्रथम आपली शक्ति केंद्रित केली. वकिली हा उत्पादक धंदा नाहीं. शेती हाच खरा अखिल मानवांचा आधार आहे म्हणून राष्ट्रांतील बुद्धिवान् माणसांनीं त्याची उपेक्षा करूं नये असें ते नेहमीं म्हणत. अन्नाच्या खालोखाल मनुष्याला वस्त्राचीहि गरज आहे. म्हणून शेतीला जोडधंदा म्हणून त्यांनीं आश्रमांत हातमाग घातले. अशा रीतीनें गांधी हे आचारानें व विचारानें शेतकरी व कोष्टी बनले होते. ते संपादकीय लेखन करीत परंतु त्याला ते आपला मुख्य व्यवसाय समजत नसत म्हणून कोर्टाला त्यांनीं आपला धंदा शेतकरी आणि विणकर असा सांगितला. गांधींच्या ह्या उत्तरानें शेती आणि विणकरी ह्या धंद्यांना एकदम जगांत प्रतिष्ठा प्राप्त झाली. असो.

'गांधींना आपला बचाव करावयाचा नव्हता. तेव्हां ॲडव्होकेट जनरलला गुन्हा शाबीत करण्याची दगदगच पडली नाहीं. न्यायमूर्तींनीं गांधींना

शिक्षा देण्यापूर्वीं कांहीं बोलायचें आहे कां म्हणून पृच्छा केली. गांधींनीं होय असें धीरगंभीर स्वरांनीं म्हटलें. आणि लिहून आणलेलें आपलें पत्रक वाचण्यास आरंभ केला. गांधी म्हणाले,

"मी पूर्वीं कट्टा राजनिष्ठ व सहकारवादी होतों. पण आतां सरकारविरुद्ध अप्रीति पसरविण्याचा उद्योग करीत असतों हिंदुस्थानची राजकीय व आर्थिक अवनति पूर्वीं कधीं झाली नव्हती इतकी ब्रिटिश राजवटीत झाली आहे. देशावर कोणी आक्रमण केले तर त्याचा प्रतिकार करणें जनतेला शक्य नाही. कारण सर्व देश निःशस्त्र आणि नामर्द बनविण्यांत आला आहे. दुष्काळाला तोंड देण्याचा या कंगाल प्रजेच्या अंगांत अणुमात्र त्राण उरलेला नाहीं. पूर्वी शेतकरी सूत कातीत आणि विणीत असत. तो धंदा इंग्रजी सत्तेनें ठार केला आहे.

"खेड्यांतील लोकांची शहरांतील लोकांकडून नागवणूक करण्यासाठी ब्रिटिशाचा कायदेशीर कारभार चालू आहे. लोकांच्या भीषण दारिद्र्याचें चित्र आकड्याच्या जादूगिरीनें व कोरड्या युक्तिवादानें पुसून टाकणें अशक्य आहे. स्वर्गांत जर देव असेल तर या अमानुष गुन्ह्याबद्दल इंग्लंड देशाला जाब द्यावा लागेल यांत मला शंका मुळीच वाटत नाहीं. या दुःस्थितींतून बाहेर पडण्यासाठी मी असहकारितेचा मार्ग लोकांना दाखवून दिला आहे. **दुष्कृत्यांशीं असहकार करणें हें माझें कर्तव्य मी समजतों.** माझा असहकार पूर्णपणे अत्याचारविरहीत आहे. आणि या अनत्याचाराचें तत्त्वच असें आहे की, असहकारितेबद्दल जी शिक्षा असेल ती राजीखुशीनें स्वीकारावी म्हणून मला जी जास्तींत जास्त शिक्षा देणें शक्य असेल ती आनंदानें स्वीकारण्यास मी तयार आहें. प्रचलित राजसत्तेविरुद्ध अप्रीति पसरविण्याचें मला वेडच लागलें आहे. माझ्या देशाची अपार हानि करणाऱ्या राज्यपद्धतीपुढें मी मान वाकवं शकत नाहीं. मी दया भाकीत नाहीं. न्यायमर्ते! आपण आपल्या

जागेचा राजीनामा देणें हेंच आपलें कर्तव्य आहे. पण येथील राजसत्ता व येथील कायदा एकंदर जनतेच्या कल्याणास पोषक आहे, असें आपणाला वाटत असेल तर न्यायालयांतील जालीम शिक्षा मला ठोठावणें हें आपलें कर्तव्य आहे" असे उद्गार गांधींनीं काढून आपलें भाषण संपविलें.

आरोपी जेव्हां गुन्हा कबूल करतो तेव्हा जज्जाचें काम सोपें होऊन तो शिक्षा देऊन मोकळा होतो. न्यायमूर्ति ब्रूमफील्ड यांना गांधीनीं राजद्रोहाचा गुन्हा केला असें वाटत होतें म्हणून त्यांनीं प्रत्येक गुन्ह्याला दोन वर्षांची अशी तीन गुन्ह्यांना मिळून सहा वर्षांची साध्या कैदेची शिक्षा गांधींना दिली. परंतु ती देतांना त्यांनीं गांधींबद्दल आपला आदर शक्य तितक्या चांगल्या शब्दांत व्यक्त केला. हें निकालपत्र (जज्जमेंट) जरी लहान आहे तरी त्याला ऐतिहासिक महत्त्व असल्यानें त्यांतील कांही भाग पुढें देण्यांत येत आहे.

"कायदा हा कोणत्याहि व्यक्तीचा मग ती व्यक्ति केवढीहि मोठी असो मुलाहिजा धरत नाहीं हें खरें. पण हेंहि नाकबूल करतां येणार नाहीं कीं, मीं यापूर्वीं ज्यांचे खटले चालविले असतील किंवा यापुढे ज्यांचे खटले मी चालविण्याचा संभव आहे त्या माणसांपेक्षां तुम्ही निराळ्या कोटींतील आहां. तुम्ही आपल्या कोट्यवधी देशबांधवांच्या दृष्टीनें थोर देशभक्त आणि महान् नेते आहांत. जे लोक राजकारणांत आपल्याशीं समरस नाहींत ते देखील आपल्याकडे उच्च ध्येयाचा आणि उदात्त जीवनाचा आदर्श या दृष्टीनें पाहतात. तुम्ही अत्याचारांविरुद्ध अखंड प्रचार केला याचा विसर मला पडत नाहीं. आपणाला मोकळें ठेवणें हें तुम्हीं सरकारला अशक्य करून सोडलें याबद्दल अनेकांना खेद वाटतो.

"तुम्हांला शिक्षा देतांना बहुतांशीं अशाच स्वरूपाच्या एका खटल्याचा दाखला मी माझ्या डोळ्यापुढें ठेवीत आहे. बाळ गंगाधर टिळक यांनाहि १२४ अ कलमाखालीं सहा वर्षें साधी कैद अशी शिक्षा झाली होती. तुम्हांला मी टिळकांच्या पंगतींत बसविलें तर तुम्ही तें अयुक्त मानणार नाहीं असें मी

समजतों. एकूण सहा वर्षें साध्या कैदेची शिक्षा देतांना मला असें म्हणावेंसें वाटतें कीं, हिंदुस्थानांतील वातावरण बदलून तुमच्या शिक्षेची मुदत कमी करणें आणि तुम्हांला मुदतीपूर्वींच मुक्त करणें सरकारला शक्य झालें तर माझ्याइतका आनंद दुसऱ्या कोणासच होणार नाहीं."

न्यायमूर्तींचे शब्द हवेंत विरतात न विरतात तोंच गांधीजी उठून उभे राहिले व म्हणाले, " टिळकांच्या नावाशी माझें नांव जोडलें जाणें हा माझा बहुमान आहे. आणि मला तो अभिमानाचा मोठा विषय वाटतो. शिक्षेपुरतें बोलायचें झालें तर कोणत्याहि न्यायाधीशानें दिली असती इतकी सौम्य आहे. आणि खटलाहि चालविण्याच्या पद्धतीविषयी मी असें म्हणतों कीं याहून अधिक सौजन्याची मीं अपेक्षा केली नव्हती."

गांधीना ज्या तऱ्हेचा न्यायाधीश मिळाला त्याच्या अगदीं उलट लो. टिळकांच्या वांट्यास आला होता. न्यायमूर्ति दावर यांनी टिळकांना शिक्षा देतांना म्हटलें "तुमचें मन व अंतरंग रोगट झालें आहे. तुमचा मेंदु नासला आहे. तुमच्यासारखे पत्रकर्ते हा ईश्वरानें या भूमीला दिलेला शापच होय." असे विषग्ध बाण न्यायमूर्तींनी टिळकांवर सोडले आणि सहा वर्षांच्या काळचा पाण्याची कठोर शिक्षा देऊन वर असा मानभावीपणा दाखविला, " मी देणार ती शिक्षा इतकी थोडी आहे की ती ऐकून लोक म्हणतील न्यायमूर्तींनीं काय ही भलत्या ठिकाणीं भलती दया दाखविली." या उद्‌गारावरून गुलामगिरींत वाढलेला परकीय सरकारचा दास अशा न्यायधीशाच्या मनोवृत्तींची कल्पना येते. याच्या उलट स्वतंत्र देशांतील नागरिक जे जस्टिस ब्रूमफील्ड यांनीं गांधींना शिक्षा देतांना केवळ कर्तव्य म्हणून ती सुनावली पण ती सरकारनें कमी केली तर मला आनंद होईल असें म्हणून देशभक्तांचा त्यांनीं गौरवच केला. गांधींची योग्यता किती सौजन्यानें वर्णिली आहे ! जस्टिस ब्रूमफील्डचें निकालपत्र हें गांधींच्या पत्राइतकेंच इतिहासांत सुवर्ण अक्षरानें लिहिलें जाईल. असो.

या खटल्याचें महत्त्व हिंदुस्थानलाच केवळ नव्हे तर इंग्लंड, अमेरिका,

इत्यादि देशांतील लोकांना विशेष वाटलें. एक अमेरिकन पत्रपंडित (२८-४-१९२२)च्या न्यू यॉर्क कॉल या वर्तमानपत्रांत लिहितो कीं, "गांधींचें भाषण जो कोणी वाचून पाहील त्याच्या लक्षांत येईल कीं, मानव जातीचा उद्धार करणाऱ्या थोर विभूतींनीं आजवर केलेल्या भाषणांत प्रामुख्यानें गणना करण्याइतकें तें महत्त्वाचें आहे. तें वाचलें म्हणजे वाटतें ब्रिटिश साम्राज्य पिंजऱ्यात उभें आहे, गांधी नाहीत. 'तिरस्करणीय अशा राज्यकारभारालाच गांधी शिक्षा सुनवीत आहेत, असा भास होतो आणि ती शिक्षा योग्यच आहे' असा निर्वाळा भावी कालांतील स्वतंत्र प्रजा हमखास देईल. गांधीच्या या भाषणांत भीतीचा लवलेश नाही कीं, केलेल्या कृत्याबद्दल क्षमा, याचना नाहीं. त्यांत अहंकाराचा गंध नाहीं किंवा आपला डंका वाजावा म्हणून बढाई नाही. वक्तृत्वाच्या लकाकीचा उपयोग केल्याचेंहि त्यांत आढळत नाहीं. इतिहासाचा ओघ विचारांत घेतां आपण गांधींच्या जवळ त्याच्या तुरुंगांत उभे राहणें शतपट बरें. त्यांना एकांतवासांत लोटणाऱ्या न्यायदेवतेच्या हस्तकापाशीं नव्हे." जवाहरलाल त्या प्रसंगाचें वर्णन करतांना म्हणतात, "न्यायधीश इंग्रज होता आणि त्यानें आपलें काम रुबाबानें आणि सहानुभूतीनें पार पाडलें. गांधीजींचा जबाब हा अगदीं हृदय हलवून सोडणारा होता. तो ऐकून आमच्या भावना हेलावल्या. तशा स्थितींतच आम्ही न्यायमंदिराच्या बाहेर आलों. त्या वेळीं आमच्या डोक्यांत त्या भाषणांतील ठळक शब्द आणि प्रभावी विचारसंप्रदाय एकसारखे घुमत होते."

गांधीजींसंबंधीं अपार अभिमान बाळगणाऱ्या आणि अलौकिक काव्यशक्तीनें संपन्न असलेल्या श्रीमती सौ. **सरोजिनी नायडू** यांनीं या प्रसंगाचें वर्णन पुढें दिल्याप्रमाणें केलें आहे.

"अर्वाचीन काळांतील एक महान् घटना अत्यंत अल्पावधींत समाप्त झाली. तेथें जमलेल्या लोकांची उत्सुकता ओसरली. दुःखित अंतःकरणानें ते गांधींकडे हळूहळू जाऊं लागले आणि त्यांचा निरोप घेऊं लागले. जनतेच्या कल्याणासाठीं अविरत श्रम करून दमलेले ते कृश हात कोणीं आपल्या हातांत

घेतले, तर कोणीं राष्ट्रविमोचनार्थ सतत प्रवास करून थकलेल्या त्या सुरकुतलेल्या पायांवर आपलें डोकें ठेवलें. त्या हजारों व्यथित अंतःकरणांतून निघालेल्या दुःखोद्गारांच्या सागरांत आपल्या अलौकिक साधेपणानें व शांतपणानें गांधीजी उभे राहिले होते. जणूं कांहीं अखिल भारताचें प्रतीकच. राष्ट्रांतील स्वार्थत्यागाचा आणि उदात्तपणाचा जिवंत पुतळाच त्या वेळी मला वाटले. सरकार गांधींना पृथ्वीच्या पाठीवर कोठेंहि ठेवो पण गांधीचा मार्ग अकुंठित आहे आणि तो म्हणजे जनताजनार्दनाच्या अंतःकरणाकडे जाणारा. अखिल जनता हीच त्यांच्या अद्वितीय ध्येयाचा आणि अद्वितीय कार्याचा वारसा आहे.

**गांधींचा संदेश**

कोर्टातील भाषणाइतकाच गांधीचा शेवटचा संदेशहि अलौकिक आणि तेजस्वी होता, " तुम्ही निष्क्रिय राहाल तर तुम्हाला माझ्या उपदेशाचा अर्थ कळला नाहीं असें होईल. अशी निष्क्रियता म्हणजे सरकारच्या अन्यायापुढें शरणागतीच. सरकारच्या दडपशाहीला भिऊन अशी शरणागति स्वीकारणें कोणत्याहि जिवंत राष्ट्राला लज्जास्पद आहे.याच्या उलट दडपशाहीने चिडून अत्याचार करणें म्हणजे जालिअनवाला बागेत शेंकडों लोकांची कत्तल करणाऱ्या डायरला पाचारण करणें होय. म्हणून तुम्ही भिऊन स्वस्थ बसू नका आणि हिंसाहि करूं नका. असहकारितेचा विधायक कार्यक्रम अपल्याला अमलांत आणावयाचा आहे हें विसरूं नका." असें म्हणून त्यांनीं पुन्हा एकदा विधायक कार्यक्रमाचा उच्चार केला. हा कार्यक्रम जनतेनें अमलांत आणला तर वर्षाच्या आंत स्वराज्य खरोखरच मिळेल आणि स्वतंत्र भारताच्या आज्ञेने मी बंधमुक्त होईन.

अशा रीतीनें हा अलौकिक खटला समाप्त झाला. नेहमींच्या खटल्यांत आढळून येणाऱ्या गोष्टी या खटल्यांत आढळत नाहींत. ये । फर्यादी पक्ष आरोपीला अभिवादन करून नंतर आरोप वांचून दाखवितो. नेहमी आरोपी हा गुन्हा नाकबूल करतो तर येथें गुन्ह्याची स्पष्ट कबुली आहे. आरोपीनें दोन गोष्टी न्यायाधीशाला निर्भीडपणें सांगितल्या. जर माझें करणें

योग्य वाटत असेल तर या सैताने सरकारची नोकरी सोड. जर माझें कृत्य वाईट, देशविघातक आहे असें वाटत असेल तर ज्यास्तींत ज्यास्त शिक्षा दे. अशी मागणी कोणी करीत नाहीं. न्यायाधीश शिक्षा देतांना म्हणतो, मी "देत असलेली शिक्षा सरकारनें जर परिस्थिति पाहून कमी केली तर मला आनंदच वाटेल" हें सर्व पाहिलें किंवा वाचलें म्हणजे वाटतें आपण परिचित जगांत नसून अलौकिक जगांत तर नाहीं ना ?

## तुरुंगांतील जीवन

गांधींना यंग इंडियाचे संपादक म्हणून सहा वर्षांची व बँकरना त्या पत्राचे मुद्रक व प्रकाशक म्हणून दोन वर्षे शिक्षा देऊन साबरमतीच्या तुरुंगांत रवाना करण्यांत आलें. व थोडया दिवसांनीं येरवडयाच्या मध्यवर्ती तुरुंगांत त्यांची रवानगी झाली. हा येरवडयाचा तुरुंग अनेक थोर राष्ट्रभक्तांचें वसतिस्थान झालेला आहे. १८९७साली टिळक याच तुरुंगांत होते. गांधींच्या शिक्षेचा आणि स्थानबद्धतेचा पुष्कळसा काळ येरवडयांतच गेला. या येरवडयांत बंगाल्यांतील बुद्धिवान क्रांतिकारकांना डांबून ठेवण्यांत आलेलें होतें. इंग्रज सरकारला येरवडा तुरुंग ही सुरक्षित जागा वाटे. येथें बहुतकरून युरोपिअन अधिकारी असत. ते मोठया कडक शिस्तीचे आणि कठोर अंत.करणाचे दिसून येत. फंदाफितुरीला येरवडयांत जागा नसे. अशा ह्या येरवडयाच्या बंदिस्त कारागृहांत गांधींना ठेवण्यांत आलें होतें. युरोपिअन कैद्यांना ज्या स्वतंत्र विभागांत ठेवीत असतात त्या विभागांतील एक अकरा खोल्यांची चाळ गांधींना देण्यांत आली होती. या चाळीत गांधींचा स्वैंपाक होत असे. पिंजणें आणि सूतकाम करावयास यातील खोल्या उपयोगी पडत. एका खोलीला स्नानगृहाचें स्वरूप देण्यांत आलें होतें. एका खोलीत गांधींचें लेखनवाचन चालू असे. या विभागाकडे कोणालाहि जाण्याची सक्त मनाई होती जेलचे शिपाई आणि अधिकारी कामानिमित्त तेथें जात. गांधींची साधी शिक्षा प्रत्यक्ष व्यवहारात एकांतवासाची झाली होती. ही स्थिति किती भयानक असते याची कल्पना तुरुंगात एकांतवासात राहिल्याशिवाय होऊं शकणार नाहीं. एकांत-

वासाच्या शिक्षेमुळें कांहींना वेड लागलेलें आहे. पण टिळक–गांधी यांच्या-सारखे खंबीर मनाचे लोक याहि दिव्यांतून निभावून जातात.

**थोरांच्या अडचणी**

पुष्कळांची अशी समजूत असते कीं, थोर प्रसिद्ध पुरुषांची व्यवस्था राजासारखी तुरुंगांत असते. ही कल्पना अगदीं चुकीची आहे. तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना शिष्टाचार हे जवळजवळ माहीतच नसतात. त्यांचा संबंध नेहमीं खुनी, दरोडेखोर लोकांशीं येतो. यामुळें त्यांची वागणूक कोणाशींहि आडदांडपणाची असते. गांधी ज्या वेळीं येरवड्याच्या तुरुंगांत साबरमतीहून आले, त्या वेळी त्यांचेबरोबर चरखा आणि पिंजणाचें सामान होतें. तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना चरखा ही चीज कैद्याला लागते ही गोष्ट माहीतच नव्हती. गांधींचा मोठेपणा त्यांना काय होय ? त्यांनीं गांधींना सांगितलें कीं, "तुम्हांला चरखा जवळ ठेवतां येणार नाहीं." गांधी म्हणाले, "साबरमतीच्या तुरुंगांत मला तो जवळ ठेवतां येत होता." युरोपिअन अधिकाऱ्यांनीं ताबडतोब बजावलें कीं **साबरमती म्हणजे येरवडा नव्हे**. गांधीनीं पाहिलें की, आपण आतां कैदी आहोंत तेव्हां यांच्याशीं भांडण्यांत कांहीं अर्थ नाही. त्यांनी नंतर अधि-काऱ्यांना सांगितलें "तुमच्या नियमाप्रमाणें तुम्ही माझा चरखा उचलून नेऊं शकतां मला माझ्या नियमाप्रमाणें वागलें पाहिजे हातांनी सूत कातल्याशिवाय मी जेवीत नसतों. त्याप्रमाणें मी आता चरखा मिळाल्याशिवाय कांहीं एक खाणार नाहीं." हें उत्तर ऐकतांच अधिकारी चमकले. त्यांनीं फोन करून वरिष्ठ अधिकाऱ्यांना ही हकीकत कळविली. त्यांनीं फोन करून मुंबई सरकारला विचारलें. त्यांचेकडून उत्तर आलें '**गांधींना चरखा द्या**.' जी गोष्ट चरख्याची तीच खोलीबाहेर उघड्यावर निजण्याची परवानगी देण्या-संबंधी घडली. गांधी कधींहि खालीत झोपत नसत. ते नेहमीं अंगणांत अगर गच्चीवर उघड्यावर निजत. असें उघड्यावर निजणें त्यांच्या प्रकृतीकरितां आवश्यक होतें. तुरुंगांत कैद्याला रात्री कोठडींत कोंडून ठेवतात. गांधींनीं उघड्यावर निजण्याची परवानगी येरवड्याच्या अधिकाऱ्याजवळ

मागितली. अधिकारी म्हणाले अशी मागणी करणें हा निव्वळ मूर्खपणा आहे. हे अपमानकारक शब्द गांधींना गिळावे लागले. गांधी हे वागणुकींत नम्र असले तरी आपल्या रास्त गोष्टीकरितां झगडा चालू ठेवण्यांत मोठे चिकट असत. त्यांनीं सरकारकडे अर्ज केला कीं, मला उघड्यांवर प्रकृतिस्वास्थ्याकरितां निजणें आवश्यक आहे. मी कांहीं तुरुंगांतून पळून जात नाहीं. हें तुम्हांला माहीतच आहे, तरी मला उघड्यावर निजण्याची परवानगी द्यावीं. सरकारनें बराच विचार करून गांधींना तशी परवानगी दिली. नंतर प्रश्न निघाला विस्तीर्ण अंगणांत हिंडण्याचा बराच पत्रव्यवहार केल्यावर गांधींना सकाळ संध्याकाळ अंगणांत मोकळेपणानें हिंडतां येऊं लागलें. अशा रीतीनें प्रत्येक लहानसहान गोष्टींत गांधींना सरकारपर्यंत तक्रार नेऊन आपल्या सोई तुरुंगांत करून घ्याव्या लागल्या. याला सहा एक महिने लागले. गांधींशीं नित्य संबंध जसजसा येत गेला तसतशी गांधींची योग्यता त्या आडदांड अधिकाऱ्यांना कळूं लागली. अंगावर येणारा कुत्राहि नित्य परिचयानें भुकेनासा होऊन शेंपूट हालवून आपले हात चाटू लागतो. त्याप्रमाणें येरवड्याचे अधिकारी गांधींशीं हळूहळू सौजन्यानें वागू लागले; पण ही गोष्ट एका दिवसांत घडून आली नाहीं. असो.

### खुषीची सक्तमजुरी

गांधींनीं तुरुंगामधला आपला काळ फुकट घालविला नाहीं. त्यांना साधी शिक्षा असल्यामुळें तुरुंगांतलें असें काम त्यांना नसे. मग ते रोज सहा तास वाचन आणि चार तास सूतकाम करीत असत. कापूस पिंजून स्वतःच पिळू कातण्याकरतां तयार करून घेत. वाचनाकरितां तुलसीदासाचें रामायण, कुराण, ख्रिस्ती धर्माचीं पुस्तकें, उर्दू भाषेंतील धडे निवडले होते. चरखा कातीत असतां आपण गरिबातल्या गरिबांजवळ जात आहों असें त्यांना वाटत असे. त्यांनीं एका पत्रांत असें लिहिलें आहे की, बाहेर काय चाललें आहे हें मला जाणण्याची इच्छा नाहीं. माझी प्रार्थना कोणत्याहि चळवळीच्या खळबळाटापेक्षां अधिक प्रभावी आहे, असें समजावें. तुरुंगांत बाहेरच्या माणसांना अपमानानें वागविण्यांत येतें म्हणून माझे भेटीस कोणी येऊं नका, असेंहि त्यांनीं एका पत्रांत लिहिलें होतें.

### आजार आणि सुटका

गांधींचीं दोन वर्षें तुरुंगांत शांतपणें गेलीं. तुरुंगामध्यें सुरुवातीच्या कांही काळांत मनुष्याला वाचन, लेखन किंवा काम करण्यांत उत्साह वाटतो. परंतु तुरुंगाचें वातावरणच असें कांहीं कुंद असतें कीं, त्याचा परिणाम दृढनिश्चयी मनुष्याच्याहि मनावर झाल्याशिवाय राहात नाहीं. लोकमान्य टिळक येवढे मनाचे खंबीर ना परंतु गीतारहस्य लिहिल्यानंतर बाकीच्या चार वर्षांत त्यांचे हातून विशेष महत्त्वाचें लेखन असें कांही झालें नाहीं. शिवाय मनुष्याला दीर्घ कालाची शिक्षा असली म्हणजे कांहीं ना कांहीं रोग त्याचे शरिरांत उद्भवतोच. त्याप्रमाणें गांधीचे पोटांत आजार झाला. प्रथम तो उग्र स्वरूपाचा आहे असें वाटलें नाहीं. शेवटीं तो रोग ऑपरेशन केल्याशिवाय हटणार नाहीं असें मत सरकारी डॉक्टरचे पडलें. अॅपेंडीसायटिस्टचें ऑपरेशन ही कठिण शस्त्रक्रिया समजली जाते. ती शस्त्रक्रिया करण्याकरितां त्यांना पुण्याच्या ससून हॉस्पिटलमध्यें नेण्यात आले. शस्त्रक्रिया करण्यापूर्वी तुम्हांला कोणाला भेटावयाचें आहे का म्हणून त्यांना डॉक्टरनें विचारलें. तेव्हां त्यांनी 'सर्व्हंटस् ऑफ इंडिया' चे अध्यक्ष नामदार शास्त्री आणि खादी काम निष्ठेनें करणारे जुनें कॉंग्रेस सेवक हरिभाऊ फाटक यांना बोलावून घेतलें. ऑपरेशनच्या टेबलावर पडले असतां त्यांनीं हरिभाऊंना जो प्रश्न केला त्यावरून गांधींची विधायक कार्यक्रमाची आस्था दिसून आली. त्यावरून गांधींनी हरिभाऊंना विचारलें खादीचें काम कसें काय चाललें आहे ? तुम्ही तें नेटानें चालविलें पाहिजे असें बजावलें. कर्नल मेडॉक यानीं केलेली शस्त्रक्रिया पूर्ण यशस्वी झाली. त्यांतून गांधी पूर्ण बरे होतांच सरकारनें त्यांना समुद्रकांठीं राहून प्रकृति सुधारण्याकरितां मोकळें सोडून दिलें.

### सुटकेचें कारण

गांधींना सोडण्याचें मुख्य कारण म्हणजे असहकारितेच्या चळवळीला ओहोटी लागली होती. पुढारी मंडळींत कॉंग्रेसच्या कार्यक्रमाबद्दल मतभेद उत्पन्न झाले होते. हिंदु मुसलमानांत वितुष्टें आली होतीं तेव्हां सरकारला

वाटलें कीं, आतां गांधींकडून आपल्याला कांहीं त्रास होणार नाहीं, त्यांची सर्व शक्ति काँग्रेसमधील दुही मोडण्यांत खर्च होईल. असो.

गांधी सुटून जेव्हां बाहेर आले तेव्हा ते म्हणाले कीं, **माझी सरकारच्या कृपेनें सुटका झाली याची मला शरम वाटते.**

**गाढ अंधःकार १९२४ ते १९२७**

गांधी तुरुंगांतून बाहेर आले तेव्हां त्यांना सर्वत्र अंधःकार दिसला. राजकीय वातावरण कुंद आणि उदास झालें होतें. मनाच्या कोतेपणाचे प्रदर्शन पुढाऱ्यांनीं मांडलेलें पाहून गाधींना अपरिमित दुःख झालें. काँग्रेसचे नेते दोन पक्षांत विभागले गेले होते. मोतीलाल नेहरू आणि देशबंधू दास यांचें मत असें होतें कीं, आपण कौन्सिलांत निवडून भाग घ्यावा आणि निवडून येऊन कौन्सिलमध्यें सरकारशीं असहकार करून सरकारी ठराव नापास करावे. सरकारची यामुळें जनतेंत नाचक्की होईल. पुढारलेल्या देशांत इंग्रजांचें राजकीय धोरण लोकपक्षाला पसंत नाही असे दिसलें म्हणजे त्यांची बेइज्जत होईल आणि मग लाजेकाजेस्तव ते आपल्याला स्वराज्याचे हक्क देतील. गांधींच्या अनुयायांचें म्हणणें असें होतें की, कौन्सिलमध्यें जाऊन सरकारचा पराभव करण्यापेक्षां बाहेर राहूनच तुम्ही अधिक प्रभावी संघटना करूं शकाल. आणि हीच संघटना आपणास स्वराज्य मिळवून देण्यास समर्थ आहे. खरी गोष्ट अशी होती की, दास आणि नेहरू यांना कौन्सिलमध्यें काम उत्तम करतां यण्याजोगें होतें. म्हणून तेथें जाण्याचा त्यांचा हट्ट होता. राजगोपालाचारी, जम्नादास बजाज वगैरे दुसऱ्या पक्षातील लोकांनी दास नेहरूंना विरोध करून काँग्रेसमध्यें त्यांचा पराभव केला. तेव्हा दास नेहरू चिडले आणि त्यांनी "स्वराज्य पक्ष" स्थापन केला. या पक्षाचें बल वाढत गेले आणि काँग्रेसनें ज्यांना कौन्सिलमध्ये जावयाचें होतें त्याना जावयास परवानगी दिली. गांधी तुरुंगाच्या बाहेर आल्यावर त्यानी दोन पक्षांतील भांडणें मिटवन टाकलीं. विधायक कार्यक्रम ज्यांना मान्य होता त्यांना गाधींनी सांगितलें की, तुम्ही खादी, अस्पृश्योद्धार, जातीय ऐक्य इ. कामें करा. व स्वराज्य पक्षाला काँग्रेसची अधिकारसूत्रें देऊन टाका.

गांधींच्या ह्या सल्ल्यामुळें दोन पक्षांतील भांडणें मिटली आणि स्वराज्य पक्षाला आपला कार्यक्रम अमलांत आणण्याला वाव मिळाला. पण हें एकदम घडून आलें नाहीं. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटींत दास–नेहरूंना बहुमत नव्हतें. तरी-देखील गांधींनीं उदार मनानें दास नेहरूंच्या इच्छेप्रमाणें त्यांना कौन्सिल-मध्यें जाऊं दिलें. हें गांधींचें औदार्य पाहून दास नेहरूंची श्रद्धा गांधींवर अधिकच बसली. पराक्रमी पुरुषांना गांधींनीं आपल्यापासून दूर जाऊं दिलें नाहीं ह्यांत त्यांचा मुत्सद्दीपणा प्रकट झाला.

कौन्सिलात गेल्यावर पंडित मोतीलाल नेहरू, विठ्ठभाई पटेल, गोविंद वल्लभपंत, सत्यमूर्ती या मंडळीनी सरकारी पक्षाला आपल्या माहितीपूर्ण निर्भीड, बोंचक, खोंचक, वक्तृत्वाच्या सर्व ढंगांनी परिपूर्ण भाषणांनीं नुसतें जर्जर केलें. सरकार पक्षाला पराभवामागून पराभव सोसावे लागले. पंडित मोतीलाल नेहरूंचा विधिमंडळांतील रुबाब, चालणे,बोलणें, अशा कांहीं थाटाचें असें कीं विजयी वीर ते असून सरकारी अधिकारी त्यांचेपुढें कैदी म्हणून उभे आहेत. पण सरकार पक्कें कोडगें बनलें होतें. लोकपक्षानें नापास केलेले कायदे ते आपला विशेष अधिकार चालवून पास करून घेई. कांहीं वर्षांनी नेहरूंना कौन्सिलचा वीट येऊन ते त्या बाहेर पडले.

## देशबंधूंचा अंतःकाल

देशबंधू दास १९२५ साली जून महिन्याच्या १६ तारखेला दिवंगत झाले. त्यांची तुरुंगामध्यें जी प्रकृति बिघडली ती कायमची. बंगाल प्रांतिक विधिमंडळांत त्यागी सरकारला धाक वाटेल इतके तेजस्वी काम केलें. अलौकिक वक्तृत्व; कायद्याचें सूक्ष्म ज्ञान; पार्लमेंटरी कामाची बारीक सारीक माहिती आणि तीव्र राष्ट्रीय भावना इत्यादि गुणामुळें त्यांची विधि-मंडळांतील भाषणें मोठी परिणामकारक होती. परंतु या कामाचा ताण त्यांना झेपेनासा झाला. गांधीशी त्याचे कौन्सिलच्या बाबतीत जरी तीव्र मतभेद होते तरी परस्परांच्या गुणांविषयी आदर कायम होता. त्यागी आणि धीट दास गांधींना विशेष आवडत आणि सरकारशी अलौकिक असें युद्ध

करून त्याला नामोहारोम करणारे गांधी देशाभिमानी दासांना राष्ट्रोद्धारक व पूजनीय वाटत. शेवटच्या दुखण्यांत गांधी दासांच्या जवळ जाऊन राहिले होते. त्या वेळचे त्यांचे संवाद मोठे प्रेममधुर असे झालेले आहेत. देशबंधूंनीं गांधींना म्हणावें कीं, मी आतां बरा झालों म्हणजे चरख्याचा संदेश घेऊन मी बंगालच्या खेड्याखेड्यांतून फिरणार आहे. चरखा हाच देशाचा उद्धार करील. दुर्दैवानें देशबंधू लवकरच हा लोक सोडून गेले. गांधींनीं त्यांच्या कुटुंबाजवळ राहून त्यांना मोठा धीर दिला. देशबंधूंचें स्मारक उभारण्याकरितां रात्रंदिवस खपून १० लाखांचा फंड जमा केला. या फंडांतून पुढें रुग्णालय काढण्याची कल्पना होती. देशबंधू बरे होऊन राष्ट्राच्या उपयोगी पडतील; आणि आपल्या चळवळीत तेज आणतील अशी गांधींना आशा होती. पण ती फोल होऊन गांधींच्या दुःखांत अधिकच भर पडली.

### दुष्ट प्रचाराचा मासला

याच कालांत **मिस मेयो** या इंग्रजांच्या प्रचारक बाईनें **मदर इंडिया** नावाचें हिंदुस्थानची नालस्ती करणारें पुस्तक लिहिलें व त्याचा प्रचार अमेरिकेंत केला. हिंदुस्थान सरकारनें या पुस्तकाच्या बऱ्याच प्रती विकत घेऊन वाटल्या. इंग्रजांच्या राजकीय धोरणांतला हा एक भाग होता. अशीं पुस्तकें लिहून घेऊन इंग्रज सुसंस्कृत देशांत मुद्दाम पाठवून त्या लोकांना सागत कीं, आमच्या ताब्यात असलेला हिंदुस्थान देश कसा आहे तो पहा. हे लोक अडाणी आहेत. यांच्यात बळी देण्याच्या क्रूर पध्दती आहेत, यांचीं लग्नें बालवयांत होतात. हे लोक एकमेकांच्या पंक्तीत बसत नाहींत. एकेक पुरुष पांच पांच दहा दहा बायका करतो. बायकांना मोकळ्या हवेवर फिरण्याची बंदी करण्यात येते हे लोक परक्या सुसंस्कृत,सत्शील आणि विद्वान् माणसांला देखील तुच्छ समजतात, त्याच्या पंक्तींत बसत नाहींत. परकीय माणसांचा स्पर्श झाला तर हे लोक स्नान करतात. परदेशांत जाणें पाप समजतात. असे हे हिंदी लोक रानटी, अशिक्षित, मूर्ख आणि दुष्ट चालीरीतींचे गुलाम असलेले आहेत, अशा लोकांना लोकशाही

पद्धतीचें राज्य आम्हीं कसें द्यावें? हे चांगले सुधारल्याशिवाय त्यांना हक्क दिले तर ते आपआपसांत मारामाऱ्या करून स्वतःचा नाश करून घेतील म्हणून इंग्रज सरकार यांना स्वातंत्र्याचे हक्क एकदम देण्यास धजत नाहीं वगैरे. असलें समर्थन इंग्रज सरकार आपल्याकडून आपली भूमिका किती योग्य आहे हें जगाला या पुस्तकाद्वारें दाखवीत होतें. अशा पुस्तकाचा समाचार हिंदी लोकांनीं उलट पुस्तकें लिहून चांगलाच घेतला. गांधींनीं एकच लेख या पुस्तकावर लिहिला आणि तोच विशेष परिणाम-कारक ठरला. त्यांनीं या पुस्तकाला 'गटार तपासणींचा रिपोर्ट' असें नांव दिलें आणि म्हटलें शहरांतील गटारेंच तेवढी पाहून केलेला रिपोर्ट हा जसा सुंदर मनोहर विशाल नगरीचें यथार्थ वर्णन होऊ शकत नाही त्याप्रमाणें हिंदुस्थानच्या गिरिकंदरांत चालू असलेल्या कांही रानटी लोकांच्या चाली म्हणजे हिंदची संस्कृति नव्हे. हिंदची संस्कृति पाहायला तुम्ही थोर लोकांत मिसळलें पाहिजे. त्यांचे आचार पाहिले पाहिजेत. ते पाहिल्यावर हिंदच्या थोर संस्कृतीची कल्पना परक्यास होईल. मिस मियोच्या पुस्तकावरून ती होणार नाहीं. असो.

**अन्यायाचा प्रतिकार म्हणजे अहिंसा**

हिंदु मुसलमानांतील ऐक्याचा भंग होऊन त्यांच्यात रक्तपात ज्या वेळेस होऊं लागला, त्या वेळीं गांधींनीं हिंदु मुस्लीम ऐक्यावर एक उत्कृष्ट पत्रक तयार केलें. त्या पत्रकांत त्यांनीं म्हटलें आहे की, बहुतेक सर्वच दंग्याचे प्रसंगीं हिंदु पळतात व मुसलमान दांडगेपणानें वागून हिंदूवर आक्रमण करतात. ह्या दोन गोष्टी ऐक्याला विघातक आहेत. भित्रा आणि दांडगा यांचें कधींहि ऐक्य होऊं शकणार नाहीं. ह्याकरितां हिंदूंनीं धीर धरून आक्रमकांना तोंड दिलें पाहिजे. जर अहिंसेचा स्वीकार करण्याचें धैर्य व शक्ति हिंदूंत नसेल तर त्यांनीं प्रसंगीं गुंडगिरी बंद पाडण्यासाठीं लाठ्याहि चालवाव्यात. मुसलमानांनीं आपला आडदांडपणा टाकून देऊन संयमाचा धडा शिकावा. त्याशिवाय हिंदुमुसलमानांत ऐक्य कधींच स्थापन होणार नाहीं. आणि हें ऐक्य

झाल्याशिवाय हिंदुस्थानाला खरें स्वराज्य मिळणार नाहीं. यदाकदाचित् तें मिळालें तरी तें ह्या जातीय ऐक्याशिवाय टिकणार नाहीं. गांधींनीं जो उपदेश दोन्ही समाजांना केला तो लक्षांत ठेवण्याजोगा आहे. गांधींच्या अहिंसेच्या बाबतींत बराच गैरसमज आहे म्हणून गांधी ज्या अहिंसेचा उपदेश करीत त्याच्या स्वरूपाबद्दल थोडें विवेचन करावयास हवे. गांधी एके ठिकाणीं म्हणतात,

(१) 'चोर दरवडेखोर किंवा सर्प,व्याघ्र यांच्याशीं देखील अहिंसेनें वागून त्यांना प्रेमानें वश करणें हें **अहिंसेचें आत्यंतिक स्वरूप मी हिंदुस्थानपुढें कधींच ठेवलें नाहीं.** अंगावर धावून येणाऱ्या शत्रूला कांही प्रतिकार न करतां हसतमुखानें स्वागत करणें, त्याचेबद्दल मनात प्रेमभाव बाळगून त्याची सेवा करणें, असें करतांना मृत्यु आला तरी आनंदानें व निर्वैर भावनेनें त्याचा स्वीकार करणें अशा तऱ्हेच्या शुद्ध अहिंसेचे आचरण करण्याला शौर्याची पराकोटी अंगांत असावी लागते.'

(२) ही शुद्ध अहिंसा ज्याच्या अंगीं बाणली नसेल त्यानें हिंसा करूनसुद्धां शत्रूच्या अन्यायाला, अत्याचाराला तोंड देणें योग्य ठरेल.

अहिंसेच्या नांवाखाली अत्याचारी माणसाच्या **अन्यायाला विरोध न करतां पळून जाणें हा शुद्ध भेकडपणा आहे. माझी अहिंसा भित्राची नाहीं; शूराची आहे. मुसलमानापुढें हिंदु पळतात ते कोणत्याहि अर्थानें अहिंसक ठरत नाहींत.** स्त्रियांवर हात टाकणाऱ्या गुंडांचा बंदोबस्त करण्यासाठी स्वतःचा प्राण द्या; निदान त्या गुंडांचा प्राण घ्या; पण पळून जाऊं नका असा स्पष्ट आदेश गांधींनीं दिला आहे. पण असा आदेश देतांना हिंदु मुसलमानांतले तंटे मारामारी करून मिटावावे असें त्यांना वाटत नसे. ते म्हणत मारामारीनें असे तंटे मिटत नाहींत. मारामारीत आज पराभूत झालेला पक्ष उद्यां अधिक अधिक तयारी करून आपल्या प्रतिपक्षावरती जोराचा हल्ला चढवतो. म्हणून ज्या ज्ञाती शेंकडों वर्षांपासून एकत्र नांदत आहेत त्यांनी पंचामार्फतच आपले मतभेद मिटवून घ्यावेत. पण हा उपदेश दोन्ही जमातींना मानवला नाही. इंग्रज आपल्यांत युक्तिप्रयुक्तीनें दुही पाडीत आहे हें त्यांना दिसलें नाहीं.

## १५. उत्साहाचें किरण

१९२२ सालीं गांधींनीं बारडोलीच्या करबंदीची चळवळ देशांत हिंसक वातावरण सर्वत्र पसरलेलें आहे असें पाहून एकदम स्थगित केली, हें आपण मागें पाहिलेंच आहे. ही स्थगित करितांना गांधीनीं राष्ट्राला असें स्पष्ट बजावलें होतें कीं, करबंदीसारखी आक्रमक चळवळ जरी मी बंद करीत आहें तरी **अन्यायाचा प्रतिकार** करण्याचा मनुष्याचा अधिकार लोकांनी सोडून द्यावा असें मी केव्हाच म्हणत नाही अन्यायाचा प्रतिकार ही मानवी जीवनांतील नित्य गोष्ट आहे. हा प्रतिकार म्हणजेच सत्याग्रह होय. म्हणून सत्याग्रह हा अखंड चालू राहणारच.

### पुनश्च बारडोली

देशांत जिकडतिकडे जातीय दंगे होत होते, पुढाऱ्यांमध्यें कौन्सिल-प्रवेशाबाबत वाद माजले होते. ही संधि साधून सरकारनें गांधीचा जो बालेकिल्ला त्यावर जुलूम करण्याचा डाव रचला. सरकार दर ३० वर्षांनीं जमिनीची पाहाणी करून शेतसारा वाढवितें वा कमी करतें. शेतीचें उत्पन्न कांही कारणामुळे जर वाढत असलें तर सरकार साऱ्याची वाढ करतें; आणि जर ती जमीन निकामी होऊन शेतकऱ्याचें उत्पन्न जर घटत असलें तर मूळचा सारा कमी करण्यांत येतो. ही पद्धत एकंदर दृष्टीनें फार चांगली आहे. परंतु चांगल्या कायद्याची अंमलबजावणी वाईट करण्याची पद्धत इंग्रजी राज्यांत सुरू होती. त्याप्रमाणें **बारडोली तालुक्याच्या** साऱ्याची फेरतपासणी करण्याचा योग १९२६–२७ या सालात आला. सरकारनें बारडोलीचा सारा पंचवीस टक्क्यांनीं वाढविला. लोक म्हणत कीं, शेती सुधारण्यासाठीं सरकारनें कोणत्याहि तऱ्हेच्या सवलती दिल्या नव्हत्या किंवा इतर दृष्टीनें शेतीची सुधारणा घडवून आणण्यास सरकारनें मदत केली नव्हती. तेव्हां शेतसारा २५ टक्क्यांनीं वाढविणें हा शेतकऱ्यावर अन्यायच केवळ नव्हे तर जुलूम

आहे. १९२८ सालीं धान्याच्या किमती फारच घसरल्या होत्या. यामुळें शेती करणें हें शेतकऱ्यांना फायद्याचें नव्हतें. बारडोलींतील शेतकरी म्हशी पाळून तूप दूध विकून शेतींत होणारा तोटा भरून काढीत होते. अशा स्थितीत सरकारनें शेतसाऱ्याची वाढ करणें शेतकऱ्यांच्या हिताच्या दृष्टीनें अगदी अनिष्ट होतें. पण सरकार शेतकऱ्यांच्या हिताकडे बेगुमानपणें पहात होतें. गोल्डस्मिथनें एके ठिकाणी शेतकऱ्यासंबंधीं कळवळून म्हटलें आहे.

" The Bold peasantry Country's pride
When once distroyed can never be supplied."

**वल्लभभाईंचा इशारा**

शेतकरी हाच राष्ट्राचा आधारस्तंभ असतो आणि त्याला जर धक्का लागला तर राष्ट्राची इमारत हादरल्याशिवाय राहात नाहीं. पण सरकारला हिंदी शेतकऱ्यांची काळजी होती कोठे ? सारा वसूल करणें हाच त्यांचा धर्म होता. बारडोलीचा शेतसारा २५ टक्क्यांनी वाढला. तेव्हा लोकांनीं त्याबद्दल तक्रार केली. बारडोलीचा बार फुकट गेलेला नव्हता. तेथें संघटना कायम होती आणि सरकारला तोंड देण्याची लोकांची वृत्ति जागृत होती. सरकारकडे जेव्हा दाद लागेना तेव्हां लोकांनीं सारा द्यावयाचा नाही असें ठरवून ते वल्लभभाईकडे गेले आणि त्यांना आपल्या चळवळीचें पुढारी-पण स्वीकारण्यास सांगितलें. वल्लभभाईनी लोकांना स्पष्ट बजावलें कीं, तुमची सरकारला तोंड देण्याची तयारी आहे का? सरकार तुम्हाला मारील, झोडील, तुमची गुरेढोरे जप्त करून तुम्हाला भिकेला लावील, जमिनी माती मोलाने विकून टाकील, हे सर्व ध्यानात घ्या. चळवळ एकदां सुरू झाली, रगांत आली, म्हणजे मग तुमच्यांत फूट पाडण्याचा सरकार प्रयत्न करील. तरी आपल्या शक्तीचा अंदाज घ्या आणि मग मजकडे या. फुकट कॉंग्रेसच्या इज्जतीला इरेस घालू नका.

**"दास डोंगरी राहतो । यात्रा देवाची पाहातो "**

यानंतर लोक गांधींकडे गेले. गांधींनीं त्यांना सांगितलें सरदार म्हण-

तात तेंच खरें आहे आणि तुम्ही यापुढे त्यांच्याच सल्ल्याप्रमाणें चाललें पाहिजे मी या चळवळींत दूर राहून सहानुभूति फक्त दाखवीन. सरदारांनी परवानगी दिल्याशिवाय किंवा बोलावल्याशिवाय मी बारडोलीत पाऊल घालणार नाही. आपल्या अनुयायांच्या अधिकारांत हात न घालण्याची गांधीची पद्धत अनुकरणीय नाहीं असें कोण म्हणेल ? राजकीय बाबतीत जेव्हां कांही प्रश्न निघे तेव्हां गांधी म्हणत " हे काम मोतीलाल नेहरूंकडे सोपविलें आहे तेव्हा तुम्ही त्यांना विचारा. मोतीलालजींना वाटले तर ते मला विचारतील." या शिस्तवार धोरणाचा परिणाम चांगला झाला. मोतीलाल नेहरु आणि वल्लभभाई पटेल यांसारखीं कडक आणि ताठर वृत्तीची माणसें गांधींपुढें नम्र झालीं आणि त्याचें अनुयायित्व पत्करण्यांत स्वतःला भूषण मानू लागले. नेहरु आणि पटेल या दोन व्यक्ती 'मोडेन पण वाकणार नाही,' अशा वृत्तींचे पुरुष समजले जात. असो.

**वल्लभभाईंचा प्रभाव**

वल्लभभाईंनीं बारडोलीच्या शेतकऱ्यांच्या सत्याग्रहाचे पुढारीपण स्वीकारलें. शेतकऱ्यांची बाजू किती न्यायाची आहे हें आकड्यांनिशीं सिद्ध करून सरकारला कळविलें. नंतर आम्ही शेतसारा देणार नाही अशी सरकारला नोटीस दिली. या नोटीशीच्या अगोदर स्वयंसेवकांची फार मोठी सेना तयार करून बारडोलींतील मोठ्या गांवांत शिबिरें काढली. वल्लभभाई बारडोलींत जाऊन बसले होते. या शिबिरांची पाहणी ते भिरभिर हिंडून सारखी करीत होते. शेतकऱ्यांना त्यांनीं कोणत्या वेळीं कसे वागावें याची माहिती वेळोवेळी दक्षतेनें पुरविली जात होती. सरकारी अधिकाऱ्यांशीं असहकारितेनें वागावे म्हणजे त्यांना दूध तूप धान्य मिळूं देऊं नये असाहि वल्लभभाईंचा आदेश होता. न्हावी, धोबी त्यांच्याकडे सेवेला जात नसत. वल्लभभाईंनीं आपली शक्ति मोठ्या संयमानें वाढवीत नेली होती. अधिकाऱ्यांना त्यांनीं उपाशी ठेविलें नाहीं.पण वल्लभभाई परवाने देत तेव्हांच अधिकाऱ्यांना तालुक्यांत अन्न मिळत

होते. ही बातमी सरकारकडे गेल्यावर पोलिसांना शेतकऱ्यांचीं गुरें जप्त करण्याचा हुकूम मिळाला. जप्ती ही सरकारी कायद्याप्रमाणें सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत करतां येते म्हणून लोक दिवसां गुरांना घरांत कोंडून ठेवीत आणि आपणहि स्वतःला कोंडून घेत आणि रात्रीं गुरांसह बाहेर पडत. पुढे पोलिसांनीं कायदा गुंडाळून ठेवून दिवसा घरांत शिरून गुरांची जप्ती करण्यास आरंभ केला. मग लोकांनी शेजारच्या गायकवाडीं प्रदेशांत आपलीं गुरें नेलीं. थोडक्यांत सांगायचें म्हणजे पोलीस आणि लोक यांच्यांत आट्यापाट्याचा खेळच सुरू झाला होता, पोलिसांनीं जुलूम केला तरीं लोक अनत्याचारी राहिले. यामुळें गोळीबाराचा प्रसंगच आला नाहीं आणि संघटना मजबूत राहिली. बारडोलीचा हा लढा मोठा शिस्तशीर चाललेला पाहून ठिकठिकाणचे वर्तमानपत्राचे बातमीदार बारडोलींत आले. वल्लभभाईचें संघटनाचातुर्य पाहून टाइम्ससारख्या पत्रांनीं देखील आश्चर्य व्यक्त केलें. ही चळवळ चालू असतांना वल्लभभाई गांधींना बारडोलींत बोलावून घेत आणि आपल्या कामाची पाहणी करण्यास सांगत. गांधी आपल्या भाषणांत एकाच गोष्टीवर भर देत. ते म्हणत "सरदारांच्या आज्ञेत वागा म्हणजे यश तुमचेंच आहे. तुम्ही अत्याचार करण्याचा मोह आवरला कीं, मग सत्याग्रहाचें बळ जगाला दिसेल. सर्व हिंदुस्थानचेंच केवळ नव्हे तर जगाचें लक्ष तुमच्या चळवळीकडे लागले आहे हें लक्षांत ठेवा."

### सरकारला सुबुद्धि सुचली

सरकार अन्याय करीत आहे असें निरनिराळीं वर्तमानपत्रें देखील म्हणूं लागलीं तेव्हां सरकारला आपल्या धोरणाचा विचार करणें भाग पडलें. त्या वेळचे गव्हर्नर जनरल सर लेस्ली विल्सन हे ताठर आणि दुष्ट बुद्धीचे नव्हते. त्यांचे ठिकाणीं उदार वृत्ति होती. यामुळें बारडोलीचा प्रश्न सुटण्यास थोडी फार मदत झाली. आणि सरकारनें आपल्या धोरणाचा फेरविचार करण्याचें ठरविलें. शेवटीं देवाणघेवाण होऊन पंचवीस टक्के सारावाढ जी होणार होती ती ६। टक्क्यांवर सरकारनें उतरविली व चळवळींत शिक्षा झालेल्या

सत्याग्रहींना सोडून दिलें आणि जप्त केलेल्या जमिनी ज्याच्या त्यास परत केल्या. इतकें सरकारनें केल्यावर समयज्ञ वल्लभभाईनीं फार ताणून न धरता चळवळ थांबविली.

### उत्साहवर्धक यश

बारडोलीच्या शेतकऱ्यांचा अशा रीतीनें मोठा विजय झाला. १९२२ सालीं करबंदी थांबविल्यामुळें जो निरुत्साह देशांत उत्पन्न झाला होता तो आतां या विजयामुळें पार मावळला. देशांत सर्वत्र नवचैतन्याचें वारें खेळूं लागले. **गांधीची पद्धत** आणि वल्लभभाईचें **संघटनाचातुर्य एकत्र होऊन अहिंसक सत्याग्रहाचा विजय झालेला जगाला दिसला.** यानंतर वल्लभभाईचीं कीर्ति सर्व हिंदुस्थानांत पसरून ते प्रांताचे पुढारी न राहाता त्यांची गणना अखिल भारतीय पुढाऱ्यांत होऊं लागली. कोणी त्यांना बारडोलीचे सिंह म्हणत. सरदार ही पदवी जी त्यांना एकदां लागली होती ती आज सर्वतोमुखी होऊन सरदार म्हणजेच वल्लभभाई असें लोक आतां समजतात. बारडोलीनें इतका मोठा विजय मिळविला कीं, आज बारडोली म्हणजे सत्याग्रह, बारडोली म्हणजे अपूर्व संघटना, बारडोली म्हणजे शेतकऱ्यांच्या त्यागाची पराकाष्ठा, बारडोली म्हणजे हिंदुस्थानच्या अभिमानाचें केंद्र असा अर्थ सर्वत्र झाला. हिंदी लोकांना आतां एकामागून एक नव्या दमाच्या चळवळी हातीं घेण्यास उत्साह वाटू लागला. असा हा बारडोलीचा सत्याग्रह कॉंग्रेसच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनी लिहिण्याच्या योग्यतेचा ठरला. व याच देहीं याच डोळां सत्याग्रह पद्धतीचे यश गांधींना पहावयास मिळून देशावरची अभ्रच्छाया नाहींशी झाली.

### जागृत राष्ट्राचा अपमान

हिंदी लोकांचीं दुःखें खरींखुरीं होती. यामुळें दडपशाहीनें लोक कांहीं वेळ दडपले गेले तरी स्वातंत्र्याच्या त्यांच्या भावना पुन्हां पुन्हां उफाळून येत. लोकांच्या भावना न ओळखतां त्यांना चिडविण्याचें कौशल्य इंग्रज कट्टर साम्राज्यवादी पक्षाच्या अंगीं विशेष दर्जाचें होतें. त्या वेळचे भारतमंत्री आपल्या भाषणांनीं हिंदी लोकांचीं अंतःकरणें प्रत्येक वेळीं दुख-

वीत. एकदां तर ते बोलून गेले कीं "गांधींना विचारतो कोण? आम्ही जेव्हां त्यांना तुरुंगांत टाकलें तेव्हां रस्त्यांतलें कुत्रें सुद्धां भुंकलें नाही (Not a dog barked). हिंदी लोक स्वराज्य मागतात ना? मग त्यांना तें न मिळूं देण्याची व्यवस्था इंग्लंडांतील अधिकाररूढ पक्षानें केली. दर दहा वर्षांनीं हिंदी लोकांना दिलेल्या अधिकारांचा उपयोग किती झाला, सुधारणांच्या दुसऱ्या हप्त्याचें स्वरूप काय असावें, याची चौकशी करण्याकरितां एक बादशाही कमिशन ब्रिटिश सरकारनें नेमलें. या कमिशनवर हिंदी लोकांना घ्यावयाला पाहिजे होतें. सरकारनें मागें जी बादशाही कमिशनें नेमलीं त्यावर नामदार गोखले, चौबळ, नारायणराव जोशी अशांसारख्या हिंदी गृहस्थांस घेतलें होतें. पण याच वेळीं देशांत इतकी जागृति आलेली असून सायमन कमिशनवर एकहि हिंदी इसम सरकारनें नेमला नाहीं यामुळें हिंदी राजकीय वातावरणांत कृष्णच्छाया पसरली. कॉंग्रेस, नेमस्त, मुसलमान, अस्पृश्य सर्वच पक्ष सरकारवर नाराज झाले व कमिशनच्या पुढें साक्षी देण्यास न जाण्याची भाषा बोलूं लागले. कॉंग्रेसनें सर्वांपुढें जाऊन या कमिशनचा ठिकठिकाणीं काळीं निशाणें दाखवून धिक्कार केला. असा धिक्कार करण्याच्या गडबडींत देशभक्त लाला लजपतराय होते. एका गोऱ्या सार्जंटनें लालाजींना लाठीचा जब्बर तडाका दिला. तो मर्मावर बसून त्या महान् देशभक्ताचा अंत झाला. लालाजींचा बळी पडल्यामुळें लोक अधिकच चिडले. व्हाइसरॉयनीं गांधींना निमंत्रण पाठवून सायमन कमिशनची योजना दाखविली. तेव्हां गांधींनीं ती वाचून मर्मभेदक शब्दांत आपलें मत व्यक्त केलें. ते म्हणाले "हा कागद दाखविणें एवढेंच ना काम होतें? मग तें एका आण्याच्या पोष्टाच्या तिकिटानें झालें असतें. माझें काम सोडून मला येथें येण्याचे व्यर्थ कष्ट दिलेत."

**तारुण्यसुलभ घाई**

याच काळांत पंडित जवाहरलाल आपल्या अविरत उद्योगानें, तडफदार वृत्तीनें पूर्ण स्वातंत्र्याच्या पुरस्कारानें जनतेच्या पुढें सारखे येत होते.

त्यांनीं पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव कॉंग्रेसकडून पास करून घेण्यांत पुढाकार घेतला होता. या वेळीं सुभाष आणि जवाहर हातांत हात घालून काम करीत होते. या कालांत गांधी तरुणांना बेफाम होऊं न देण्याविषयीं जपत असत. कारण त्यांना राष्ट्राची शक्ति वाढवीत जाऊन पुन्हा कायदेभंगाची चळवळ सुरू करून ब्रिटिश सैतानी सत्तेला शह द्यावयाचा होता. जवाहरलाल आणि त्यांचे तरुण सहकारी पूर्ण स्वातंत्र्याकरितां उतावीळ झाले होते. वडिलांचे या बाबतींत ऐकायला पितृभक्त जवाहरलाल तयार नव्हते. लोकहि गांधींपेक्षां जवाहरच्या मागें जाण्यांत उत्सुक होते. अशा बिकट परिस्थितींत गांधींना आपलें धोरण पुढें रेटीत न्यावयाचें होते. त्यांनी जवाहरलालला चुचकारून म्हटलें कीं " जवाहर तुझें म्हणणें अगदीं खरें आहे. परंतु तत्त्व म्हणून नव्हे पण कांहीं धोरण व कांहीं शिष्टाचार म्हणून आपण सरकारला नोटीस देऊन कळवूं कीं, आम्ही वसाहतीच्या स्वराज्याची मागणी सर्व पक्षातर्फे केली आहे. तिला एका वर्षाच्या आंत मान्यता द्या. ही मान्यता न द्याल तर आम्ही कायदेभंग; करबंदी इत्यादि चढाईच्या चळवळी करण्यास राष्ट्राला आदेश देऊ." जवाहरलालजींनीं पाहिलें कीं, आपल्या ठरावाला यंदा नाहीं तरी पुढील वर्षीं गांधींची अनुमति मिळणार आणि ती अनुमति जर मिळाली तर मग हा **राष्ट्राचा जादूगार** स्वातंत्र्याच्या चळवळींत काय काय चमत्कार करून दाखवील याची कल्पना करवत नाहीं. पुढें उडी जोरानें मारण्याकरिता जवाहरलालनीं गांधींचें म्हणणें ऐकलें. मोतीलालजींना आपल्या मुलानें आपला मान राखला म्हणून गौरव वाटला आणि बापलेक गांधीजींना मधें घेऊन मोठ्या आनंदानें स्वगृहीं परतले.

### दशरथामागून रामचंद्र

ठरल्याप्रमाणें मोतीलालजींनीं कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून सरकारला एक वर्षाची नोटीस दिली कीं, वसाहतीचें स्वराज्य द्या नाहीं तर आम्ही कायदेभंगाची मोहीम सुरू करतों. सरकारनें म्हटलें आम्ही तुम्हांला कांहीं हक्क देऊं. परंतु धमकीची भाषा आम्ही चालू देणार नाहीं. वसाहतीचें स्वराज्य ही

गोष्ट अजून दूर आहे. सरकारचें उत्तर येईपर्यंत वर्ष होत आलें. १९२९ साल संपत आलें. लाहोरास कोणाला काँग्रेसचे अध्यक्ष करावयाचें याची चर्चा सुरू झाली, सरकारशीं पुनश्च युद्ध सुरू होणार ही गोष्ट स्पष्टच झाली होती. तेव्हां राष्ट्राचा मनोदय गांधींनी अध्यक्ष व्हावें असा होता परंतु गांधींनीं जवाहरचें अध्यक्षस्थानासाठीं नांव सुचवून योग्य वेळीं योग्य गोष्ट करण्याचें आपलें कौशल्य पुन्हां प्रगट केलें. गांधींच्या शब्दाप्रमाणें राष्ट्रानें जवाहरलालची निवड केली. या निवडणुकीनें किसान आनंदानें बेहोष झाले. मोतीलालजींचा आनंद गगनांत मावेनासा झाला. ते म्हणाले बापाचें राहिलेलें काम मुलगा पूर्ण करील. स्वरुपाराणींना आपली कूस धन्य झाली असें वाटलें. कमलदेवींच्या मनांत आपला पति जनहृदयसिंहासनावर अधिष्ठित होणार म्हणून हर्षाच्या ऊर्मि एकावर एक उठूं लागल्या. पण खुद्द जवाहरलालना गांधींची सूचना पसंत पडली नाहीं. ते गांधीवर रागावले व म्हणाले, मी राजकारणांतील कालचें पोर, मला अजून कित्येक वर्षें थोर पुढाऱ्यांच्या पायाशीं बसून आपली लायकी वाढवावयाची आहे. गांधींनी माझें नांव सुचवून मला संकटांत टाकलें आहे, परंतु राष्ट्रानें जवाहरलालचें कोठें ऐकलें ? शेवटीं जवाहरलालना अध्यक्षपद स्वीकारावें लागलेंच. अध्यक्ष-पदावर बसल्यावर मात्र त्यांनीं आपल्या निष्ठेनें, त्यागानें आणि तडफेनें काँग्रेसची इज्जत सारखी वाढवीत नेली. १९२९ च्या डिसेंबर महिन्यांत ३१ तारखेची मध्यरात्र उलटून गेल्यावर काँग्रेसनें स्वातंत्र्याचा ठराव पास करून जवाहरलालच्या हस्तें स्वातंत्र्याचा झेंडा फडकविला, आणि सरका-रशीं युद्ध जाहीर करून गांधींना या युद्धाचें सेनापतित्व दिलें. १९२२ सालीं अखिल भारतीय कायदेभंगाच्या चळवळीचीं सूत्रें गांधींनीं जीं खालीं ठेवलीं होतीं तीं आठ वर्षांनीं पुन्हां हातीं घेतलीं आणि जनतेला दाखवून दिलें कीं, गांधी हा विझलेला निखारा नाहीं.

# १६. पुनश्च कायदेभंग

**"वाग्देवते भाग्य तुझें विशाल । लाभे तुला हा शुभपर्वकाल"**

लाहोर येथें स्वातंत्र्याचा ठराव पास झाल्यावर ह्या अफाट देशाच्या कानाकोपऱ्यांत २६ जानेवारीस सर्व राष्ट्रानें **स्वातंत्र्यदिन** पाळावा म्हणून तरुण अध्यक्ष पं. जवाहरलाल नेहरू ह्यांनीं पत्रक काढलें. या प्रसंगाकडे दोन व्यक्ती लक्ष लावून पाहात होत्या. एक यमुना नदी तीरावरील दिल्लीपति व्हाइसरॉय व दुसरी साबरमती तीरावरील कटिवस्त्रधारी मूर्ति. प्रसंग एकच पण त्यानें दोघांचे मनांत दोन भाव निर्माण केले. राजप्रतिनिधीला वाटलें कीं, ही स्वातंत्र्याची घोषणा म्हणजे साम्राज्याचा "रामबोलोच" होय. निराशा-संभ्रम-भीति या भावना राजप्रासादांत पसरल्या. याच्या उलट काँग्रेसच्या स्वातंत्र्याच्या ठरावाचें स्वागत सर्व राष्ट्रानें मोठ्या उत्साहानें केलेलें पाहतांच साबरमती आश्रमांत

**"उठल्या उत्साहाच्या त्या शांत महोदधिवरी लहरी"**

तो उत्साह अशा तशाचा होता काय ? तो गांधीचा उत्साह होता. मेलेल्या मढ्यांना जिवंत करून त्यांचेकडून 'शर्तीचें' युद्ध करून घेण्याचें ज्यांचें सामर्थ्य त्या गांधींच्या सुप्त शक्ति दिव्य रूप धारण करून आज बाहेर पडूं लागल्या होत्या.

साबरमतीच्या तीरावर बसून ही कटिवस्त्रधारी व्यक्ति निःशस्त्र युद्धाची तयारी, अवाढव्य युद्धसामग्रीनें सुसज्ज अशा जगांतील बलिष्ठ साम्राज्याशीं सामना देण्यासाठीं करीत होती. जगाला हें दृश्य अद्भुत वाटलें. म्हणून ५६ देशांचे वार्ताहर साबरमती तीरावर हा चमत्कार पाहण्याकरितां जमा झाले.

एकीकडे तोफा, बंदुका, विमानें तर दुसरीकडे एकहि शस्त्र नाहीं. एकीकडे वैर, असूया, द्वेष, इत्यादि भावनांचा कल्लोळ तर दुसरीकडे अहिंसक-क्षमप्रधान वृत्ति, एकीकडे दुसऱ्यास लुटून त्यावर जगण्याची इच्छा तर दुसरीकडे दरिद्रनारायणाची काळजी. गांधींनीं अहिंसक सैनिक बरोबर घेऊन

व्हाइसरॉयच्या राजप्रासादावर चाल करून जाण्याचा आपला बेत सहकाऱ्यांना कळविला. पण या धाडशी कल्पनेला कोणाची संमति मिळेना. मग मिठाचा कायदा मोडण्याची कल्पना गांधींनी सुचविली. मिठावर कर ही गोष्ट जगांत कोठेंहि नाहीं. गरिबांतल्या गरीब माणसाला याची आवश्यकता आहे. पण सरकारनें मिठावर कर बसवून आपला खजिना भरण्याची प्रथा सुरू केली. हा उघड उघड अन्याय आणि जुलूम होता. असा जुलमी कायदा आपण जर मोडला तर हिंदी प्रजेची आपणास सहानुभूति मिळेल इतकेंच नव्हे तर जगाच्या वेशीवर हिंदुस्थानचें दुःख टांगलें जाईल. गांधी आतां अज्ञात व्यक्ति राहिलेली नव्हती. त्यांच्या हालचालीकडे जगातील बहुतेक थोरथोर मुत्सद्यांचें लक्ष होतें. हिंदुस्थानांतील कांहीं लोक त्यांचेकडे तुच्छतेनें पाहात असले तरी इंग्लंड, अमेरिका वगैरे देशांतील सुप्रसिद्ध वर्तमानपत्रांचे वार्ताहर गांधींच्या मुलाखती मिळाव्यात म्हणून साबरमतीच्या आश्रमांत तास तास तिष्ठत उभे राहात. एक काळ असा होता की, आम्ही हजारों रुपये खर्च करून आमची वातमी तुमच्या पत्रांत प्रसिद्ध कराल कां म्हणून विनंति करण्याकरितां इंग्लिश पत्रांच्या द्वारी तिष्ठत बसत असूं. पण आज हिंदी राजकारणाला तेज चढलें होतें. त्यामुळें हे मानी वार्ताहर आमच्या दाराशीं तिष्ठत उभे राहण्यास कमीपणा मानीत नव्हते. इंग्रजांशीं आम्ही जें युद्ध करतों तें किती न्यायाचें आहे हें थोरथोर राष्ट्रांना कळावें आणि त्यांची सहानुभूति मिळावी म्हणून कोणच्या कायद्यांचा भंग करावयाचा कीं, ज्यानें एकाच वेळीं हिंदी व परस्थ लोकांची सहानुभूति आपण मिळवूं शकूं, याचा विचार गांधींनीं रात्रंदिवस करून मिठाचा कायदा तोडण्याचा निर्णय घेतला व तो काँग्रेसश्रेष्ठींना मान्य झाला. समुद्राच्या तीरावरील मूठभर मीठ सरकारी परवान्यावाचून घेऊन ब्रिटिश साम्राज्याच्या बळकट किल्ल्याला आपण सुरुंग लावणार ही गांधींची कल्पना किती वेडगळ आहे अशी टीका कांहीं देशी वर्तमानपत्रांत येऊं लागली. थोरांच्या प्रकृतींत चैतन्य असतें त्यामुळें ते ज्या गोष्टीला हात लावतील त्या

चैतन्यमय करून सोडतील. हा अनुभव या महान् स्वातंत्र्ययज्ञाचे वेळीं आपल्याला पुन्हां आला.

**वेगवान् प्रचारयंत्र**

१९२० सालीं असहकारितेचा कार्यक्रम गांधींनीं एकदम सर्व हिंदुस्थानांत सुरू केला. लोकांना शिस्तीचें वळण त्या वेळीं लागलें नव्हतें. यामुळें दंगेधोपे होऊन ऐनवेळीं गांधींना माघार घ्यावी लागली म्हणून गांधींनीं सावधगिरीचा पण प्रभावशाली असा कार्यक्रम आखला. त्यांनीं सबंध राष्ट्राला असा संदेश दिला कीं, "मी कायदेभंग करीपर्यंत कोणीहि कायदेभंग करावयाचा नाहीं. मी मिठाचा कायदा मोडण्यासाठीं गुजराथच्या दांडी नांवाच्या समुद्रकाठच्या एका खेड्यांत जाणार आहे. हें खेडें माझ्या साबरमतीवरील आश्रमापासून अडीचशें मैल लांब आहे. ही यात्रा मी माझ्या निवडक लोकांसह पायीं करीन. लोकांनीं शांततेनें राहून माझ्या मार्गाचें अनुकरण मी ठरवीन त्या दिवशीं करावें."

गांधी पायीं यात्रेला निघणार ही बातमी ऐकतांच देशांत कुतूहल निर्माण झालें. या यात्रेंत सामील होण्यासाठीं ठिकठिकाणचे लोक गांधींची परवानगी विचारूं लागले. गांधींनीं फक्त ७९ लोकांची निवड केली. आणि बाकीच्यांना सांगितलें कीं, तुम्ही आपापल्या गांवीं कायदेभंग करा. जेथें मीट नसेल त्या ठिकाणीं इतर अनिष्ट आणि जुलमी कायदे मोडतां येतील त्यांत जंगलचा कायदा येतो. सरकार राखीव जंगलांतून लोकांना गवत आणि जळाऊ लाकडें कापून नेण्याबाबत फारच कडक निर्बंध घालून त्रास देत असे म्हणून जंगलाचा कायदा मोडायची गांधींनीं परवानगी दिली होती. ११ मार्च १९२० रोजीं गांधींनीं आपल्या आश्रमांतून एक भीष्मप्रतिज्ञा करून ७९ अनुयायांसह ते बाहेर पडले. **जोंपर्यंत स्वराज्य मिळालें नाहीं तोंपर्यंत मी या माझ्या आवडत्या आश्रमांत परत येणार नाहीं.** लोकांना वाटलें कीं, रामचंद्र चौदा वर्षें वनवासासाठीं बाहेर पडत आहेत. देशांतील थोरथोर पुढारी त्यांना निरोप

देण्यासाठीं त्या वेळीं जमले होते. प्रार्थना झाल्यावर शेंकडों स्त्रियांनीं कुंकुम-तिलक लावून त्यांना ओवाळलें.

गांधींनीं आपला लहानसा बिछाना पाठीला बांधून घेतला आणि काखेंत अत्यंत गरजेच्या गोष्टींनीं भरलेली थैली अडकवून दिली. ते हातांत काठी घेऊन अत्यंत गंभीर मुद्रा धारण करून आश्रमांतून बाहेर पडले. त्यांच्या मागून ७९ लोक शिस्तीनें चालू लागले व हा देखावा पाहण्यासाठीं हजारो लोक साबरमतीच्या तीरावर जमले होते. दांडीच्या प्रवासाची आंखणी व्यवस्थित केली होती. सकाळीं पांच मैल आणि दुपारीं पाच मल चालत जाण्याची योजना झाली होती. पांच मैलानंतर गांधींचा मुक्काम पडत असे. मुक्कामावर भोजनाचा साधाच बेत असे. गांधींचें भाषण ऐकावयास आसपासच्या खेड्यांतील लोक जमा होत. त्यांना गांधी आपला हेतु थोड-क्यांत समजावून सांगत.

या २५ दिवसांच्या यात्रेची वार्ता रोजच्या रोज प्रसिद्ध होत गेल्याने हिंदुस्थानांतील लोकांच्या भावना अधिकाधिक चैतन्यरूप घेऊं लागल्या व कायदेभंग करावयास जनता एका पायावर उभी राहिली. ठिकठिकाणच्या लोकांनीं या कायदेभंगाच्या चळवळीची पद्धतशीर आंखणी केली. कोठेंहि दंगा अत्याचार होऊं नये म्हणून डोळ्यांत तेल घालून काँग्रेसनेते पहात होते. आजपर्यंत झाला नव्हता इतका तप्त हिंदुस्थान होत चालला होता. सरकार त्या गोष्टीकडे डोळ्यांत तेल घालून पहात होतें. काय करावें याचा निर्णय त्याला होत नव्हता. कोठेंहि अत्याचार न झाल्यानें सरकारला चळवळींत हात घालणें कठिण होऊन बसलें. गांधींची शक्ति तर कल्पनातीत वाढली होती. शेवटीं ५ एप्रिलला गांधी दांडीला जाऊन पोहोंचले. दुसऱ्या दिवशी सकाळीं गांधी प्रथम कायदेभंग करणार होते. त्यांच्याकडे जगाचें लक्ष लागून राहिलें होतें. ५ तारखेची रात्र दांडी गां ीं लोकांनीं जागून काढली. त्याच-प्रमाणें हिंदुस्थानांतील लहानमोठ्या शहरांनीं पुढें काय होतें या कल्पनेंत घालविली.

**नमक का कायदा तोड दिया**

ज्यांत मानवी धर्माची अवगणना नाहीं आणि शुद्ध भावनांना उत्तेजन मिळतें अशा हिंदु चालीरीतींचा धिक्कार गांधी कधींहि करीत नसत. आयुष्यांतल्या महत्त्वाच्या प्रसंगीं 'माम् अनुस्मर युध्य च' या भगवंताच्या आज्ञेप्रमाणें ते प्रार्थना करीत आणि नंतर महान् कार्याला निघत. या वेळीं जर त्यांना कोणी भाविक हिंदु स्त्रीनें ओंवाळलें आणि कुंकुमतिलक लावला तर ते अशा गोष्टींना नकार देत नसत. ६ एप्रिलला पहाटे गांधींनी स्नान केलें. स्त्रियांनीं त्यांना कुंकुमतिलक लावला. पुष्कळांनीं त्यांचें पादाभिवंदन केलें. नंतर सर्व सत्याग्रहींनी मिळून प्रार्थना केली. प्रार्थनेनंतर गांधोनीं लहानच परंतु अत्यंत गंभीर असें भाषण केलें. ते म्हणाले, "मला जर सरकारनें पकडलें तर माझ्या मागून तुम्ही आबास तय्यबजी यांचा हुकूम माना आणि त्यांनाहि जर सरकारनें उचललें तर सौ. सरोजनी नायडू यांच्या आज्ञेंत तुम्ही रहा. आज मजबरोबर असलेल्या ७९ सैनिकांनीं कायदेभंग करावयाचा आहे. इतरांनीं उद्यां करावा. माझ्या दृष्टीनें हा एक महान् यज्ञ आहे म्हणून त्याचें सर्व वातावरण आध्यात्मिकच राहिलें पाहिजे." गांधीजी धिमेपणानें चालत समुद्रतीरावर गेले. चालतांना आबास तय्यबजींच्या नातीच्या खांद्यावर त्यांनीं हात ठेवला होता. त्यांचे मागें त्यांची सत्याग्रही सेना चालत होती. समुद्राचे पाण्यांत गांधींनीं पाय टाकतांच तो प्रदेश 'महात्मा गांधी की जय' या घोषणेनें दुमदुमून गेला. त्याचे पडसाद सर्व हिंदुस्थानभर पसरले असें म्हणण्यास हरकत नाहीं. दांडीला घडणाऱ्या प्रत्येक हालचालीची वार्ता तारेनें हिंदुस्थानभर धाडली जात होती. गांधींनी किनाऱ्यावर पडलेलें मीठ बिगर परवाना हातांत उचलून घेतलें त्यासरशीं (Hail Law Breker) कायदेभंग करणाराचें अभिनंदन असो अशी कौतुकाची आणि अभिमानाची वाणी सरोजनीबाईंच्या तोंडांतून बाहेर पडली. या वेळीं एकहि पोलिस तेथें फिरकत नव्हता.

यानंतर गांधींच्या स्वयंसेवकांनीं मिठाचीं पोतीं भरून आट नांवाच्या

खेड्यात नेऊन ठेवलीं. पोलिस ते घ्यावयाला आले तेव्हा गांधींनीं आदेश दिला कीं, तुम्ही पोलिसांशी दंगामस्ती करूं नका. **पण हातांतील मीठहि सोडूं नका.** ते न सोडल्यामुळें जे हाल पोलिस करतील तें सहन करा. हा गांधींचा आदेश हिंदुस्थानभर सत्याग्रही सैनिकांनीं निष्ठेनें पाळला. पोलिसांनीं ठिक-ठिकाणीं लाठीमार केले. स्वयंसेवक **धाराष्णा** येथील प्रचंड मिठागराचें मीठ घेत असतां पोलिसांनीं त्यांचेवर घोडे घातले व त्यांना घोड्यांच्या टापा-खालीं चिरडलें तरीहि **स्वयंसेवक आपले जागेवरून हालले नाहींत.** जेथें समुद्रकिनारा नव्हता तेथें बेकायदा जमविलेलें मीठ पाठविण्यांत येत असे. आणि लोक ते जाहीर सभेंत मोठमोठ्या किंमती देऊन विकत घेत. या बेकायदा मिठाला 'गांधी मीठ' ही संज्ञा लोकांनीं दिली होती.

**जंगल सत्याग्रह**

मिठाचा कायदा तोडल्यानंतर लोकांनीं जंगल सत्याग्रह केला. जंगल सत्याग्रहाच्या चळवळीनें पहाडांतले लोक देखील जागृत झाले, शहरांतील स्वयंसेवक नुसत्या खेड्यांत जाऊन न राहतां डोंगराच्या कडी कपाऱ्यांत मिळेल तेथला भाकरी तुकडा खाऊन व्याख्यानें देत हिंडत होते. चळवळीच्या ऐन रंगांत राष्ट्रीय कीर्तनांना, पोवाड्यांना, कवनांना नुसता ऊत आला होता. प्रभात फेऱ्या याच कालांत सर्व देशभर सुरू झाल्या. या फेऱ्यांनीं फार मोठी जागृति केली.

**स्त्रिया रणांगणांत उतरल्या**

या कायदेभंगाच्या काळांत गांधींच्या प्रोत्साहनानें परदेशी कापडाच्या दुकानावर निरोधन, गुत्यासमोर उभे राहून मद्यप्यांना मद्यापासून परावृत्त करणें हीं कामें स्त्रियांनीं हातीं घेतलीं होतीं. मुंबईच्या स्त्रिया एवढेंच करून न राहतां आझाद मैदानावर सरकारी हुकमाचा भंग करून स्वयंसेवकांच्या कवाईतींत दाखल झाल्या होत्या. या वेळीं पोलिसांनीं शेंकडों स्वयं-सेवकांचीं मस्तकें आपल्या दंडुक्यांनीं रक्तबंबाळ करून सोडलीं. या मंडळींत पुष्कळ स्त्रिया होत्या. कु. **सरदेसाई** या नांवाच्या एका तरुण मुलीनें बेशुद्ध

होईपर्यंत आपल्या हातचें राष्ट्रीय निशाण मोडलें नाहीं, हा प्रसंग पाहतांच कवि हर्षभरानें म्हणूं लागले.

**आझाद रणांगण गाजविलें । महिलांनीं पुरुषा लाजविलें**

स्त्रियांच्या मागोमाग लहान लहान तेजस्वी वीरांनीं आपली **वानर सेना** जमवून पोलिसांना आपल्या पराक्रमाची चुणूक ठिकठिकाणीं दाखविली. वानरसेनेचा चळवळ सर्व प्रांतात पसरली होती. या मुलाच्या चळवळींना आळा घालणे पोलिसांना आणि राजनिष्ठ शिक्षकांना अशक्य झालें. सरकारचे तुरुंग सत्याग्रही कैद्यांनीं भरून गेले. मग सरकारला मोठमोठे कँप सत्याग्रहींकरितां उघडावे लागले. या तुरुंगांत सत्याग्रहींचे फार हाल करण्यांत आले. थोड्या अधिकाऱ्यांनी मात्र सत्याग्रहींशी वागतांना आपली माणुसकी आणि सौजन्य सरकारच्या रागाला न जुमानतां गाजवलें.

**गांधी राजबंदी झाले**

देशांत चळवळीचा वणवा पेटलेला पाहून सरकारला वाटले, की हा ज्वालामुखी पुन्हां जागृत झाला आहे. आतां हा काय अनर्थ करील याचा नेम नाहीं म्हणून त्यांनीं गांधींना अटक करण्याचें ठरविलें. ४ मे रोजीं गांधी हिंडत हिंडत **कराडी** या गांवीं आले होते. सायंकाळचा कार्यक्रम आटोपून गांधी आणि त्यांची मंडळी झोपी गेली होती. मध्यरात्रीच्या वेळीं जिल्हाधिकारी आणि पोलिस कमिशनर एक पोलिस तुकडी घेऊन आवाज न करतां गांधींच्या खाटेजवळ आले. बॅटरीचा झोत गांधींच्या तोंडावर पाडून त्यांनीं त्यांना जागे केलें. इतक्यांत एक सेविका येऊन गांधींना म्हणाली 'बापूजी तुम्हांला पकडायला पोलिस आले आहेत असें दिसते.' गांधी म्हणाले, "तर मग मी जाईन त्यांच्याबरोबर. त्यांत काय विशेष आहे? पण तू मजबरोबर येणार कीं नाहीं" अशी थट्टा ते करावयाला त्या प्रसंगींहि चुकले नाहींत

त्यांनी पोलिसाला विचारलें "मला तोंड धुण्यास वेळ द्याल काय?" अगदीं थोडीं मिनिटें त्रोटक उत्तर आले. गांधींनीं तोंड धुण्यास सुरुवात केली. तें काम चालू असतां ते म्हणाले 'कांती माझे कपडे बांध, रबीक मला

दोन उत्तम टकल्या दे बघूं'. शंकर ही माझी शाल व रुमाल अंथरुणांत बांध पाहूं.

सगळा गांव जमा झाला. प्रार्थना झाल्यावर गांधी शांत मुद्रेनें चालत जाऊन पोलिसांच्या मोटार लॉरींत बसले. तेथून त्यांना येरवडयाच्या तुरुंगांत पोंचवण्यांत आलें. या वेळीं सरकारनें त्यांच्यावर खटला केला नाहीं. १८२७ च्या कायद्याप्रमाणें त्यांना राजबंदी म्हणून बेमुदत अटकेंत ठेवलें.

**सप्रू-जयकरांचे हेलपाटे**

गांधींच्या अटकेनंतर सर्व देश चळचळीच्या वणव्यानें पेटला. सरकारला काय करावें हें सुचेना. या वेळीं याच काळांत हुजूर पक्षाचा इंग्लंडमध्यें पराभव होऊन मजूरपक्ष अधिकारावर आला होता. या पक्षाचे पुढारी **मॅकडोनल्डसाहेब** यांची हिंदी स्वातंत्र चळवळीस पहिल्यापासून सहानुभूति होती यामुळें सरकारनें कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांशीं तहाचीं बोलणीं लावण्यास आरंभ केला. **तेजबहादूर सप्रू** आणि बॅ. **मुकुंदराव जयकर** यांनीं मध्यस्थाची भूमिका स्वीकारली होती. प्रथम ते गांधींना भेटले. गांधी म्हणाले, "कॉंग्रेसचे अध्यक्ष नेहरू व त्यांचे वडील मोतीलाल नेहरू यांना विचारल्याशिवाय मी स्वतंत्रपणें कांहीएक करणार नाहीं." मग येरवडयाहून नैनीकडे व मग नैनीहून येरवडयाकडे, पुन्हां व्हाइसरॉयाकडे अशा सप्रू-जयकरांच्या खेपा झाल्या. शेवटीं व्हाइसरॉयांच्या परवानगीनें नेहरू पितापुत्रांची व गांधीची भेट येरवडयाच्या तुरुंगांत घडवून आणण्यांत आली. तीन दिवस खलबतें होऊन शेवटीं कॉंग्रेस श्रेष्ठींनीं सरकारला कळविलें कीं, आमच्या मागण्या खालील-प्रमाणें आहेत. त्या मान्य झाल्या तर आम्ही चळवळ मागें घेतो. या मागण्यांचा इत्यर्थ असा होता कीं 'सरकारनें हिंदुस्थानला पूर्ण स्वराज्य देण्याचें ध्येय मान्य करून भरीव हक्क हिंदी लोकांच्या पदरांत टाकावे. कुठेंहि हात आखडता घेऊं नये' पण या अटी सरकारनें मान्य केल्या नाहींत.

**गोलमेज परिषद**

इंग्रज सरकारची ही नेहमींची रीतच असे कीं, बलवान् पक्षाला

नाखुष करीत असतां इतर पक्षांना संतुष्ट करण्याकरितां कांहीं तरी पोकळ पण आकर्षक देखावा उभा करावयाचा. देशबंधू दास, पंडित मदन मोहन मालवीय वगैरे नेत्यांनीं १९२१ च्या अंतीं व १९२२च्या सुरुवातीस गोल-मेज परिषद बोलावून हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या हक्कासंबंधीं एकदाचा निर्णय घ्यावा अशी मागणी केली होती. त्याची सरकारला १९३० सालीं आठवण होऊन अशी परिषद १९३० सालीं सरकारनें भरविली.

गोलमेजांत प्रमुख अशी जागा ठेवतां येत नाहीं. यामुळें त्याभोंवतीं बसणाऱ्या मंडळींत समता दिसून येते. यावरून देशांतील भिन्न भिन्न पक्षांना एकत्रित बोलावून महत्त्वाच्या प्रश्नाची चर्चा जेव्हां समान पातळीवर उभे राहून जेथें करण्यांत येते त्या परिषदेला गोलमेज परिषद म्हणतात. हिंदुस्थानांतील नेमस्त, हिंदु महासभा, मुस्लिम लीग, दलित फेडरेशन, नेटिव्ह ख्रिश्चन, अँग्लो इंडियन, संस्थानिक अशा लोकांतील कांहीं महत्त्वाचे लोकांस ब्रिटिश सरकारनें इंग्लंडांत बोलाविलें, त्यांचा चांगला पाहुणचार केला, राज-कारणाची, कोणाला काय हवे याची चर्चा करण्यास मोकळीक दिली कॉंग्रे-सनें निमंत्रण झिडकारलें यामुळें या परिषदेंतून कांहींच निघालें नाहीं. व लोक गेले तसे परत आले. कॉंग्रेस जरी हजर राहती तरी यांतून कांहीं निष्पन्न होणार नव्हतें आपण हिंदुस्थानला काय द्यावयाला तयार आहोंत हें न सांगतां बोलावलेल्या पाहुण्यांना आपआपसांत निष्फळ चर्चा करूं द्यावयाची हाच गोलमेज परिषदेचा उद्देश इंग्रजांचा होता. व तो साध्यहि झाला. आज "गोलमेजी भाषण" हा शब्दप्रयोग मराठींत रूढ आहे. त्याचा अर्थ मुद्यावर न येतां लांबलचक अघळपघळ बोलणें असा झाला आहे.

**गांधींजवळ बोलणें करावें लागलें**

संस्थानिक व इतर पक्ष यांना जवळ करून त्यांना महत्त्व देऊन कॉंग्रे-सची उपेक्षा करून सरकारनें पाहिलें. पण कांहीं जमेना. इतर पक्षाचें जनते-वर वजन नव्हतें यामुळें सरकारला कॉंग्रेस श्रेष्ठींना सोडून गांधींजवळ वाटा-घाटी सुरू कराव्या लागल्या.

## पंडित मोतीलाल यांचें निर्याण

याच काळांत मोतीलाल नेहरूंची प्रकृति बिघडून त्यांचे ६ रोजी देहावसान झालें. सबंध हिंदुस्थानानें त्या वेळी एक दिवस सुतक पाळलें. मोतीलालजींच्या मृत्यूमुळें गांधीना किती अपरिमित दुःख झालें, हें त्यांच्या उद्‌गारावरून दिसून येतें. त्यांनीं एके ठिकाणीं लिहिलें आहे, ('पति गेल्यावर हिंदु स्त्रीची जी अवस्था होते तशी माझी आज झाली आहे. विधवेचें दुदव मी आज भोगीत आहे.') यानंतर गांधी आणि व्हाइसरॉय यांच्यामध्यें समेटाची चर्चा दिल्लींत सुरू झाली. ही चर्चा कित्येक दिवस चालली होती. रोज वाटाघाटीचें बोलणें होई. हें वर्किंग कमिटीच्या कानांवर गांधी घालीत आणि व्हाइसरॉय वाटाघाटीचा सारांश ब्रिटिश प्रधान मंडळाला कळवीत होते. शेवटीं बऱ्याच वाटाघाटीनंतर ४ मार्च रोजी रात्रीं २ वाजतां समेटाच्या कागदांवर दोघांच्या सह्या झाल्या. ह्या समेटाच्या अटी कथन करावयाच्या म्हणजे राजकीय किचकट गोष्टींचा इतिहास देण्याजोगें होणार आहे. या तहांत गांधींनीं मिठाचा कायदा बराच सैल करून घेतला. ज्याला स्वतःच्या उपयोगाकरितां मीठ पाहिजे असेल त्याला विनापरवाना मीठ तयार करून घेतां येईल अशी सवलत गांधींनीं मिळविली. ब्रिटिश साम्राज्यसत्तेचा प्रतिनिधि व काँग्रेसचा प्रतिनिधि हे समान भूमिकेवर येऊन **त्यांनीं बरोबरीच्या नात्यानें कागदावर सह्या केल्या.** या गोष्टीला राजकीय दृष्टचा अत्यंत महत्त्व होतें. राष्ट्राच्या वतीनें काँग्रेसच बोलूं शकते ही गोष्ट सरकारनें या वेळीं मान्य केली आणि लोकप्रतिनिधि आणि राजप्रतिनिधि हे सारख्या अधिकारानें बोलू लागण्याची प्रथा यानंतर हिंदुस्थानांत पडली. हा नैतिक विजय गांधींच्या वैयक्तिक प्रभावानेंच मिळाला ही गोष्ट हुजूरपक्षाच्या लोकांच्या मर्माला झोंबली. सरकारनें काँग्रेसला सरळ हातानें अधिक हक्क दिले असते तरी ते त्यांना परवडले असते **पण व्हाइसरॉय आणि गांधी** एक राजप्रतिनिधि आणि एक नंगा फकीर बरोबरीच्या नात्यानें वाटाघाटी करतात ही गोष्ट कित्येक ब्रिटिश मुत्सद्यांना अपमानाची वाटली. पण

गोष्ट होऊन चुकली खरी व त्याचा सूड पुढच्यास वर्षी घेण्यास कमी केले नाहीं.

तहाच्या वाटाघाटीत व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांनी गांधींकडून दुसऱ्या गोलमेज परिषदेला येईन असे अभिवचन घेतलें म्हणून गांधींना तिकडे जाणें भाग पडले.

**कंटाळवाण्या वाटाघाटी**

गांधी व लॉर्ड आयर्विन् यामध्ये जो तह झाला तो एका बाजूनें नोकरशाहीला व दुसऱ्या बाजूनें कॉंग्रेस अनुयायांना मनांतून मान्य नव्हता. दोन्ही बाजूंना तत्कालीन तह पुढची तयारी करण्याकरितां पाहिजे होता. लॉर्ड आयर्विन् आणि गांधी हे मात्र ह्या तहाप्रमाणें तंतोतंत वागण्याची पराकाष्ठा करीत होते. नोकरशाहीनें ठिकठिकाणीं जुलूम जबरदस्ती मोठ्या सूक्ष्म पद्धतीनें चालविली होती. गुजराथमध्यें शेतकऱ्यांबाबत बरेच अन्याय घडत असत. याबद्दल गांधींनीं सरकारकडे वारंवार दाद मागितली पण सरकार त्याकडे लक्ष देईना. शेवटीं गांधींनीं व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांना कळविलें कीं, तहाच्या अटी तुम्ही जर पाळू इच्छित नसाल तर मलाहि कॉंग्रेसतर्फे गोलमेज परिषदेला येतां येणार नाही. गांधींनी म्हणजे कॉंग्रेसचें प्रतिनिधीनें गोलमेज परिषदेला उपस्थित रहावें असा ब्रिटिश सरकारचा आग्रह होता. कारण कॉंग्रेसलाच लोकांची प्रतिनिधि म्हणून जग ओळखत होतें. जर कॉंग्रेसनें आपला प्रतिनिधि गोलमेज परिषदेला पाठविला नाहीं तर या परिषदेला कांहींच किंमत राहणार नाहीं म्हणून गांधींशीं न बिनसूं देण्याचा प्रयत्न नवा व्हाइसरॉय करीत होता, पण त्याबरोबरच आपलें दडपशाहीचें धोरणहि सोडावयास तयार नव्हता. यामुळें गांधी आणि व्हाइसरॉय यांचेमध्यें वाचावयास कंटाळवाणा पण मुत्सद्यांच्या कार्यपद्धति समजून घेण्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा पत्रव्यवहार जो झाला तो अभ्यासू लोकांनीं वाचण्यालायक आहे.

शेवटीं नाहीं होय करितांकरितां सरकारनें थोडी माघार घेऊन गांधींना गोलमेज परिषदेला आग्रहानें पाठविलेंच.

### जहालपक्षाचे विचार

आतां सामान्य लोक, विशेषतः तरुण मंडळी, आणि काँग्रेसमधील जहाल पक्ष यांना गांधी–आयर्विन तह मुळींच आवडला नाहीं. १९३० सालच्या चळवळीमुळें तरुणांना आपलें सामर्थ्य वाढलें आहे असें वाटलें. तह न करिता आपण नोकरशाहीला शह देऊं शकूं असें सुभाषचंद्र बोस आदि तरुणांचें म्हणणे होतें. म्हणून ते गांधींवर तुटून पडत होते. त्यांतच पंजाबचे क्रान्तिवीर भगतसिंग यांचेवर पोलीस अधिकाऱ्यांचा खून केल्याचा आणि विधिमंडळांत बाँब टाकला म्हणून खटला चालला होता. त्यांत भगतसिंग व त्याचे सहकारी यांना फांशीची शिक्षा झाली यामुळें सबंध राष्ट्र दुःखित झालें. तरुण बेभान झाले आणि गांधी हे भगतसिंगांना सोडविण्याची खटपट करीत नाहींत म्हणून त्यांचेवर तुटून पडले. हा तह घडवून आणला म्हणून गांधींचें अभिनंदन करण्याऐवजीं त्यांचा अपमान करण्यास शक्य तर त्यांना दुखापत करण्यास पुष्कळ तरुण तयार झाले होते.

वस्तुस्थिति अशी होती कीं, काँग्रेसची चळवळ १९३० मार्चमध्यें सुरू झाल्यावर ती कांहीं महिने खूप जोरांत चालली. पुष्कळांनीं त्यांत बलिदान करून राष्ट्राची कीर्ति वाढविली यांत संशय नाहीं. पण राष्ट्राचे बरेचसे नेते तुरुंगांत पडल्यावर आणि सरकारचा जुलूम असह्य झाल्यावर जनतेचा उत्साह पहिल्या इतका टिकून राहिला नाहीं आणि पुढेंपुढें ही चळवळ अगदी मंदगतीनें चालत राहिली. ब्रिटिश सरकारलाहि काँग्रेसशी तह करायची घाई होती. नोकरशाहीहि काँग्रेसच्या चळवळींना तोंड देतांदेतां थकली होती. अशा रीतीनें दोन्ही पक्षांनीं आपला आव जाऊं न देतां तह घडवून आणला. तह **होईपर्यंत तहाविषयीं उत्सुक असलेले लोक तहावर सह्या होतांक्षणींच गांधींवर तुटून पडून " गांधींनीं देशाचा घात केला, म्हणून ओरड करण्यास पुढें आले."** असो. राजकारणांत उलटी मेख मारून तमाशा करणारे कसे लोक

असतात आणि पुढाऱ्यांची परिस्थिति कशी बिकट करून सोडतात हें ह्या प्रसंगावरून शिकण्याजोगें आहे. अशा वेळीं न चिडतां आपलें डोकें शान्त ठेवून अविरत काम करीत राहणें हा पुढाऱ्यांचा धर्म असतो. हा धर्म पालन करण्याकरितां जी मानसिक शक्ति लागते ती लहानपणापासून मिळवीत राहिलें पाहिजे. नाहींतर आयते वेळीं पुढाऱ्यांचें मस्तक फिरून राष्ट्र अडचणीत सांपडतें. अशा धर्मसंकटांत आपली अंतःकरणवृत्ती थोर पुरुषाला सांगत असते,

**" मन शुद्ध तुझं गोष्ट हाये पृथ्वी मोलाची**
**तू चाल गड्या पुढति तुला भिती कशाची...... ..**
**रगत निघेल तरीबी हंसल शाबास त्याची**
**तू चाल गड्या पुढती तुला भिती कशाची..."**



## १७. इंग्लंडची निष्फळ यात्रा

आर्यविन आणि गांधी हे पहिल्या भेटीपासून एकमेकासबंधीं आदर बाळगूं लागले होते. आर्यविन एके ठिकाणीं बोलतांना म्हणाले, " मीं गांधींना पहिल्या प्रथम जेव्हां पाहिलें तेव्हां मला त्यांची मूर्ति पावित्र्याचा आदर्श अशी वाटली. दुसऱ्या भेटींत मला त्यांच्या कायद्याच्या सखोल ज्ञानाचा प्रत्यय आला आणि त्याबरोबरच हेंहि दिसून आलें कीं, हा मनुष्य राष्ट्राची वकिली करीत असतांना देखील आपली कळकळ आणि सत्यप्रीति सोडीत नाहीं."

गांधींना देखील आर्यविनच्या उदार स्वभावाबद्दल आदर वाटत होता म्हणूनच ते गोलमेज परिषदेला गेले. परंतु त्यांचें मन त्यांना सांगत होतें की, आपली ही भेट निष्फळ होणार आहे कारण आपल्या राष्ट्रांतील भिन्नभिन्न पक्षांत एकी नाही. गांधींनीं अस्पृश्यांचे पुढारी डॉ. अंबेडकर आणि मुसलमानांचे त्या वेळचे नेते यांच्या गाठीभेटी घेतल्या तेव्हां त्यांना असें दिसून आले कीं, प्रत्येक पक्षाला आपला सवता सुभा करावयास हवा. सबंध हिंदुस्थानच्या हिताचा कोणीच विचार करीत नाहीं. मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघ आणि लोकसंख्येपेक्षां अधिक जागा हव्या होत्या. अस्पृश्यांचें म्हणणें देखील त्याच स्वरूपाचें होते. या दोन पक्षाच्या पावलावर पावलें टाकून ख्रिस्चन आणि ॲंग्लो इंडियन लोकांची मागणी होती. हिंदु सभा म्हणत होती लोकसंख्येच्या प्रमाणांत प्रत्येक जातीला अगर गटाला विधिमंडळांत जागा द्याव्या. न्यायहक्कापेक्षां अधिक असें आम्ही मुसलमानांना कांहीं एक द्यावयास तयार नाहीं" देवाणघेवाण जेथें नाही, उदार बुद्धि कोणीच जेथें दाखवीत नाहीं तेथें एकीचें बळ उत्पन्न कसें व्हायचें आणि हें बळ ज्याच्या पाठीमागें नाही त्यांनी परकीय लोकांजवळ मागणी तरी कोणच्या तोंडानें करावी? असे विचार गांधींना भंडावीत होते पण कर्तव्य म्हणून ते मोठ्या दुःखित अंतःकरणानें इंग्लंडच्या बोटीवर चढले. हिंदुस्थानांतून निघतांना आपल्या सोब-

त्यांना ते म्हणाले कीं, मी कॉंग्रेसचा म्हणजेच कोटयवधि अर्धपोटी राहणाऱ्या जनतेचा प्रतिनिधि म्हणून जात आहे तेव्हां मला त्याच पेशानें इंग्लंडमध्यें राहावें लागेल.

राजपुताना बोटीवर गेल्यावर त्यांच्या सेक्रेटरींना त्यांनी सांगितलें कीं, आपल्याला बोटीच्या थर्ड क्लासमधून ( Deck-Passenger ) जावयाचें आहे. तेव्हां आपण आपली राहणी गरिबीचीच ठेविली पाहिजे. लोकरीचे उंची उंची कपडे आपण वापरतां कामा नये. एवढा मोठा सहा हजार मैलांचा प्रवास गांधींनीं उघड्यावर उघड्या अंगानें राहूनच केला. ठिकठिकाणीं बोट जेथें थांबली तेथें त्यांचा विशेष गौरव झाला. इंग्लंडमध्यें गेल्यावर सरकारनें त्यांना विशेष गौरवानें वागविलें. त्यांची गाडी लंडन शहरांतून जात येत असतां रहदारी तेवढ्यापुरती बंद करण्यांत येत असे. हा मान फक्त इंग्रज सम्राटालाच आजपर्यंत मिळत होता. गांधींना कोणी वेड्यापिशानें दुखापत करूं नये म्हणून त्यांच्या संरक्षणासाठीं दोन उंचेपुरे असे मजबूत बांध्याचे आणि सदा दक्ष राहणारे असे शिपाई दिले होते.

इंग्रज सरकारनें गांधींना श्रीमंत लोक जेथें उतरतात अशा वैभवशाली हॉटेलमध्यें उतरण्याची व्यवस्था केली होती पण गांधी मनांत म्हणाले,

**" उंच उंच माड्या नाहीं कामाच्या, साधूची झोपडी बरी ।"**

गांधी हे लंडनमधील अगदीं गरीब वस्तींत लोकसेवा करणाऱ्या मिस म्यूरेल लेस्टर या बाईंच्या संस्थेंत उतरले. या संस्थेचें नांव किंग्ज ले हॉल असें होतें. ह्या बाईला गांधींच्या कार्याविषयीं फार आस्था वाटत असे आणि तिनेंच गांधींना आपल्या संस्थेंत उतरण्याविषयीं आग्रह केला होता. गांधींनीं आपला पोषाख म्हणजे कटिवस्त्र, पायांत वहाणा आणि अंगावर शाल असा लंडनच्या कडाक्याच्या थंडींतहि ठेवला होता. पहांटेची प्रार्थना, सकाळ संध्याकाळ फिरणें यांत त्यांनीं कांहीं एक फरक केला नाहीं. ज्या संस्थेंत ते उतरले होते तेथील मुलें त्यांच्या भोंवतीं जमून खेळत बागडत असत. ' गांधी काका ' ( Uncle Gandhi ) या नांवानें तीं त्यांना

हाका मारीत असत. गांधींची आणि त्या मुलांची मोठी मैत्री जमून गेली होती आणि गांधींना ब्रिटिश कावेबाज मुत्सद्यांशीं बोलण्यापेक्षां मुलांशीं बोलण्यांत अधिक स्वारस्य वाटत होतें. लंडनमध्यें ते साधारण २ महिने राहिले. तेवढ्या मुदतींत त्यांनीं अनेक संस्थांस भेटी दिल्या. सुप्रसिद्ध मुत्स-द्यांच्या गांठी घेतल्या. त्यांच्याकडेहि पुष्कळ सार्वजनिक कार्यकर्ते आणि वर्तमानपत्राचे वार्ताहर येत जात असत. गोलमेज परिषदेच्या बैठकीत त्यांना अध्यक्षाच्या जवळ जागा देण्यांत आली होती. त्यांनी मुख्य परिषदेंत आणि उपसमित्यांत पुष्कळ भाग घेतला. गांधींची भाषणें फार उदात्त विचारांचीं, शुद्ध भावनांनी आणि तितकीच व्यवहाराला धरून अशी झाली. **महादेवभाई देसाई** यांनीं गांधींच्या या काळांतल्या भाषणाचें The Nation's Voice या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. तें जितके उद्‌बोधक तितकेंच मनोरंजकहि आहे. अभ्यासू विद्यार्थ्यांनीं तें वाचल्याशिवाय राहूं नये.

**मुख्य मुद्याला बगल**

ज्यांतून थोडादेखील अर्थ निघत नाहीं अशी कंटाळवाणी भाषणें आणि चर्चा करण्यांत ब्रिटिश मुत्सद्दी मोठे प्रवीण आहेत. जें काम महिना पंधरा दिवसांत व्हावयाचें त्याला त्यांनी चार चार वर्षे लावली. तीच तीच चर्चा तेच तेच मुद्दे पुन्हां पुन्हां उगाळून प्रतिनिधीला कंटाळा आणावयाचा आणि तो दमला भागला म्हणजे आपला डाव साधावयाचा ही इंग्रजांची रीत गांधींनीं ओळखिली. त्यांनीं ब्रिटिश मुत्सद्यांना सांगून टाकलें कीं, तुमच्या मनांतून आम्हांला काय द्यायचें आहे तें एकदां सांगून टाका म्हणजे त्यांवर आम्ही हिंदी लोक विचार करतों, आणि आमचा निर्णय तुम्हांला कळवितों. इंग्रज मुत्सद्दी म्हणत, तुमच्यांत दुही आहे, तुम्ही एकी करा आणि मग आपण अधिकार देण्याची चर्चा करूं. जी गोष्ट, जे मतभेद हिंदुस्थानांत निरनिराळ्या पक्षांत होते त्याचें प्रदर्शन या गोलमेज परिषदेंत पुन्हां झालें. आणि हिंदुस्थानानें आपलें हंसें करून घेतलें. शेवटीं ब्रिटिश प्रधान मॅग्डोनल्ड यांच्याकडे निरनिराळ्या जातींना राजकारणांत कोणत्या

प्रमाणांत जागा द्यावयाच्या हें ठरविण्याचा अधिकार देण्यांत आला आणि हिंदुस्थानची स्वराज्यघटना तयार करण्याचें काम तिसऱ्या गोलमेज परिषदेवर सोंपवून हिंदी पुढारी जसे गेले तसे परत आले.

**बादशाहाची भेट**

हिंदी पुढारी बादशाहाच्या निमंत्रणावरून लंडनला गेले होते तेव्हां खुद्द बादशाहाची व लोकांची भेट ५ नोव्हेंबर १९३१ रोजी व्हावी असें ठरलें. बादशाहाच्या भेटीस जाणें म्हणजे विशिष्ट पोषाखच घालावा लागतो. गांधी तर कटिवस्त्रधारी. तेव्हां त्यांना निमंत्रण द्यावें कां न द्यावें हा प्रश्न प्रधानमंडळापुढें पडला होता. द्यावें तर कटिवस्त्रानें राजापुढें गांधींना नेलें पाहिजे होतें. तसें नेलें तर राजाचा अपमान होतो. जर न न्यावें तर पाहुण्याला यजमानानें न भेटणें हा शिष्टाचार नव्हे. शेवटीं गांधींना भेटीचें बोलावणे बादशाहांकडून आलें व गांधी कटिवस्त्रानेंच राजवाड्यांत गेले. इंग्लंडच्या इतिहासात हा पहिला प्रसंग. असो. या भेटीची ४०० लोकांना निमंत्रणें होतीं. बहुतेक युरोपियन पोषाखांत गेले होते. अभिवादनाचा कार्यक्रम संपल्यावर हैद्राबादचे प्रधान, नंतर म्हैसूर बडोदा येथील मंत्री यांच्याशी चार शब्द बोलल्यावर गांधींची पाळी आली. दोघांचें संभाषण उभ्याउभ्यानेंच सात मिनिटें झालें. या वेळात बादशाहा बोलत होते. गांधी त्यांचे भाषण स्मितपूर्वक ऐकून घेत होते. बादशाहा म्हणाले,

"मी तुम्हाला चांगले ओळखतों. युवराज असतांना मी एकदां द. आफ्रिकेंत गेलों होतो त्या वेळी तुम्ही हिंदी लोकांतर्फे मला मानपत्र दिलें होतें. झुलु लढाईत व पहिल्या महायुद्धांत आपण आम्हांला चांगली मदत दिलीत पण पुढें आपण सत्याग्रह सुरू केला. देशांत राज्यव्यवस्था सुरळीत राखण्याकरितां सरकारला शासन करावेच लागते." यावर गांधी म्हणाले, "या विषयावर चर्चा करण्याकरितां आपल्याजवळ वेळ नाहीं व मला अप्रस्तुत चर्चा कर्तव्य नाहीं." अशा तऱ्हेनें चर्चा थांबविण्याचा गांधींनीं प्रयत्न केला तरीहि बादशाहा बोलतच राहिले, "बंगालमध्यें लोक बाँब फेकतात हें

चागलें काय ? यापासून कांही फायदा होणार नाहीं." यावर गांधी म्हणाले, "अत्याचार थांबविण्याचा मी माझ्याकडून खूप प्रयत्न करीत आहें." शेवटीं बादशाहा म्हणाले, "आपल्याला मुलें फार अवडतात हें खरें आहे काय?" गांधी म्हणाले, "यांत काय संशय? मी तर मुलांतच आज काल राहात आहें." एवढें संभाषण होऊन ही ऐतिहासिक मुलाखत संपली.

**दुर्दिन**

गांधींची पाठ हिंदुस्थानकडे वळल्याबरोबर ब्रिटिश नोकरशाहीनें येथें जुलमी वटहुकूम एका मागून एक काढून सरहद्द, संयुक्त प्रांत, बंगाल या प्रांतांत जुलमांचा वरवंटा फिरविण्यास सुरुवात केली. पंजाब प्रकरणाप्रमाणेंच ही परिस्थिति नोकरशाहीनें पुन्हां उत्पन्न केली. हिंदी चळवळ नेस्तनाबूत करण्याचा नोकरशाहीचा डाव होता. दुर्दैवानें प्रतिगामी हुजूरपक्ष इंग्लंडमध्यें पुन्हां निवडून आला. यामुळें नोकरशाहीचें चांगलेंच फावलें. कॉंग्रेसचे पुढारी भराभर पकडले जाऊन तुरुंगांत पडले. पंडित जवाहरलालचा बळीहि नोकरशाहीनें घेतला. मग काय कॉंग्रेसच्या अंगाची लाही झाली. याच वेळीं गांधी हिंदुस्थानांत आले ते बोटीवरून उतरले. त्या वेळीं जवाहरलालच्या अटकेमुळें दुःखाची छाया हिंदराष्ट्रावर पसरली होती, गांधींच्या मनांत सरकारशीं त्या वेळीं युद्ध करावयाचें नव्हतें. आपली संघटना मजबूत करावयाची योजना त्यांनीं केली होती परंतु नोकरशाहीनें त्यांना युद्ध पुकारल्याशिवाय गत्यंतर ठेवलें नाहीं. कॉंग्रेसनें पुनश्च युद्ध सुरू करण्याचा ठराव केला. गांधींनीं युद्ध पुकारण्याच्या पूर्वी व्हाइसरॉयची गांठ घेण्याचा प्रयत्न केला पण त्याला यश आलें नाहीं आणि गांधींना सरकारनें पूर्वीप्रमाणेंच वटहुकुमाखालीं अटकेंत ठेवलें. गांधींच्या बरोबर महादेवभाई देसाई व वल्लभभाई यांना विनाचौकशी अटक झाली. त्यांतल्या त्यांत सरकारनें एवढी गोष्ट केली कीं गांधींजवळ महादेवभाईना ठेवून दिलें. त्यामुळें गांधींची विशेष सोय होऊं शकली. कॉंग्रेसच्या इतर पुढाऱ्यांना लहानमोठ्या शिक्षा दिल्या. नवे भारतमंत्री सॅम्युअल यांची प्रतिज्ञा होती कीं, कॉंग्रेसची चळवळ १५ दिवसांत दडपून टाकतों

पण भयंकर कायदे करूनहि दोन वर्षांच्या काळांत किती तरी घडामोडी झाल्या आणि त्या सर्व गांधींच्या संबंधांत घडल्या.

## जातीय निर्णय

गांधी १९३२च्या जानेवारींत अटकेंत पडल्यावर सरकारनें जातीय निर्णय सप्टेंबर महिन्यांत प्रसिद्ध केला. ह्या निर्णयांत मुसलमान, अँग्लो इंडियन, इंग्रज व अस्पृश्य यांना त्यांच्या लोकसंख्येच्या मानानें अधिक जागा व स्वतंत्र मतदार संघ देण्यांत आले. सवर्ण हिंदूंची सर्वथैव उपेक्षा करण्यांत आली यामुळें हिंदु निराश झाले. गांधींनीं हा निर्णय जेव्हां वाचला तेव्हां त्यांच्या अंगाची आग आग झाली. ते म्हणाले, " अस्पृश्यांना जास्त जागा मिळाल्या याचें मला दुःख नाहीं परंतु त्यांना विभक्त मतदार संघ देऊन सरकारनें त्यांना हिंदूंपासून कायमचें फोडलें. अस्पृश्य समाज हा हिंदुसमाजापासून वेगळा समाज आहे असें आतां मानण्यांत येऊन त्या समाजाला हिंदु समाजांत सामील करून घेण्याला आतां या निर्णयानें जागाच राहिली नाहीं. ही गोष्ट घडतां कामा नये काय वाटेल तें करून अस्पृश्यांना हिंदु जातींत ठेवून त्यांची अस्पृश्यता हिंदूंनीं घालविली पाहिजे. ब्रिटिश मुख्य प्रधानांनी जातीय निर्णय ज्या पत्रांत प्रसिद्ध केला त्यांत असें म्हटलें होतें कीं, जर एखाद्या ज्ञातीनें आपले हक्क जर आपण होऊन सोडून दिले तर त्यास आमची हरकत नाहीं. ह्या लहानशा कलमाचा आधार गांधींनीं घेऊन प्राणांतिक उपोषण जाहीर करून अधिकाऱ्यांस कळविलें कीं, हिंदूंनीं अस्पृश्यांची समजूत काढावी. त्यांना अधिक जागा द्याव्यात आणि त्यांना म्हणावें तुम्ही स्वतंत्र मतदार संघाची मागणी करून आमच्यापासून दूर जाऊं नका."

## हिंदुस्थान हादरला

गांधींनीं प्राणांतिक उपोषण जाहीर करतांच सर्व हिंदुस्थान हादरला गेला. जे लोक बाहेर होते ते येरवड्याला जमा झाले. सरकारनें या लोकांना गांधींशीं वाटाघाटी करण्यास परवानगी दिली. मग काय गांधींकडे पुढाऱ्यांची रीघ लागली. डॉ. आंबेडकरांची समजूत पुष्कळ वाटाघाटीनंतर करण्यांत आली.

सरकारनें दिल्या होत्या त्यापेक्षां किती तरी अधिक जागा सवर्ण हिंदूंनीं आपल्यांतल्या कमी करून अस्पृश्यांना द्यावयाची तयारी दाखविली होती. त्या वेळेला डॉ. बाबा आंबेडकर यांनीं स्वतंत्र मतदार संघाचा हक्क सोडून देण्याची मान्यता दर्शविली. सवर्ण हिंदु आणि अस्पृश्य यांनीं एकमतानें निर्णय जो घेतला तो ब्रिटिश सरकारनें मान्य केला आणि मग गांधींचें उपोषण सुटलें :

**वचनाची पूर्तता**

ह्या वाटाघाटी चालू असतां सवर्ण हिंदूंतर्फे अस्पृश्यांना असें वचन देण्यांत आलें होतें कीं, अस्पृश्यता घालविण्याचा आम्ही विश्वप्रयत्न करूं. सरकारनें गांधीच्या विनंतीवरून अस्पृश्यता निवारण करण्याची चळवळ तुरुंगांत बसून करण्याची गांधींना परवानगी देण्यांत आली. पण गांधींनीं अस्पृश्यांना यापुढें अस्पृश्य न म्हणतां हरिजन म्हणावें असें सुचविलें व त्यांच्या सेवेला पुन्हां जें वर्तमानपत्र काढले त्याचें नांव हरिजन असें ठेवलें. निरनिराळ्या कार्यकर्त्यांशीं अस्पृश्यता निवारण्याच्या बाबतीत वाटाघाटी चालू केल्या आणि लोकांचें चित्त हरिजन चळवळीवर केंद्रित केलें. या काळांत येरवड्याचा लाल दरवाजा कांहीं दिवस सत्र लोकांकरितां थोडे तास उघडा ठेवण्यांत येत असे. येरवड्यांतील गांधींच्या स्थानाला यात्रेचें स्वरूप आलें होतें. इंग्रजांनीं नाहो म्हटलें तरी गांधींची मोहिनी पडे. मग ते गांधींना विलक्षण सवलती द्यायला तयार होत. सरकारची बुद्धिच या वेळीं थोडी बावचळली आणि तुरुंगाचे दरवाजे त्यांनीं सताड उघडे केले आणि एका कैद्याला देवाच्या स्थानावर नेऊन ठेवलें. असो. गांधीच्या आयुष्यांत जे चमत्कार घडले त्यांत तुरुंगाचें देऊळ झालें, कैद्यांचा देव झाला आणि राजद्रोही जनता यात्रेकरू बनली, या गोष्टींचा समावेश होऊ शकतो.

कांहीं काळानंतर सरकारनें गांधींना सोडून दिलें. सुटका झाल्यानंतर त्यांनीं हरिजन चळवळीस स्वतःला वाहून घेऊन हिंदुस्थानभर दौरा काढला, मोठा फंड जमविला आणि 'हरिजन सेवक संघ' या नांवाची हरिजनांची सेवा करणारी संस्था स्थापन केली होती तिला चालना दिली.

## १८. म० गांधींची काँग्रेसमधून निवृत्ति

### चळवळ स्थगित

१९३३ सालापासूनच कायदेभंगाची चळवळ मागें घ्यावी असें पुष्कळ कार्यकर्त्यांना वाटत होतें. परंतु ही जबाबदारी घ्यावयास कोणीहि तयार होईना. शेवटीं बाहेर असलेल्या काँग्रेस कार्यकर्त्यांची सभा झाली. तेथें कायदेभंग चालूं ठेवावा असा निर्णय झाला. तो होण्याचें कारण पं. मदन-मोहन मालवीय याचे अलौकिक वक्तृत्वाचा प्रभाव सभागृहावर पडला. पं. मदनमोहन मालवीयांनी भावनाप्रधान भाषण करून सांगितलें कीं, " कायदेभंग मागे घ्यावयाचा नाहीं. हा लढा लढविण्याकरितां मी स्वतः ३०००० स्वयंसेवक घेऊन येतों. " पण पुढें गमतीची गोष्ट अशी कीं, मालवीयजी स्वतःहि आले नाहींत आणि एकहि स्वयंसेवक पाठविला नाहीं. यामुळें काँग्रेस नेत्यांच्या सभेचा ठराव तसाच बारगळला. काँग्रेसचे तात्पुरते अध्यक्ष श्री. लोकनायक अणे हेहि चळवळ मागें घेण्याचा निर्णय आपल्या जबाबदारीवर घेत ना. शेवटीं गांधींनींच जेव्हां हा निर्णय घेतला तेव्हां देशांत पुनरपि शान्तता पसरून हळूहळू तुरुंगांतील काँग्रेसजन बाहेर येऊं लागले. चळवळ मागें घेतल्यावर सरकारनें काँग्रेसला पुनः कायदेशीर समितीचें स्वरूप दिलें आणि कॉंग्रेसच्या इमारती कॉंग्रेसच्या स्वाधीन केल्या. चळवळ मागें घेतांना गांधींनी लिहिलें होतें कीं, व्यापक चळवळ स्थगित केली असली तरी व्यक्तीचा सत्याग्रहाचा हक्क सदैव चालूच राहील.

### अनुयायांना स्वातंत्र्य

१९३४ अखेर मुंबईला काँग्रेस भरली. याच वेळीं काँग्रेसमध्यें तरुण सोशॅलिस्ट लोकांचा एक गट निर्माण झाला. गांधींनीं असें पाहिलें कीं, आपलें धोरण, तत्त्व आणि कार्यक्रम यांवर पुष्कळ काँग्रेस कार्यकर्त्यांचा विशषतः वर्किंग कमिटींतील प्रभावी लोकांचा पाहिजे तेवढा विश्वास नाहीं

आपल्या वजनामुळें आणि वैयक्तिक स्नेहसंबंधामुळें हे लोक आपल्या म्हणण्या-प्रमाणें काँग्रेसचे ठराव करतात परंतु त्याचा अंमल करतांना त्यांचें मन त्यांच्यांत नसतें. यामुळें माझा कार्यक्रम तितका प्रभावी होत नाहीं. पुढाऱ्यानें अनुयायांवर अनिष्ट दडपण आणणें योग्य नाहीं. त्यांना अनुभव येऊन जेव्हा ते माझा कार्यक्रम स्वीकारतील तेव्हांच त्याला यश येईल. म्हणून आपण काँग्रेसमधून म्हणजे अधिकारपदावरून दूर जावें. असा विचार करून गांधींनी प्रथम वर्किंग कमिटीला आणि नंतर ऑल इंडिया काँग्रेस कमिटीला आपला निर्णय कळविला कीं, मी आतां काँग्रेसमधून अलग होतों आहें. साधा काँग्रेसच्या ४ आण्यांचा सभासद सुद्धां मी राहणार नाहीं. कारण या चार आणे सभासदाला मत असतें आणि मी मत जिकडे टाकीन तिकडे हजारों लोक अंधश्रद्धेनें मत देण्याचा संभव आहे म्हणून मी काँग्रेसमधून अलग होतो. तुम्ही आतां तुमच्या सदसद्विवेक बुद्धीप्रमाणें तुमची तर्कशक्ति जो मार्ग दाखवील त्याप्रमाणें तुम्ही देशाची, काँग्रेसची सेवा करा. मीं काँग्रेस सोडली तरी काँग्रेसचा हितचिंतक आणि सेवक म्हणून मी राहणारच आहे. तुम्ही ज्या वेळीं आपण होऊन माझा सल्ला विचाराल त्या वेळेला मी सल्ला देण्या-पुरता तुमच्यांत येईन.

गांधींचें हें निवेदन काँग्रेसनेत्यांना मनापासून आवडलें नाहीं. गांधी रागावून संतापून बोलत नव्हते. यामुळें तर वर्किंग कमिटीच्या सभासदांचें दुःख अतिशय वाढलें. ज्याच्या पराक्रमामुळें आज काँग्रेसला असे अलौकिक लढे लढतां आले, ज्यानें राष्ट्राला अतिशय उंच पातळीवर नेऊन ठेवलें तो आप-ल्यांतून दूर जाणार ही कल्पनाच पुष्कळांना असह्य झाली. पण गांधींनीं जो निर्णय घेतला तो विचारपूर्वक घेतला होता आणि कोणच्याहि तात्कालिक भावनला वश न होता ते काँग्रेसपासून शेवटीं दूर झाले. ते दूर झाले पण तितकेच अधिक जवळहि राहिले. असे विरोधाभासाचे प्रसंग गांधींच्या आयुष्यांत आपणास अनेक सांपडतील. असो.

**काँग्रेसचा अधिकारयोग**

नाहीं नाहीं म्हणतां म्हणतां पुष्कळ आढेवेढे घेऊन सरकारनें हिंदी लोकांना प्रान्तिक स्वराज्याचे हक्क १९३६ सालीं दिले. हे हक्क देतांना सरकारनें थोडासा हातचा राखून ठेवला होता. परंतु मतदानाचा हक्क मात्र सढळ हातानें दिला यांत संशय नाहीं. १९३५ च्या स्वराज्याच्या कायद्या-प्रमाणें जवळजवळ ३ कोटी लोकांना मतदानाचा हक्क प्राप्त होत होता ह्या निवडणुकी लढवावयाचा निर्णय काँग्रेसनें घेतला पण त्याचबरोबर अधिकार स्वीकारावयाचा नाहीं असें मत प्रदर्शित केलें गांधींनी निवडणुकी लढविण्यास आपली संमति दिली. ते म्हणाले, अधिकार घ्या किंवा न घ्या तुम्हीं ज्या अर्थी कायदेमंडळाकडे वळत आहांत त्या अर्थी या तीन कोटी लोकांकडे जाऊन काँग्रेसचा संदेश निवडणुकीच्या निमित्तानें तुम्हाला नेता येईल. गांधींची संमती मिळतांच काँग्रेसमधील सर्व लोक एक झाले आणि त्यांनीं निवडणुकीची वादळी मोहीम सुरू करून निवडणुकी बहुतेक सर्व प्रांतांतून जिंकल्या. मुसलमान आणि अस्पृश्य मात्र काँग्रेसपासून अलग राहिले. निवडणुकी जिंकल्यावर प्रश्न असा उत्पन्न झाला कीं, एवढे प्रचंड बहुमत आपल्याला मिळालें असतां आपण अधिकारसूत्रे कां घेऊं नयेत? अधिकारसूत्रें घ्यावी किंवा न घ्यावी याबद्दल बरीच चर्चा झाली. शेवटी गांधींना सल्ला विचारण्यांत आला.

**दूरदर्शी सल्ला**

गांधीनीं काँग्रेसनेत्यांना सांगितले कीं, अधिकार स्वीकारावा असें तुमच्यापैकीं पुष्कळांना वाटत आहे. पण तुम्हांला अधिकारसूत्रें घ्यावयाची असतील तर तुम्ही एक गोष्ट सरकारकडून मान्य करून घ्या नाहीं तर अधिकार स्वीकारल्यावर तुम्हांला आढळून येईल कीं, सरकारने देऊ केलेली सत्ता ही खरी सत्ता नसून फक्त **खऱ्या सत्तेची ती छाया आहे.**

**गव्हर्नरच्या अधिकारावर नियंत्रण**

१९३५ चा कायदा तयार करतांना ब्रिटिश राज्यघटनेचा आदर्श

ब्रिटिश मंत्रिमंडळापुढें होता. ब्रिटिश राज्यघटनेप्रमाणें राजा हा सर्वाधिकारी आहे. त्याला वाटेल त्या गोष्टी करितां येतात. लढाई करणें अगर सुरू असलेली लढाई बंद करणें, पार्लमेंट बरखास्त करणें किंवा सुरू करणें, मंत्री नेमणें किंवा काढून टाकणें अशासारखे मोठाले अधिकार राजाला आहेत. पण व्यवहारांत राजा हा मंत्रिमंडळाच्या सल्ल्याबाहेर मुळींच जात नाहीं. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील प्रान्तिक गव्हर्नरनें आपल्या हातांत सर्व सत्ता असून देखील लोकप्रिय मंत्र्यांच्या सल्ल्याबाहेर जाऊन आपले विशेष अधिकार सहसा गाजवूं नयेत अशी योजना या कायद्यांत होती. पण गव्हर्नरनें सहसा मंत्र्यांच्या सल्ल्याबाहेर जाऊं नये, हे शब्द अतिव्यापक म्हणून फसवे होते. इंग्लिश राजास परंपरेला धरून वागण्याची संवय होती. पण येथील गव्हर्नर हा एका तऱ्हेनें परवांपर्यंत हुकूमशाहा होता. त्याला जर स्पष्ट शब्दांत गुंतवून घेतलें नाहीं, तर तो कांहीं तरी कारणें काढून मंत्र्यांच्या कामांत अडथळा आंणल्याशिवाय राहणार नाहीं. १९१९ सालच्या कायद्याप्रमाणें विधिमंडळांत जे दिवाण नेमले होते त्यांच्या कामांत गव्हर्नर नेहमीं लुडबुड करून त्यांना निष्प्रभ करून टाकीत होता तोच प्रकार पुन्हा आजहि होण्याचा संभव आहे म्हणून सरकारकडून अशी हमी घ्या कीं, गव्हर्नर्स हे त्यांना दिलेल्या विशेष सत्तेचा उपयोग नित्याच्या राजकारभारांत करणार नाहींत. ह्याचा अर्थ असा होतो को, राष्ट्रांत मोठें बंड झालें, राज्यघटना उलथून पडण्याचा प्रसंग आला तरच गव्हर्नरनें राज्यकारभारांत पडावें आणि सत्ता गाजवावी. दैनंदिन राज्यकारभारांत मंत्र्यांचीच इच्छा प्रभावी ठरावी.

सरकार ही हमी घ्यावयास प्रथम तयार नव्हतें, त्यांनीं ३–४ महिने दुसऱ्याच पक्षाचें मंत्रिमंडळ स्थापून पाहिलें. पण प्रचंड बहुमत कांग्रेसचें होते. तेव्हां तें मंत्रिमंडळ क्षणभरहि चाललें नाहीं. शेवटीं आढेवेढे घेऊन सरकारनें ही हमी कांग्रेसला दिली. त्यामुळें सरकारचा मार्ग निष्कंटक झाला. नाहीं तर प्रांतिक सरकारचे अधिकार मंत्र्याला पूर्णत्वानें वापरतांच आले नसते.

हा सल्ला वर्किंग कमिटीनें विचारला म्हणून गांधीनीं दिला. प्रत्येक

सभेच्या वेळीं गांधींना अध्यक्षाचें निमंत्रण जाई. मग ते सभेला येत. विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देत व आल्यापावलीं परत जात. गांधींचा सल्ला मिळावा म्हणून पुष्कळदां गांधी जेथें वसत तेथें वर्किंग कमिटी भरत असे. यामुळें गांधींचे प्रतिपक्षी म्हणत हा म्हातारा कॉंग्रेसमधून दूर जातो म्हणतो पण शेवटीं कॉंग्रेसला कांहीं सोडीत नाही. वस्तुस्थिति अशीच होती. गांधींना आपले प्रयोग कॉंग्रेसच्या मार्फतच करावयाचे होते. म्हणून ते कॉंग्रेसला सोडावयास तयार नव्हते. मात्र त्यांना आपलें वजन कॉंग्रेसवर आणावयास नको होतें.

**ग्रामोद्योगास चालना**

१९३४ ते ४० या कालखंडांत गांधींनीं दोन नवीन विधायक कार्यक्रम राष्ट्रापुढें ठेवले. '**पक्षी घेतसे गगन। पिलापाशीं त्याचें मन ॥** या उक्तीप्रमाणें गांधी हे राजकारणाच्या अफाट गगनांत मंडलावर मंडले घेत हिंडत आहेत असें दृश्य आपण ज्या वेळीं पाहतों त्या क्षणीच त्यांचें मन विधायक कार्यक्रमांत गुंतलेलें आपणांस आढळून येतें. सत्याग्रही लढा हा **विधायक कार्यक्रमाच्या भक्कम पायावरच यशस्वी होतो**. ती गोष्ट गांधी कंठरवानें राष्ट्राला सांगत होते पण कॉंग्रेसचें लक्ष लढे किंवा निवडणुकी यांतच अधिक रमे. गांधींनीं विधायक कार्यक्रमाचा ठराव मांडला कीं त्याच्या भीडमुर्वतीस्तव तो पास होत असे. गांधीचें तें एक फॅड आहे, ती एक लहर आहे, असेच **हुशार** लोक समजत. १९३४ च्या कॉंग्रेसमध्यें गांधींनीं "**ग्रामोद्योग**" संघ या नांवाची संस्था सुरू करण्याचा ठराव कॉंग्रेसपुढें मांडला. या संस्थेचें संचालकत्व श्री. **कुमाराप्पा** या थोर अर्थशास्त्रज्ञाकडे देण्यांत आलें. या ठरावावर बोलतांना गांधी म्हणाले कीं, " आपण आतांपर्यंत एकाच ग्रामोद्योगावर म्हणजे खादीवर लक्ष केंद्रित केलें होतें. अनेक वर्षे विचार केल्यावर मला असें आढळून आलें कीं, खेड्यांतील खादीचाच तेवढा धंदा मेला आहे असें नाहीं. तांदूळ सडण्याचाहि धंदा खेड्यांतला आज नाहींसा झाला आहे. तांदूळ सडावयाच्या गिरण्या उत्पन्न झाल्यामुळें खेड्यांतील लोकांना काम

मिळत नाहीं म्हणून त्यांना शहरांत येऊन राहावें लागतें. गिरण्यांमध्यें तांदूळ पांढरा स्वच्छ करण्यांत येतो खरा. पण त्याबरोबर तांदुळावरचें बलवर्धक द्रव्य निघून जातें. आणि यामुळें तांदूळ खाल्ल्यापासून जी शक्ति मिळावयास पाहिजे ती मिळत नाहीं. म्हणून खेड्यांमध्यें पुन: हातसडीचा धंदा सुरू करावा आणि लोकांनी तो वापरून आपलें बलसंवर्धन करून घ्यावें. आपलें म्हणणें शास्त्रशुद्ध आहे, गिरणीतील तांदूळ नि:सत्त्व असतो हें त्यांनी शास्त्रज्ञांचे ग्रंथांतील उतारे देऊन सिद्ध केलें. खेड्यांमध्यें हातकागदाचाहि धंदा सुरू करतां येण्याजोगा आहे. तिसरी गोष्ट, हल्लीं गिरण्यांतून तेल गाळलें जातें त्याऐवजीं खेड्यांत जर तें ग्रामतेल्यांकडून घाण्यांत गाळून घेतलें तर तें अधिक शुद्ध मिळेल आणि गावांतील तेल्यांचा धंदा ऊर्जितावस्थेंत येईल. मधमाशा पाळून मध जमविण्याचा उद्योग खेड्यांत होऊं शकेल. हे धंदे आधुनिक शास्त्रीय पद्धतीनें चालू व्हावे म्हणून एक चांगली प्रयोगशाळा सुरू करण्याचाहि विचार गांधींनीं आपल्या ठरावांत मांडला. ह्या कार्याकरितां त्यांनी मोठ्या फंडाची अपेक्षा ठेवली नाहीं. ते म्हणत, आपण एक वर्ध्याला प्रयोगशाळा काढून तेथें लोकांना ग्रामोद्योगाचें शिक्षण देऊं आणि नंतर ही शिक्षण घेतलेली मंडळी आपापल्या गांवीं जाऊन स्वतंत्र धंदा करूं शकतील. ग्रामोद्योग संस्था फक्त मार्गदर्शन करील. ही संस्था चालविण्याची जबाबदारी कॉंग्रेसवर पडणार नाहीं. फक्त कॉंग्रेसनें या संस्थेस नेहमीं उत्तेजन द्यावें व कॉंग्रेसजनांनीं ग्रामोद्योगाच्या वस्तू वापरण्यावर कटाक्ष ठेवावा."

**ग्रामोद्योगी वस्तूंचें कायम प्रदर्शन**

हा ठराव पास झाल्यावर वर्ध्याला ग्रामोद्योगाची प्रयोगशाळा सुरू झाली. शेठ जमनालाल बजाज यांनीं आपली एक मोठी सुंदर बाग या कार्याला दिली. गांधींचा सत्याग्रहाश्रम ज्यांच्या निरलस वृत्तीमुळें आणि संघटनाचातुर्यामुळें चालला त्या कै. मदनलालचें नांव या बागेस यापुढें देण्यांत आलें. हल्लीं या मदनवाडींत ग्रामोद्योगाचीं अनेकविध कार्यें चाललीं आहेत

तेथें एक मोठें प्रदर्शनहि कायमचें मांडण्यांत आलेलें आहे. ह्या प्रदर्शनांत ग्रामोद्योग हा कोणच्या कोणच्या अवस्थेंतून गेला ती अवस्था दाखविणारा माल तेथें व्यवस्थित मांडलेला आहे. या ग्रामोद्योग संस्थेचे संचालक कुमारप्पा हे एक महान् बुद्धिमान् आणि तितकेच विद्वान् आहेत. त्यांनीं पाश्चात्य विश्वविद्यालयाच्या अनेक पदव्या मिळविल्या आहेत. ते पूर्वी मोठ्या सरकारी हुद्यावर होते. पण ती मोठ्या पगाराची नोकरी सोडून आज पोटापुरतें घेऊन ग्रामोद्योग संस्थेचें संचालन करीत असतात. धंद्यांत ते जितके वाकबगार तितकेच फर्डे लेखकहि आहेत. त्यांनीं अनेक पुस्तकें तर्कशुद्ध भाषेंत लिहिली असल्यामुळें तीं वाचणाऱ्यांच्या मनांत ग्रामोद्योगाची आस्था उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीं. आजकाल ग्रामोद्योगाचा हातकागद इतका सुंदर निघतो कीं, हा हातकागद आहे कां? याचा संशयच पडतो. असो.

## मूलोद्योग शिक्षणपद्धति

आफ्रिकेमध्यें आश्रम काढल्यापासून गांधींना वेळ सांपडे त्या वेळीं ते आश्रमांतील मुलांना शिकविण्याचें काम करीत असत, हे काम करितांकरितां त्यांचे असें ध्यानांत आलें कीं, मुलांना कोणच्या तरी उपयुक्त उद्योग कष्टाकरितां जर लेखन, हिशेब, भूगोल, इतिहास, यांचें शिक्षण दिलें तर ते आवडीनें ग्रहण करितात आणि शिकतातहि लौकर. राजकारणाच्या धामधुमींत पडल्यामुळें हे शिक्षणाचे प्रयोग पुढें चालविण्यास त्यांस सवड झाली नाहीं. त्यांची राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना उद्योगाचे द्वारें शिक्षण देण्याचीच होती. परंतु ती स्पष्टत्वानें जनतेस कळली नाही. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शाळा या पुष्कळशा समथ विद्यालयांतील शिक्षणक्रमास अनुसरूनच चाललेल्या होत्या. कारण या संस्थेच्या चालकांस गांधींचेजवळ राहून त्यांचेपासून शिक्षणविषयक कल्पना मिळविण्याची संधि मिळाली नाहीं. असो. सत्याग्रही युद्धें थांबवून देशांत मंत्रिमंडळें स्थापन झाल्यावर एका प्रसंगानें गांधींनीं

आपली राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना देशांतील मोठमोठ्या शिक्षणतज्ज्ञांपुढें वर्ध्यास मांडली. शिक्षणतज्ज्ञांनीं या कल्पनेस उचलून धरलें. तेव्हां मूलोद्योग शिक्षणपद्धति चालविण्याकरितां एक संस्था काढून त्यावर हिंदुस्थानांतील एक बडे शिक्षणतज्ज्ञ झकिर हुसेन याच्या अध्यक्षेतखालीं एक संस्था सुरू करण्यांत आली आहे. ती या शिक्षणपद्धति संबंधानें विचारप्रवर्तक अशीं पुस्तकें प्रसिद्ध करते. ही शिक्षणपद्धति आपापल्या प्रांतांत आम्ही सुरू करतों अशी हमी निरनिराळ्या प्रांतांच्या शिक्षणमंत्र्यांनीं दिली. आतां ह्या पद्धतीला सरकारी मान्यता मिळालेली आहे. आपल्या मंत्र्यांनी पुढें महायुद्धांत अधिकारपदें सोडून दिलीं तरी ब्रिटिश सरकारनें या पद्धतीचीं उपयुक्तता लक्षांत घेऊन ती आपल्या प्रांतांत चालू ठेविली होती. ही योजना म्हणजे शिक्षणक्षेत्रांत मोठी क्रांति करणारी आहे. तिच्या अनेकविध गुणांचें स्वरूप तिचा उपयोग करण्यानेंच दृष्टोत्पत्तीस येईल. असो. अशीं हीं दोन विधायक कामें गांधींनीं या दहा वर्षांत राष्ट्रापुढें ठेविली, त्यासाठीं विद्वान् तज्ज्ञलोकांचें मंडळ नेमलें आहे.

## गांधींचें नवें वसतिस्थान

कैदेंतून सुटल्यावर पूर्वसंकल्पाप्रमाणें ते साबरमती आश्रमांत राहावयास गेले नाहींत. तो आश्रम त्यांनीं हरिजन कार्याकरिता देऊन टाकला व आपण वर्ध्यास राहावयास गेले.



*

## १९. घडामोडींची गर्दी

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत प्रांतिक सरकारें स्थापन होऊन नव्या राजवटींची घडी बसवताहेत तोंच युरोपमध्यें दुसरें महायुद्ध सुरू झालें. या महायुद्धांत हिंदुस्थान दोस्ताच्या वतीनें युद्धांत सहकार्य करण्यास तयार आहे असें हिंदी लोकांस न विचारतांच व्हाइसरॉय लॉर्ड लिन्‌लिथगो यांनीं ब्रिटिश सरकारांस कळविलें. आमचा पैसा, आमचे शिपाई, हिंदुस्थानांतील अनेकविध माल आणि शास्त्रज्ञ तुम्ही ह्या युद्धांत उपयोगांत आणणार आणि आमचा सल्ला ह्याबाबत कांहींच घेत नाहीं हें आम्ही सहन करूं शकत नाहीं असें राष्ट्रांतील बहुतेक सर्व राजकीय गटांचे म्हणणें होतें. परंतु सामान्य तक्रार करण्याशिवाय त्यांचे अंगांत दुसरें कांहीं सामर्थ्य नव्हतें इंग्रज सरकार आपल्याला विचारीत नाहीं असें पाहून कॉंग्रेसनें आपल्या विधिमंडळांतील सभासदांना आणि मंत्रिमंडळाला आदेश पाठविला की, तुम्ही सभासदत्व व अधिकारपदें सोडा. आपल्याला या लढाईत ब्रिटिश सरकारशीं सहकार्य करायचें नाहीं. कॉंग्रेस अधिकारपद सोडून स्वस्थ बसली नाहीं तर ब्रिटिश सरकारला पैसा आणि मनुष्यबळ देऊं नका असा प्रचार करण्याचें तिनें ठरविलें. युद्धकालांत अशा तऱ्हेचा प्रचार हा हिंद-संरक्षण कायद्याच्या कलमांचा भंग करणारा ठरत होता. कॉंग्रेसचा निर्णय म्हणजे कायदेभंगाची मोहीमच सुरू करण्याचा निर्णय होता. ही मोहीम चालविण्याचा भार पुनः कॉंग्रेसनें म. गांधींवर टाकला.

### कायदेभंगाचें लाक्षणिक स्वरूप

या वेळीं गांधींना वादळी प्रचाराच्या मोहिमा काढून देशांत अस्वस्थतेचीं वादळें उडवून द्यायचीं नव्हतीं. कारण ह्या बिकट काळांत दंगेखोर लोक चळवळीचा फायदा घेऊन जाळपोळ, लुटालूट, दंगेधोपे करून लोकांचें नित्य जीवन धोक्यांत आणीत असतात. म्हणून गांधींनीं या कायदेभंगाचें

स्वरूप फक्त लाक्षणिक ठेवलें. गांधींना हा सत्याग्रह सुरू करून जगाला असें दाखवावयाचें होतें कीं, आम्हां हिंदी लोकांना हें महायुद्ध पसंत नाहीं. आज हिंदुस्थानांतील पैसा आणि मनुष्यबळ सरकार जें नेत आहे तें आमच्या इच्छेविरुद्ध, लोकांवर आपलें अनिष्ट वजन टाकून नेत आहे. हें महायुद्ध सरकार कशासाठीं करीत आहे हेंच आम्हांला समजत नाहीं. हिट-लरची शक्ति मारल्यावर इंग्लंड बलिष्ठ होणार आणि मग आमचे गुलाम-गिरीचे पाश अधिकाधिक आवळले जाणार. जालियनवाला बागेचा प्रसंग आम्ही विसरूं शकत नाहीं. पहिल्या महायुद्धांत ' हिंद 'नें इंग्रजास मदत केली त्याचा उपकार सरकारनें रौलट कायद्यासारखे दडदशाहीचे कायदे करून फेडला. आम्ही आतां अनुभवानें शहाणे झालों आहों, म्हणून सरकार युद्धाचे हेतू स्पष्ट करीपर्यंत आम्ही लोकांना सांगत फिरणार कीं, या युद्धाला मदत करूं नका. देशांत अस्वस्थता माजूं नये, म्हणून आम्ही या वेळच्या कायदेभंगाचें स्वरूप लाक्षणिक ठेवणार आहोंत. हा कायदे-भंग वाटेल त्यानें करावयाचा नाहीं. ज्या लोकांचा अहिंसेच्या बला-वर विश्वास आहे, जे रोज सूत कातताात व इतर विधायक कार्यक्रमास मदत करतात अशांनाच कायदेभंगाची परवानगी मिळेल. या लोकांच्या नांवांनी यादी अगोदर प्रसिद्ध होईल. या सत्याग्रहींनीं करावयाचीं भाषणेंसुद्धां ठराविकच असतील. गांधींना सरकारला या वेळीं अडचणींत टाकायचें नव्हतें फक्त जागतिक राजकीय बाजारांत ब्रिटनची पत उतरावयाची होती. आणि हें काम या सत्याग्रहानें बरेंचसें साधलें हें पुढील प्रसंगावरून लक्षांत येईल गांधींनीं ही कायदेभंगाची चळवळ अतिशय काटेकोरपणें चालविली. थोड्याच लोकांना त्यांचीं पूर्वचरित्रें लक्षांत घेऊन परवानगी दिली. सरकारनेंहि पुष्कळशा लोकांना कैदेची शिक्षा न देतां स्थानबद्धच केलें आणि तुरुंगांत त्यांना सौजन्यानें वागविलें. देशांतील इतर पक्ष या कालांत सरकारवर मारखो टीकेची झोड उठवित होते व म्हणत होते कीं, तुमच्या लढाईचा हेतु व हिंदुस्थानबद्दलचें तुमचें भावी धोरण प्रसिद्ध करा. यामुळें सरकारला

१९४१ च्या अखेर अखेर सत्याग्रही कैद्यांना मुक्त करणे भाग पडलें. या सत्याग्रहांत गांधींनीं स्वतः भाग घेतला नाहीं. ते फक्त सत्याग्रह मोहिमेचे सेनापति राहिले. हें सेनापत्य स्वीकारणें हीं गोष्ट सुद्धां कायदेभंगांत येत होती पण सरकारनें गांधींना हात लावला नाहीं.

**विनोबा**—दुसरी एक गोष्ट या सत्याग्रहांत दिसून आली ती ही की, गांधींनीं पहिला सत्याग्रही म्हणून वर्ध्याच्या सत्याग्रहाश्रमाचे प्रमुख विनोबा भावे यांची नेमणूक करून तसें त्यांचें नाव प्रसिद्ध केलें. विनोबा हे गांधींचे एकनिष्ठ अनुयायी. त्यांचा सत्याग्रहाश्रम म्हणजे गांधींच्या कल्पनेचा तो आदर्श नमुना होता. विनोबांची बुद्धिमत्ता बृहस्पतितुल्य होती. बुद्धिबळा-इतकाच त्यांचा ज्ञानसंग्रहहि अफाट होता. ज्ञानसंग्रहाच्या विशालतेला शोभेशी त्यांची कडक तपश्चर्या होती. या तपश्चर्येत भक्तीचा ओलावाहि भरपूर होता. यामुळें राष्ट्रीय भावना, सेवाभाव आणि गांधींच्या विचाराचे ज्ञानपूर्वक ग्रहण या गोष्टींना विनोबा हे आज सबंध हिंदुस्थानांत आदर्श सत्याग्रही होते. पण त्यांच्या प्रसिद्धिविन्मुख स्वभावामुळें त्यांची माहिती फारशी कोणास झालेली नव्हती. गांधींना त्यांची योग्यता पटलेली होती म्हणून कोणालाहि न कळवितां गांधी एक दिवस विनोबांकडे गेले आणि त्यांना म्हणाले कीं, "तुम्हाला मी पहिला सत्याग्रही म्हणून पाठविणार आहे." हा मान आपल्याला मिळेल याची विनोबांना कल्पना नव्हती, आणि असल्या मानाची त्यांना अपेक्षाहि नव्हती. यामुळें गांधींच्या निवडीनें त्यांना क्षणभर धक्काच बसला पण "गांधींचा शब्द प्रमाण" मानण्याची त्यांनीं आपल्या बुद्धीला संवय लावून घेतली होती, त्यामुळें त्यांनीं होकार दिला. गांधींनीं विनोबांचें नांव पहिला सत्याग्रही म्हणून प्रसिद्ध करतांच हिंदुस्थानांतील राजकारणांत पडलेल्या लोकांना आश्चर्याचा धक्काच बसला. "विनोबा कोण? आजपर्यंत आम्हाला यांची माहिती कशी समजली नाहीं." वगैरे प्रश्न लोक करतील म्हणून गांधींनी विनोबांचें चरित्र हरिजनमधील एकदोन अंकांत सविस्तर असें प्रसिद्ध केलें त्यावरून विनोबांची योग्यता जगाला कळली पण कॉंग्रेस-

श्रेष्ठीमधील कांहींचें त्यामुळें समाधान झालें नाहीं. ते म्हणाले हें युद्ध **काँग्रेसचें** आहे आणि **विनोबा** हे थोर साधुपुरुष असले तरी ते काँग्रेसचे सभासद नाहीत आणि राजकारणांत ते पडत नाहींत. तेव्हां काँग्रेसचा पहिला प्रतिनिधि म्हणून गांधीनी त्यांची योजना का करावी? यावर गांधीचें म्हणणें असे होतें कीं, "विनोबा व्याख्यानें देत नसतील, विधिमंडळांत जात नसतील अधिकारसूत्रें हातात घेत नसतील, परंतु काँग्रेसच्या शक्तीचा भरभक्कम पाया ते आपल्या सत्याग्रहाश्रमातर्फे वर्ध्याच्या आसपासच्या जनांची सेवा करून रचीत आहेत. त्यांचें हे काम काँग्रेसच्या कोणच्याहि नेत्यापेक्षा कमी दर्जाचे नाहीं म्हणून त्याची योजना पहिला सत्याग्रही म्हणून करण्यांत आली आहे." गांधीनी अशा रीतीनें एका निष्ठावंत, ध्येयनिष्ठ पण अज्ञात राहून सेवा करणाऱ्या सेवकाला जगाच्या पुढे आणून त्यांची योग्यता लोकांना दाखविली. विनोबा जगाच्या पुढे आल्यावर त्यांचा सहवास अनेकांनी इच्छिला. त्यांच्या सहवासांत जे राहिले, त्यांच्याशी ज्यांनी प्रत्यक्ष चर्चा केली, तुरुंगांत ज्यांनी त्यांचें जीवन पाहिलें त्या सर्वांनीं एकमताने म्हटलें आहे कीं: **"काँग्रेसचा पहिला सत्याग्रही म्हणून जाण्यास विनोबा हे सर्वस्वी पात्र होते यांत शंका नाहीं."**



## २०. स्वराज्यदानाच्या वाटाघाटी

हिंदुस्थान सुखासुखी स्वेच्छेनें महायुद्धांत ब्रिटिशांना मदत करीत नाहीं, हें वैयक्तिक आणि लाक्षणिक कायदेभंगानें जगाला दाखिवलें. ब्रिटिशांना जगाची सहानुभूति आणि मदत हवी होती म्हणून त्यांनी असें प्रसिद्ध केलें कीं, आम्ही हें जें युद्ध करीत आहों तें जगातील गुलामगिरी, पारतंत्र्य नाहींसे करण्याकरितां होय. अशा तऱ्हेची दवंडी पिटवल्यावर चर्चिलच्या सरकारला हिंदुस्थानकरितां कांहींतरी करणें भाग होतें. म्हणून त्यांनी आपल्या मंत्रिमंडळांतील सर स्टॅफोर्ड क्रिप्स यांना हिंदुस्थानची भावी राज्यघटना कशी असेल याचा खर्डा देऊन हिंदुस्थानांत पाठविलें.

क्रिप्सनें हिंदी पुढाऱ्यांशी हिंदुस्थानांत येऊन वाटाघाटी केल्या. क्रिप्सने आणलेली योजना हिंदुस्थानांतील कोणच्याच गटाला पसंत नव्हती कारण यांत एक कलम असे होतें की, हिंदी स्वराज्यात ज्या प्रांतांना किंवा संस्थानांना यावयाचें नसेल त्यांना वेगळे राहण्याची किंवा आपले गट करण्याची परवानगी मिळेल. या कलमानें हिंदुस्थानचे असंख्य तुकडे होणार होते चर्चिलमंत्रिमंडळाच्या मनांत हिंदुस्थानला केव्हांच स्वराज्याचे हक्क द्यावयाचे नव्हते पण महायुद्धांत इंग्लंड पेचांत सापडलें होतें म्हणून त्यांनीं स्वराज्य हिंदुस्थानला देण्याचें मान्य केलें पण हिंदुस्थानची शक्ति जेणे करून खच्ची होईल अशी योजनाहि त्यांनी देऊं केलेल्या स्वराज्याच्या घटनेंत करून ठेवली होती. यामुळें कॉंग्रेसश्रेष्ठींनीं ही योजना धुडकावून लावली. शेवटी क्रिप्सनें गांधीची भेट घेतला. या भेटीत गांधी क्रिप्सला म्हणाले मला कल्पना नव्हती की "तुमच्या सारखा भला माणूस असली योजना घेऊन येईल म्हणून. ही पुढील तारखेची हुंडी कोण पत्करील? आम्हाला तुम्ही आज काय देणार हें पाहिजे आहे. आणि तुम्ही युद्धानंतर काय द्यावयाचें तें सांगावयास आलां आहां. तरी तुम्हीं पहिल्या विमानानें परत जावें हें उत्तम." ब्रिटिश मंत्रिमंडळांतल्या नामवंत मुत्सद्याला तोंडावर आतां तसें परत जा असें स्पष्टपणें सांगण्याचें धैर्य त्या काळांत फक्त गांधींच्यांतच दिसून आलें. क्रिप्ससाहेब आले तसे परत गेले.

**पाकिस्तानची मागणी**

ब्रिटिशांना आपली सत्ता हिंदुस्थानांत कायम करण्याकरितां जाति-जातींत कलह असणें हें हिताचें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं मुसलमानांना हातीं धरून देशांत जातिकलह वाढण्याला मदत केली. १९१९च्या पूर्वीपासून मुसलमानांना कॉंग्रेसपासून अलग करण्याचा डाव इंग्रज खेळत होते. शेवटीं १९१९ च्या मॉंटफर्ड सुधारणांत मुसलमानांना स्वतंत्र मतदार संघ देण्यांत आला. स्वतंत्र मतदार संघ मिळाल्यावर मुसलमानांनीं अधिकाधिक हक्क व सरकारांत अधिकाधिक जागा मागण्यास सुरुवात केली. बॅ. जिना यांचें नेतृत्व मुसलमानांना लाभल्यावर त्यांनीं १४ कलमी यादी तयार करून त्यांत मुसलमानांच्या मागण्या जाहीर केल्या. या कलमांत म्हटलें होतें. विभक्त मतदार संघाला मान्यता द्या. गोहत्या करण्याचें मुसलमानांना स्वातंत्र्य द्या. वंदे मातरम् गीताला राष्ट्रगीत म्हणूं नका. उर्दू हीच राष्ट्रभाषा करा. मुस्लीम लीग हीच मुसलमानांची एकमेव, प्रातिनिधिक संस्था मानून तिच्या निशाणाला राष्ट्रीय सभेच्या निशाणाइतकाच मान द्या. असें तुम्हीं केलेंत म्हणजे मग तुमचें आमचें सहकार्य होऊं शकेल. याशिवाय मुसलमानांना मंत्रिमंडळांत सरकरी नोकऱ्यांत राखीव जागा हव्या. सरकारची मदत आपणाला भरपूर आहे हें जिनांनीं ओळखून आपली मागणी पुढें चढवीत चढवीत **पाकिस्तानच्या मागणीपर्यंत** नेऊन भिडविली. जिनांचें म्हणणें असें होतें कीं, हिंदुस्थानांत मुसलमानांची संख्या १० कोटीइतकी मोठी असूनसुद्धां ते लोक अल्पसंख्यांक म्हणूनच हिंदुस्थानांत नेहमीं राहणार यामुळें त्यांना विधिमंडळांत लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा जरी मिळाल्या तरी हिंदूंचेंच वर्चस्व एकंदर राजकारभारांत नेहमीचेंच राहणार. आणि तें आम्हांला सहन होणार नाहीं. इंग्रजांचेंच राज्य येथें होतें, त्यामुळें आमच्या संस्कृतीवर हिंदूंचें आक्रमण झालें नाहीं. परंतु हिंदुस्थानला स्वराज्याचे हक्क मिळाल्यावर हिंदूंचा पगडा मुसलमानांवर पुरा बसेल आणि त्यांची प्रगति तर राहोच पण त्यांची परागति होईल म्हणून आम्हां मुसलमानांना स्वतंत्र मुसलमान संघराज्य हवें. या संघराज्यांत सिंध,

सरहद्द प्रांत, पंजाब, पू. बंगाल आणि आसाम हे प्रांत येऊं शकतील कारण तेथें मुसलमान बहुसंख्यांक आहेत, बाकीच्या प्रांतांचें हिंदु संघराज्य करावें.

### कॉंग्रेसचा दृष्टिकोन

कॉंग्रेसला ही जिनांची मागणी राष्ट्रविघातक वाटत होती. कॉंग्रेस म्हणत होती आम्ही जातीयता मानीत नाहीं. आम्ही राष्ट्रधर्म ओळखतों. शिवाय हिंदुस्थानांत मुसलमान अल्पसंख्य असले तरी दहा कोटी आहेत. तेव्हां हिंदु त्यांना दडपून टाकतील ही भीति व्यर्थ आहे. मुसलमान आणि हिंदु यांचे धर्म निराळे असले तरी या दोन जमातींचे आर्थिक संबंध एकच आहेत. पुष्कळ हिंदु उर्दू भाषा बोलतात, पुष्कळ मुसलमान हिंदी, बंगाली, मराठी या भाषा बोलतात. तेव्हां हिंदु आणि मुसलमान हीं दोन स्वतंत्र राष्ट्रें आहेत असें मानणें हें चुकीचेंच नव्हे तर राष्ट्रहिताच्या दृष्टीनें खोडसाळपणाचें आहे, म्हणून मुसलमानांनीं वाटल्यास अधिक हक्क मागावे, संरक्षक बंधनाचा हट्ट धरावा पण हिंदी राष्ट्रांत फूट पाडूं नये. त्यांत त्या दोघांचाहि नाश आहे. पण हें कॉंग्रेसचें बोलणें जिनांना पटलें नाहीं. त्यांना माहीत होतें कीं, ब्रिटिश आपल्या बाजूचे आहेत, मग स्वतंत्र राज्याचा हट्ट आपण कां न धरावा? गांधींनीं जिनांना व मुसलमानांना समजावण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला. शेवटीं त्यांच्या मनानें घेतलें कीं, हिंदु-मुसलमानांत झुंज लावणारा इंग्रजांचा तिसरा पक्ष येथून गेल्याशिवाय हिंदुस्थानला खरें स्वराज्याचें सुख मिळणार नाहीं.

### गांधींचा जळजळीत आदेश

१९४२ साल म्हणजे महायुद्धाचा मध्यकाल होय. जपाननें ब्रिटिश साम्राज्यावर हल्ला केल्यामुळें ब्रिटिश प्रत्येक क्षणीं माघार घेत होते. या कालांत ब्रह्मदेशांत हिंदी लोकांच्या मोटारी सरकारनें ताब्यांत घेऊन ब्रिटिश लोकांना पळून जाण्याकरितां दिल्या आणि हिंदी लोकांना जपानचे विक्राळ तोंडांत सोडून दिलें. ओरिसा प्रांतांत लष्कराच्या सोयीकरितां गांवेंच्या गांवें उठविण्यात आलीं. कोळी लोकांच्या होड्या जप्त करण्यांत

असल्या. मुंबई, कलकत्ता येथें गोरे शिपाई भर रस्त्यावर हिंदी स्त्रियांची चेष्टा करूं लागले. त्यांच्यासमोर सोल्जर लोक दारू पिऊन नागवे हिंडत. गांधींना या गोष्टी सहन करणें अशक्य झालें. त्यांनीं व्हाइसरॉयपर्यंत हा प्रश्न नेऊन हे प्रकार बंद करविले. स्त्रियांना त्यांनी सांगितलें, पुरुष जर तुमचें संरक्षण करीत नसतील तर तुमच्याजवळ नखें व दांत आहेतना, तुम्ही **कोणतेंहि साधन वापरा व आपल्या शीलाचें रक्षण करा. ज्यांना अहिंसेचा श्रेष्ठ मार्ग आचरण्याचें धैर्य नसेल त्यांनीं प्रसंगीं हिंसेचा आश्रय करावा परंतु जुलूम, जबरदस्ती, स्त्रियांचा अपमान ह्या गोष्टी सहन करूं नयेत. भित्रा, पळपुटा माणूस हा हिंसकापेक्षांहि हीन होय.**

## गांधी लोकमत तापवित चालले

ह्या कालात गांधीना क्षणभरहि स्वस्थता मिळाली नाही. त्यांच्या मनाची शांति वर सांगितलेल्या प्रकारानें भंग पावत होती मग त्यांनी 'हरिजनां'तून आटवड्यापाठीमागून आठवडे जळजळीत असे लेख लिहिले. या लेखांनीं लोकमत हळूहळू तापत जाऊन जनतेच्या भावनांनीं ज्वालांचें स्वरूप धारण केलें. संत्रस्त भयभीत झालेल्या जनतेला सरकारी वटहुकुमामुळें आपल्या दुःखांना वाचा फोडणेंहि कठिण झालें होतें. अशा वेळीं तें गाऱ्हाणें वेशीवर टांगून लोकांना धीर देण्याचें कार्य गांधी मोठ्या तत्परतेनें करीत होते आणि लोकांना सांगत होते कीं, "ब्रिटिशांनीं आतां परत जावें असें सर्व हिंदी जनतेनें एकमुखानें ओरडून सांगितलें पाहिजे. ह्या ओरडण्याला बळकटी यावी म्हणून हिंदुस्थानांतील सर्व दर्जाच्या नरनारींनीं सरकारशीं पुनः असहकार करावा."

गांधीं आता कायदेभंगाचा वणवा पुनश्च पेटविणार असें पाहून पुष्कळ लोक गांधींकडे आले व म्हणाले सरकारशीं युद्ध करण्याचा हा समय नव्हे. या कालांत सेवाग्रामला देशांतील लहानमोठे पुढारी सारखे येत राहून गांधींजवळ त्यांच्या भावी मोहिमेची चर्चा करीत होते. पुढाऱ्यांच्या आक्षेपाला गांधींनीं हरिजन पत्रकांतून उत्तरें दिलीं. व पुनश्च प्रतिकार करण्याची बुद्धि लोकांत उत्पन्न केली.

# २१. ब्रिटिश सत्तेला भूकंपाचा धक्का

**काँग्रेसचें सडेतोड पण रास्त बोलणें**

दुसऱ्या महायुद्धाच्या मध्यकालांत जपाननें पूर्वेच्या बाजूनें ब्रह्मदेशावर एकाएकी हल्ला चढविला. सिंगापूरसारखे आरमारी तळ हां हां म्हणतां काबीज केले. ब्रिटिश सैन्यांची तितकीशी तयारी नसल्यामुळे, त्यांनीं भराभर माघार घेण्यास सुरुवात केली, तेव्हां ब्रह्मदेश अर्थातच उघडा पडला. तो घेऊन जपानी हिंदुस्थानवर आक्रमण करण्याची तयारी करूं लागले. थोडा अनुकूल काल जर असतां तर जपानी सैन्य हिंदुस्थानांत शिरण्यास वेळ लागला नसता. त्या वेळीं हिंदुस्थानचें संरक्षण ब्रिटिश करूं शकतील असें दिसत नव्हतें आणि हिंदी लोकाजवळ शस्त्रास्त्रें नव्हती. अशा स्थितीत हिंदुस्थानची काय स्थिति झाली असती याची कल्पनाच करतां येईना. देशांतील स्त्री पुरुष भयभीत झाले होते. काँग्रेसनें ब्रिटिश सरकारला बजावलें कीं, तुम्ही आमचें रक्षण करूं शकत नाही असें स्पष्ट दिसत आहे, तेव्हां तुम्ही हिंदी लोकांवर देशरक्षणाची जबाबदारी टाकली पाहिजे. आमच्या सैन्यांत भरती व्हा एवढें म्हणण्यानें हिंदुस्थानचें संरक्षण करण्यास लोक हिरीरीनें पुढें येणार नाहींत. त्याना हें आपलें राज्य आहे असें वाटलें पाहिजे म्हणून तुम्ही आतांचे आतां असें जाहीर करा कीं, " आम्ही हिंदुस्थानचें स्वातंत्र्य आजपासून मान्य करतों." लढाईच्या कालांत एकदम सत्तांतर करितां येणार नाहीं म्हणून तुम्ही मध्यवर्ती सत्ता हिंदी लोकप्रतिनिधींच्या स्वाधीन करावी म्हणजे मग तुम्ही आणि आम्ही मिळून जपानी आक्रमणाचा प्रतिकार करूं. काँग्रेस ही जपान जर्मनीच्या बाजूची आहे हें म्हणणें फोल आहे. तुम्ही आम्हांला सत्ता द्या आणि मग आमचें सहकार्य—हार्दिक सहकार्य—तुम्हाला आम्ही देऊं. स्वातंत्र्य मिळाल्यावर आम्ही काँग्रेस पक्षाचेंच राज्य स्थापूं याची भीति अल्पसंख्यांकांना कदाचित् वाटेल म्हणून आम्ही आतांच असें

जाहीर करतों कीं, ' युद्ध समाप्तीनंतर एक घटनापरिषद भरेल. या परिषदेंत देशांतील सर्व लोकांचे प्रतिनिधी येतील आणि ते राज्यघटनेचें स्वरूप आणि अल्पसंख्य लोकांचे हक्क ठरवतील.

" तुमची सत्ता जोंपर्यंत येथें आहे तोंपर्यंत हिंदुस्थानला सुखाचे दिवस कधींहि येणार नाहींत अशी आमची बालंबाल खात्री झाली आहे. तुम्हां ब्रिटिश लोकांच्या ताब्यांत हिंदुस्था र आहे म्हणूनच तुमच्या साम्राज्यावर जपान जर्मनीच्या डोळा आहे. तुम्ही हिंदुस्थान सोडा आणि आम॰ याकरितां नाहीं पण स्वतःच्या हितांकरितां तरी इंग्लंडला परत जा. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर तुमची आमची खरी मैत्री होऊं शकेल. ज्या लोकशाह च्या तत्त्वांकरितां आपण झगडतों असें तुम्ही म्हणतां त्याचकरितां हिंदुस्थानचें तुम्हाला संपूर्ण साहाय्य मिळेल. तुमच्या आमच्या सहकार्यानें जगांतील सोटेशाही नाहींशी होईल आणि सुखशाहीचें साम्राज्य सर्वत्र पसरेल.

"हें सर्व हो ण्याकरितां हिंदुस्थानला स्वतंत्र करून तुम्ही परत जाण्य ची तयारी करा. युद्धकालांत तुमचें ब्रिटिश सैन्य हिंदुस्थानांत राहिल्यास आमची हरकत नाहीं पण या सैन्याच्या हालचाली हिंदी सेनापतीच्या अनुमतीनेंच व्हावयास हव्यात. आमची ही मागणी न्यायाला व तुमच्या आमच्या हिताला धरूनच आहे. आणि ही जर तुम्ही मान्य करीत नसाल तर कांग्रेसला तुमच्या सत्तेशीं अनेकविध असहकार करावा लागेल. हा करितांना आम्ही आमची चळवळ ही आमच्या धोरणाप्रमाणें अहिंसकच ठेवूं "

अशा तऱ्हेची मागणी कांग्रेसनें सरकारजवळ केली पण सरकार म्हणूं लागलें कीं, सध्यां राज्यव्यवस्थेंत मोठाल्या घडामोडी करणें इष्ट नाही आम्ही फार तर व्हाइसरॉयच्या कौन्सिलांत कांहीं हिंदी लोक घेण्याचें अभिवचन देतों असें म्हणून सरकारनें देशांतील कांहीं सुप्रसिद्ध लोकांना व्हाइसरॉयच्या कौन्सिलांत घेतलें. हे लोक सरकारच्या बोलावण्यावरून तेथें गेले होते. कोणच्याहि पक्षाचे प्रतिनिधि म्हणून गेले नसल्यामुळें ते स्वतःच्या जबाब-

दारीवर वागूं शकत होते. यामुळें व्हाइसरॉयच्या कौन्सिलला प्रातिनिधिक स्वरूप आलें नाहीं व लोकांचा संतोष कमी न होतां अधिकच वाढत गेला.

सरकार आपलें ऐकत नाहीं असें पाहून असहकाराचें आंदोलन पुन्हां सुरू करण्याचा ठराव कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें केला आणि ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीकडे तो मान्यतेसाठीं पाठविला. या ठरावाची चर्चा ता. ६ ऑगस्ट १९४२ ला करावयाचें ठरलें. गांधी या कालांत आपल्या जळजळीत लेखांनीं लोकमत सरकारशीं युद्ध करण्यास तयार करीत होते. यामुळें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटींत ठराव पास होणार असें स्पष्ट चिन्ह दिसत होतें. ही कमिटी मुंबईस भरणार होती. मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें या ऐतिहासिक अधिवेशनाची तयारी मुंबईच्या कीर्तीस साजेल अशा मोठ्या प्रमाणावर चालविली होती. हिंदुस्थानांतील लहान थोर पुढारी आणि शेंकडों कार्यकर्ते या वेळी मुंबईस जमले होते. प्रेक्षकांनी तर मंडपाला इतका मोठा वेढा दिला होता कीं, त्या लोकसागरांतून जाणेंयेणें कॉंग्रेस नेत्यांना मोठ्या मुष्किलीचें झालें होतें. शेवटीं ता. ६–७–८ या तीन दिवशी कॉंग्रेसच्या या असहकाराच्या ठरावावर खूप चर्चा झाली. कांही लोकानी ही वेळ सरकारशीं युध्द करण्याची नाहीं असा इशारा दिला पण तो सभेला मानवला नाहीं. लोकमत सरकारविरुध्द अगदीं खवळले होतें. गांधीनी ह्या युध्दाला 'चले जावची चळवळ' असें नांव दिलें होते. आणि हे शब्द हिंदी भावनांना उचंबळून देण्यास कल्पनेबाहेर समर्थ ठरले. आजपर्यंत ब्रिटिशांच्या राजवटीला अनेकांनीं लहानमोठ्या शिव्या दिल्या. गांधीनी त्यांना सैतान म्हटलें. वसाहतीच्या स्वराज्याची सरकारजवळ वारंवार मागणी करण्यांत आली. पूर्ण स्वराज्याचा हक्कहि कोणी प्रतिपादिला पण "ब्रिटिशांनो चालते व्हा" असें त्यांना तोंडावर कोणीहि म्हटलें नव्हतें. तें आज म्हणावयास गांधी तयार झालेले पाहून लोकांच्या हर्षास सीमा उरली नाहीं. १९१९ चीं रौलट ॲक्टच्या वेळची चळवळ, २१ सालची असहकाराची चळवळ, १९३०–३२ च्या कायदेभगाच्या चळवळी आपापल्या प्रकारें देशव्यापी

आणि प्रचंड प्रमाणावर झाल्या यांत संशय नाहीं. पण १९४२ च्या ऑगस्ट महिन्यांत, सागराला पौर्णिमेला उधान यावें त्याप्रमाणें लोकमत आज ब्रिटिशांच्याविरुध्द इतकें बेफाम झालें होतें कीं, त्यानें मागच्या असंतोषाला मागेंच टाकलें.

**" करेंगे या मरेंगे "**

ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटींत जवाहरलाल नेहमींप्रमाणें आवेशानें व कांहींशा संतापानें आणि हिरीरीनें बोलले. वल्लभभाईंचें भाषण म्हणजे जवाहरलालच्या भाषणाप्रमाणें विजेसारखें चमकावयाचें नाहीं पण ते जे थोडेच शब्द बोलतील त्यांतून दणकट घणाचा, प्रतिप्रक्षाच्या हृदयाला धक्का देणारा, आवाज निघतो त्या परिचित आवाजाची पुनरावृत्ति झालेली पुन्हां एकदां लोकांच्या श्रवणेंद्रियांनीं अनुभवली. यानंतर गांधींचें भाषण दीडदोन तास झालें. त्या भाषणानें लोकांचा क्षोभ अधिकच वाढला. त्यांनीं शेवटी लोकांना सांगितले कीं, पुरुष, स्त्रिया, कामगार फार काय पण सैनिकांनींहि आतां सरकारशीं असहकार करावा आणि प्रत्येक नागरिकानें आपण स्वतंत्र आहोंत असें वागावें. मात्र ही चळवळ **अहिंसकच** राहिली पाहिजे. तरच तुम्हांला यांत यश येईल. कॉंग्रेस सेवकानें असा निश्चय मनाशीं करावा कीं, " **करेंगे या मरेंगे** " गांधी हे शेवटचे शब्द बोलून आपल्या जागेवर जाऊन बसले. '**करेंगे या मरेंगे**' Do or Die या शब्दांनीं मंडपांतील मंडळींची मस्तकें भडकलीं आणि सबंध हिंदुस्थान एका क्षणांत पेटला.

कॉंग्रेसनें आपल्या ठरावांत म्हटलें होतें कीं, आम्हीं ही चळवळ सुरू करण्यापूर्वी या चळवळीचे नेते आमचे गांधी हे **व्हाइसरॉयांना जाऊन भेटतील**. त्यांच्याशीं **वाटाघाटी करतील आणि जर या वाटाघाटी फिस्कटल्या तरच ही चळवळ सुरू करण्याचा अधिकार गांधींना देत आहोंत**. हा ठराव प्रचंड मतानें पास झाला. नंतर गांधी आणि कॉंग्रेसचे पुढारी आपापल्या निवासस्थानीं गेले. व्हाइसरॉयला उद्यां पत्र लिहावयाचें, व मुलाखत मागायची

अशा विचारांत गांधी असतां ता. ९ च्या पहाटेस म. गांधी आणि राष्ट्रांतील अनेक लहान थोर पुढारी यांना सरकारनें एकाच वेळीं अटक केली.

**अकस्मात् अटक**

ता. ९ रोजीं सकाळीं पहाटेला ४ वाजतां गांधी निजून उठतात तोंच बिर्लाभवनाच्या त्यांच्या दाराशीं पोलिस कमिशनर दाखल झाले. भारत संरक्षण कायद्याखाली गांधीजी, त्यांचे चिटणीस महादेव भाई व मिराबाई यांच्या अटकेचीं वॉरंटें त्यांनीं गांधींना दाखविली. व तयारीसाठीं अर्धा तास मिळेल असेंहि सांगितलें. तेवढ्या वेळांत गांधींनी नित्याचा आहार घेतला. बिर्ला कुटुंबांतील मंडळीनी भजन म्हटलें. नंतर गीता, कुराण, आश्रमभजनावलि व धनुष्य टकली घेऊन गांधी प्रशांत मनानें व स्थिर मुद्रेनें मोटारीत जाऊन बसले सरकारनें जर आपल्याला अन्यायानें अटक केली तर कदाचित् आपण प्राणांतिक उपोषण करूं असें कांहीं दिवसांपूर्वी गांधी बोलून गेले होते म्हणून घनःश्यामदास बिर्ला यांनीं गांधीजींस विनविलें, "बापूजी उपोषण सुरू करण्याची घाई करूं नका." यावर गांधी म्हणाले, "मी तें टाळण्याचा प्रयत्न करीन पण हृदयस्थ नारायणाची स्पष्ट प्रेरणा मिळाली तर मला उपोषण टाळतां येणार नाहीं." असें म्हणून आपले दुसरे चिटणीस प्यारेलाल यांचेजवळ गांधीनीं राष्ट्राला जळजळीत संदेश दिला. "स्वातंत्र्याच्या प्रत्येक अहिंसक सैनिकानें कागदावर किंवा कापडावर '**करीन किंवा मरेन**' असे शब्द लिहून हें **ब्रीदवाक्य आपल्या अंगावरील कपड्यावर चिकटवावें.** असा स्वातंत्र्यसैनिक सत्याग्रह करीत असतां तो मृत्यु पावला तर तो अहिंसावादी नसलेल्या इतरापासून या ब्रीदवाक्यामुळें ओळखून काढतां येईल."

**राजवाड्याचा तुरुंग केला**

गांधी, महादेवभाई, मीराबेन यांना घेऊन पोलिसांच्या मोटारी पुण्याजवळ आगाखान यांचा एक राजवाडावजा बंगला आहे तेथें गेल्या व त्यांस त्या वाड्यांत ठेवलें. या बंगल्याच्या प्रचंड कॉंपाउंडाला दीडशें सशस्त्र

सैनिकांचा अखंड पहारा ठेवण्यांत आला होता. ह्या बंगल्याला स्पेशल तुरुंगाचें स्वरूप देऊन त्याच्यावर एक जेल सुपरिंटेंडेंट, एक जेलर आणि इतर जेलचे शिपाई ठेवले होते. गांधी त्या ठिकाणीं आहेत याची वार्ता लोकांना कळूं न देण्याची काळजी सरकारनें घेतली पण ती शेवटीं लोकांना कळलीच. गोऱ्या सैनिकांच्या कडक पहाऱ्यामुळें गांधीजींची भेट किंवा दर्शन कोणाला कित्येक महिने होऊं शकली नाहीं. त्यांचे पाठोपाठ डॉ. मिल्डर, मुशिला नायर, सरोजिनी नायडू, आणि शेवटीं कस्तुरबा गांधी यांना तेथें आणून गांधींना त्यांच्या घरांतच राहिल्यासारखें वाटावें अशी व्यवस्था आम्हीं केली आहे असें सरकारनें जगाला दाखविलें.

गांधी आणि देशांतील सर्व नामांकित पुढारी पकडले गेल्यावर देशांत चळवळीचा भडका उडाला. लोकांच्या भावनांना नियंत्रण घालावयास कोणीच नेता बाहेर उरला नाहीं. ज्याला जें वाटेल तें त्यानें केलें यांत कॉंग्रेसजनच होते असें नाहीं. पुष्कळ ठिकाणीं रेल्वेचे रूळ उखडण्यांत आले. तारायंत्राच्या तारा तोडण्यांत आल्या, रेल्वे स्टेशन, सरकारी कचेऱ्या, चौक्या जाळण्यांत आल्या. आगगाड्या उलथून पाडण्याचा प्रयत्न झाला पण मनुष्यहत्या क्वचितच झाली. कांही मंडळींनीं भूमिगत राहून चळवळ चालविली. पुढें पुढें चळवळीकरितां जो पैसा हवा होता तो दरोडे घालून मिळविण्याचा प्रयत्न कांहीं जिल्ह्यांत झाला. सुरुवातीला चळवळीचें नैतिक अधिष्ठान उच्च होतें पण पुढेंपुढें वैयक्तिक लाभ, द्वेष, मत्सर या भावनांचेंच थैमान चाललेलें दिसून येऊन हळूहळू दीड दोन वर्षांनंतर ही चळवळ थंड पडत चालली. या चळवळींत कांहीं अनिष्ट गोष्टी घडल्या असल्या तरी एकंदर चळवळ अहिंसकच राहिली व ज्याचा आपल्या राष्ट्रानें अभिमान बाळगावा असें अनेकविध-बलिदान तरुण-तरुणींनींच केवळ नव्हे तर कोवळ्या बालबालिकांनींहि केलें या चळवळीनें ब्रिटिश सत्ता खिळखिळीत झाली यात संशय नाहीं.

### गांधींचा सरकारवर आरोप

म. गांधी तुरुंगांत गेल्यावर त्यांना असे आढळून आलें कीं, सरकारनें

आपला जगाशीं संबंध कठोरतेने तोडला आहे. पत्रे, मुलाखती किंवा वर्तमानपत्रें त्यांना प्रथम मिळत नसत. पुढे त्यांनीं वारंवार सरकारला पत्रे लिहिली तेव्हां या गोष्टी त्यांना मिळू लागल्या. वर्तमानपत्रावरून त्यांना कळलें की, सरकारनें असा प्रचार चालविला आहे कीं, बाहेरच्या ज्या उत्पातक चळवळी चालल्या आहेत त्या कॉंग्रेसच्या आदेशानुसार चालत आहेत. याला उत्तर म्हणून गांधींनी व्हाइसरॉयला लिहिलें की, " बाहेर चाललेल्या चळवळीसंबंधी तुम्ही गैरसमज करून घेतां. कॉंग्रेसनें चळवळ सुरू करावयाच्या अगोदरच तुम्हीं कॉंग्रेसनेत्यांना अटक केली आहे. मी पत्र लिहून मुलाखत मागणार होतों, तुमच्याशीं चर्चा करणार होतों. त्यानंतर चळवळीची पद्धत ठरवून नंतर राष्ट्राला सत्याग्रह करण्यास सांगणार होतों. तुमच्या-माझ्या भेटींत कदाचित् असा कांहीं मध्यम मार्ग निघाला असतां कीं, ज्यायोगें चळवळ सुरू करण्याचा प्रसंगच आला नसता. तुम्हीं कॉंग्रेसनेत्यांना पकडण्याची घाई केलीत. लोकांचें नियंत्रण करण्याची शक्ति अटकेंत टाकलीत आणि आतां लोक बेफाम कृत्यें करतात म्हणून तुरुंगांत पडलेल्या कॉंग्रेसला तुम्ही दोष देतां वगैरे.

### राष्ट्र हलवणारा गांधींचा उपवास

गांधींच्या या पत्राला सरकारनें समाधानकारक उत्तर दिलें नाही. एका पत्रांत गांधीजींनीं सरकारला कळविलें कीं, "तुम्हीं ऑगस्ट ठरावाच्या कर्त्यांना जिवंत पुरलेंत पण त्यानें पेंचप्रसंग न सुटतां वाढलाच. भीषण अत्याचार चालू आहेत तरी देशांत शांतता निर्माण करण्यासाठीं पुढाऱ्यांना बंधमुक्त करा. पण सरकारनें म्हटलें, "राष्ट्रसभेच्या अत्याचारांचा निषेध करा व ऑगस्टचा ठराव मागें घ्या." यावर गांधींनीं उत्तर दिलें की, "हे अत्याचार कॉंग्रेसच्या उत्तेजनानें झाले आहेत असें सिद्ध करून द्या म्हणजे मी हवें तें प्रायश्चित्त घेईन. ठराव मागें घेण्याचा मला अधिकार काय ? हे काम वर्किंग कमिटी करील. तरी त्या सभासदांशीं माझी भेट करवा.

मागें अशी भेट सरकारनें घडवून आणली होती." पण सरकारनें हें गांधींचे म्हणणें मान्य केलें नाहीं. तेव्हां गांधींनीं शेवटीं निर्वाणीचें पत्र लिहिलें कीं, " तुमच्याकडून न्याय मिळत नाहीं म्हणून सर्वश्रेष्ठ न्यायदेवतेपुढें माझें गाऱ्हाणें मांडण्यासाठीं उपोषण करणें एवढें सत्याग्रही नात्यानें माझें कर्तव्य उरतें. त्यांत मी जगलों नाहीं तर मी निर्दोषी आहें अशा पूर्ण श्रद्धेनें मी त्या अखेरच्या न्यायासनासमोर जाईन. गांधींनी यानंतर २१ दिवसांचा उपवास सुरू केला. त्याबरोबर सर्व देश हादरला. बाहेर असलेल्या पुढाऱ्यांची धांवपळ सुरू झाली. सरकारवर वजन आणून गांधींना सोडविण्याचा प्रयत्न मोठमोठया लोकांनीं केला. त्यांत हिंदी लोकांप्रमाणें युरोपिअनहि होते. पण सरकारनें या वेळीं कोणच्याहि कारणानें गांधीना सोडवयाचें नाहीं असा निश्चय केला होता. गांधींच्या मृत्यूनें देशांत गडबड होईल म्हणून सरकारानें पोलिस आणि लष्करी बंदोबस्त कडक करून ठेवला होता. एका अधिकाऱ्यानें असें स्पष्ट बोलून दाखविलें कीं, गांधी मेले तर त्यांना जाळण्यासाठी चंदनाचीं लांकडें आणून ठेवलेली आहेत. उपोषणानें गांधींची प्रकृति खालावत चालली. गांधी मरतात कीं जगतात असा एक क्षण आला पण गांधी या प्रसंगातून वांचले. २१ दिवसांनीं उपोषण जेव्हां सुटलें तेव्हां हिंदी लोकांचा जीव खालीं पडला.

### दोन दारुण आघात

आगाखान पॅलेसमध्यें ता. ९ रोजीं गांधी आपल्या मंडळींसह जाऊन पोहोंचले. त्यांचेबरोबर त्यांचे चिटणीस, सहकारी, शिष्य, आणि निष्ठावंत सेवक असे महादेवभाई देसाई हेहि होते. महादेवभाईंची प्रकृति अलीकडे बरीच खालावली होती. परंतु त्यांचा मृत्यु इतका जवळ आहे असें कोणाला वाटलें नव्हतें. १५ ऑगस्ट रोजीं सकाळीं गप्पा मारीत असतां ते अस्वस्थ झाले, थोडया वेळांत बेशुद्ध होऊन त्यांचा अंत झाला. हें सर्व इतक्या जलद झालें कीं, डॉक्टरांना आणि त्यांच्या जवळच्या मंडळींना हें कसें घडलें याची कल्पनाच होईना. गांधींच्यावर महादेवभाईंच्या मृत्यूनें मोठा आघात झाला.

महादेवभाई जाणें म्हणजे गांधींची अर्धी शक्ति जाण्यासारखें होतें. पण हा आघात गांधींनीं धैर्यानें सहन केला. सरकारनें याहि प्रसंगीं कमालीची कठोरता दाखविली. महादेवभाईच्या मृत शरिराचें दहन आगाखान पॅलेसच्या कंपौंडांत करण्यांत आलें. गांधींनीं या प्रसंगीं महादेवभाईंच्या पत्नीला सांत्वनासाठीं जी तार केली तीहि तिला सरकारनें वेळेवर मिळूं दिली नाही. या तारेंत गांधींनीं लिहिलें होतें कीं, "महादेवाला योग्याचें मरण आलें. देशभक्ताचें मरण लाभलें, शोकाला अवसर नाहीं. अशा धीरोदात्त मृत्यूबद्दल आनंदच मानला पाहिजे."

### कस्तुरबांचा मृत्यु

कस्तुरबा यांचें वय गांधींच्या इतकेंच म्हणजे ७४–७५ वर्षांचें या वेळी झालें होतें. त्या गांधींपेक्षांहि अधिक थकल्या होत्या. आयुष्यभर त्यांनीं गांधींची मनोभावें सेवा केली. गांधींचे तुरुंगवास आणि त्यापेक्षांहि त्यांचे उपवास यामुळें यांचे मनावर मोठाले आघात झाले. त्यांनीं एके ठिकाणीं लिहिलें आहे, "मीं पुष्कळ पुराणें वाचलीं पण बापूसारखें तप कोठेंहि पाहिलें नाहीं. ९ ऑगस्ट १९४२ रोजीं सायंकाळी झेंडावन्दनाचा कार्यक्रम मुंबईस त्यांचे अध्यक्षतेखालीं झाला. सरकारनें लागेच त्यांना पकडून गांधीचेजवळ आणून ठेवलें. तेथें त्यांची प्रकृति अधिकाधिकच बिघडत चालली. त्याचा विश्वास एका वैद्यावर होता पण त्याचें औषध तुरुंगात कस्तुरबांना मिळूं शकत नव्हतें कारण सरकारनें असें ठरविलें होतें की, गांधी आणि त्याच्या मंडळींची बाहेरच्या माणसांशीं कोणत्याहि कारणानें भेट होऊं द्यावयाची नाहीं. शेवटींशेवटीं त्या जेव्हां अत्यवस्थ झाल्या त्या वेळीं त्यांच्या वैद्याला आगाखान पॅलेसमध्यें जाऊं देण्यांत आलें. पण रोग्याजवळ त्याला बसून राहतां येत नव्हतें याबद्दल गांधींनीं सरकारकडे खूप तक्रार केली पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. शेवटीं २२ फेब्रुवारी १९४३ रोजीं **महाशिवरात्रीच्या पवित्र दिवशीं** कस्तुरबांचें देहावसान झालें. शेवटीं सरकारला काय वाटलें

कोणास ठाऊक बाहेरील १०० गृहस्थांना कस्तुरबांच्या अंत्यविधीसाठीं आगाखान पॅलेसवर जाऊं देण्यांत आलें.

कस्तुरबांचें गांधीवर जेवढें प्रेम होतें तेवढेंच गांधींचेंहि त्यांच्यावर होतें. ते एकदां म्हणाले की, "कोणी मला सहचारिणीची निवड पुन्हां करावयास सांगितलें तर मी कस्तुरबालाच पसंत करीन आणि तेंहि अनेक जन्मांसाठीं. व्हाइसरॉयनें त्यांना पुढें सान्त्वनाचें जें पत्र पाठविलें त्याला उत्तर देतांना गांधीजी लिहतात कीं "तिची जोड मला अमूल्य होती. तिच्या दृष्टीनें तिचा मृत्यु हा प्राणान्तिक यातनांतून मुक्त करणारा ठरला असला तरी माझ्या कल्पनेपेक्षां माझ्यावर त्या मृत्यूनें जास्त परिणाम केला. तिची इच्छाशक्ति मोठी होती त्यामुळें सत्याग्रहाच्या कलेत ती माझी न कळत गुरु झाली होती."

पतीनें आरंभिलेल्या संग्रामांत त्याच्याच बरोबरीनें पुढाकार घण्याची शक्ति कस्तुरबांच्या अंगीं नव्हती हें खरें; परंतु ईश्वरनिष्ठा, राष्ट्रसेवा, समाजसेवा, साधी राहणी इत्यादि बाबतींत गांधींनीं जो मार्ग निवडला, ज्या हालअपेष्टा सोसल्या, त्या सर्वांत कस्तुरबांनीं अर्धांगी या नात्यानें आपला वांटा स्वेच्छेनें उचलून या युगांतील पतिव्रता धर्माचा आदर्श महिलांपुढें ठेवला. आश्रमांत येऊन राहणाऱ्या लहानथोर कार्यकर्त्यांना त्या मातेप्रमाणें वागवीत असल्यानें त्यांच्या मृत्यूनें आपली आईच गेली असें शेंकडों लोकांना वाटलें. " बा " थोर होत्या पण थोरपणाची जाणीव त्यांस नव्हती. शूर होत्या पण तसें त्या दाखवीत नव्हत्या. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचें स्मारक करण्यासाठीं सव्वा कोटीचा निधि जमविण्यांत आला व तो ९ ऑक्टोबर १९४४ रोजीं गांधीना अर्पण करण्यांत आला. या निधींतून खेड्यांतील स्त्रियांसाठी शिक्षणसंस्था, आरोग्यकेंद्रें काढण्यांत आलेलीं आहेत. गांधींची अशी कल्पना होती कीं, कस्तूरबा विशेष न शिकलेली साधीभोळी पण कार्यतत्पर अशी स्त्री होती. तिच्याच सारख्या अनेक स्त्रिया आपल्याला खेडोपडीं दिसतील त्यांना शिक्षण देऊन स्त्रियांची सेवा करण्यासाठी तयार करावें. विशेषत: आरोग्य, स्वच्छता, स्त्रियांचे रोग ह्यांचें शिक्षण सेविकांना द्यावें. फंडाच्या

व्याजांतून हा खर्च चालावा अशी कल्पना नाहीं. काम चालवावें म्हणजे अधिक फंड मिळूं शकेल. या फंडाची व्यवस्था करण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली आहे. तिचे प्रमुख श्री. ठक्करबाप्पा हे आहेत.

**गांधींची प्रकृति बिघडली**

कस्तुरबांच्या मृत्यूनंतर गांधींची प्रकृति मलेरिया व अनिमिया या रोगांनी (हिंवताप व रक्तक्षय) बिघडली. देशांत चळवळीचें स्वरूप आतां उग्र राहिलें नव्हतें. गांधींच्या पत्रव्यवहाराचाहि सरकारवर परिणाम झाला होता म्हणून सरकारनें गांधींना आणि त्यांचे बरोबरच्या मंडळींना मुक्त करावयाचें ठरविलें. ता. ५ मे १९४४ रोजीं जेल सुपरिटेंडेंटनें गांधींना येऊन सांगितलें कीं, "उद्यां सकाळीं ८ वाजतां तुम्ची मुक्तता होईल. तरी तुम्ही तयारी ठेवा." तुरुंगांतून कैदी सुटतो त्या वेळीं त्याच्या आनंदाला पारावार नसतो परंतु गांधींना आज सुटकेचा आनंद कसा मिळणार होता? कैदेची मुदत संपून ते कांहीं बाहेर येत नव्हते, बाहेरची चळवळहि स्थगित होत चालली होती. सर्वत्र उदास वातावरण पसरलें होतें. आणि विशेष म्हणजे त्यांचे जीवनांतील दोन सहकारी आगाखान पॅलेसमध्यें मृत्यु पावले होते. श्री. महादेवभाई आणि कस्तुरबा यांच्या दहनभूमीवर गांधी रोज पुष्पांजलि वहात असत. ज्यांच्याकडून आजपर्यंत सेवा घेतली त्यांच्या समाधीवर ते भक्तियुक्त अंतःकरणानें पुष्पें वहात होते. आतां त्या स्थलाचें नित्य दर्शन त्यांना अंतरणार होतें. मोठ्या जड अंतःकरणानें ता. ६ ला सकाळीं आगाखान वाड्यांतून ते बाहेर पडले. आणि विठ्ठलदास ठाकरसी यांच्या **पर्णकुटी** नांवाच्या बंगल्यांत राहावयास गेले. ता. १४ पासून प्रकृतिस्वास्थ्याकरितां त्यांनीं मौन धारण केलें. नंतर मुंबईजवळच्या जुहू गांवीं ते जाऊन राहिले. हें गांव समुद्रकिनारीं वसलेलें आहे, येथील हवा आरोग्यवर्धक आहे. येथें त्यांच्या भेटीकरितां देशांतील शेकडों लोक येत असत. मुंबईस राहून प्रकृति सुधारल्यानंतर ते डॉ. दिनशा मेथा यांच्या निसर्गभुवनांत पुण्यास जाऊन राहिले. तेथें त्यांना कॉंग्रेसचे कार्यकर्ते नेहमीं भेटावयास येत. देशामध्यें जें प्रचंड

आंदोलन झालें त्यांत भूमिगत राहून काम करण्याची जी पद्धत सुरू झाली होती, रूळ उघडून टाकणें, पोष्टाच्या पेट्या जाळणें हे प्रकार तुम्हांला संमत आहेत का ? असेहि प्रश्न त्यांना विचारण्यांत आले. गांधींनीं या प्रश्नांचीं उत्तरें स्पष्टपणें दिली नाहींत. ते म्हणाले कीं," मजजवळ चांगला पुरावा आल्याशिवाय नुसत्या सांगोवांगीवर विश्वास ठेवून मी कोणालाहि दोष द्यावयास तयार नाहीं. त्यांचें लक्ष मागच्यापेक्षां पुढच्या कठिण प्रसंगाकडे जास्त वेधलें गेलें होतें. सरकार हिंदुस्थानसंबंधानें कांहींतरी करणार हें स्पष्ट दिसत होतें. स्वराज्याचे हक्क देतांना हिंदुस्थान अखंड आणि बलिष्ठ न रहावा याची तरतूद इंग्लिश मुत्सद्यांनीं चांगलीच चालविली होती. मुसलमानांना तें पाकिस्तानची मागणी करण्यास उतेजन देत होतें. हें उत्तेजन सरळ न देतां आडवळणानें देण्यांत येत होतें, त्याचा फायदा बॅ. जिनांनी भरपूर घेऊन पाकिस्तानची आपली मागणी कायम केली. हिंदु व मुसलमान दोन राष्ट्रें आहेत तीं एक होणें शक्य नाहीं, देशाची विभागणी केल्याशिवाय शांतता प्रस्थापित होणार नाहीं असें जिना आणि त्यांचे सहकारी मोठमोठ्यानें बोलूं लागले. गांधींनीं जिनांची भेट घेऊन त्यांची समजूत करण्याचा शेवटचा प्रयत्न केला. पण जागृत असलेल्या माणसाला जागा कोण करूं शकणार ? आतां यापुढें गांधीजीवन म्हणजे हिंदुमुसलमानांत सलोखा निर्माण करण्याचा बहुविध प्रयत्न या एकाच गोष्टीनें व्यापलेलें दिसेल ! ते एकी करण्याचा जों जों प्रयत्न करीत तों तों ती दूर दूर जात होती. कारण इंग्रज आणि मुसलमान आतां हिंदुस्थानच्या अखंडत्वावर घाव घालण्यास सिद्ध झाले होते.



# २२. अखेरचे दिवस

" परिविधि उफराठा जाहला स्पष्ट जेथें।
मनुजकर यशस्वी काय होणार तेथें॥ "

### जिनांना झुकतें माप

महायुद्धांत इंग्रजांना जरी जय मिळाला तरी ते शक्तिहीन झाले होते. हिंदुस्थानचा राज्यकारभार लष्कराच्या बळावर चालविणें त्यांना शक्य नव्हते म्हणून त्यांनीं हिंदुस्थानला स्वराज्य द्यावयाचें ठरवून टाकलें. याच वेळी इंग्लंडमध्यें निवडणूक होऊन सोशॅलिस्ट पक्ष अधिकारावर आला. या पक्षानें स्वराज्यदानाचें कार्य झटपट उरकायचें ठरविलें व मंत्रिमंडळांतील तीन सभासद हिंदुस्थानांत पाठविले. या तीन मंत्र्यांनीं कॉंग्रेस आणि मुस्लीम लीग या संस्थांशीं स्वराज्यदानाबद्दल पुष्कळ दिवसपर्यंत वाटाघाटी केल्या. त्या इतक्या कंटाळवाण्या झाल्या कीं, कोणालाहि त्या पुढें चालवाव्यात असे वाटत नव्हतें. पण इंग्रज मोठे चिवट. ते वाटाघाटींना कधींच कंटाळत नाहींत. या वाटाघाटीचा इत्यर्थ एवढाच होता कीं, जिनांना हिंदुस्थानचे दोन तुकडे करावयास हवे होते व कॉंग्रेसला ते नको होते. या तीन मंत्र्यांनीं गांधींजवळ पुष्कळ चर्चा केली. गांधींचें आणि कॉंग्रेसचें बोलणें, न्यायाचें, सरळपणाचें आणि व्यवहारी दृष्टीनें उपयुक्त असें होतें. तें त्रिमंत्र्यांना पटलें पण त्यांना जिनांना नाखूष करावयाचें नव्हतें. म्हणून शेवटीं कॉंग्रेसला पाकिस्तानच्या योजनेला निरुपायाने संमति द्यावी लागली. ज्या दिवशीं पाकिस्तानची योजना मान्य झाली त्या दिवशीं पं. जवाहरलालजीचें भाषण रेडिओवर जें झालें त्यांत खेद, निराशा या भावना स्पष्टपणें व्यक्त झाल्या होत्या. कांहीं नाहीं त्यापेक्षां जें मिळालें आहे तें घेऊन आपली शक्ति वाढविण्याचा त्यांनीं संकल्प केला. गांधींना खंडित हिंदुस्थानबद्दल जें दुःख झालें तें ' हरिजन 'मधल्या लेखांतून आपल्याला समजूं शकतें.

**माणूसकीला बट्टा**

हा प्रसंग घडण्याचे अगोदर मुस्लीम लीगने २९ जुलै १९४५ रोजी ( Direct Action ) **प्रत्यक्ष कृतीचा** कार्यक्रम करावयाचें ठरविलें व त्याकरितां १६ ऑगस्ट हा दिन मुक्रर केला. मुस्लीम ली.चें म्हणणें असें होतें कीं, आम्ही पाकिस्तानची मागणी मागून थकलों आहोंत. आमच्या मागणीला कॉंग्रेस संमति देईल असें वाटत नाही. तेव्हां आम्ही स्वस्थ बसणार नाहीं. पाकिस्तान मिळविण्याचे एक सोडून शंभर मार्ग आम्हांला माहीत आहेत. शिवाय आम्ही कांहीं अहिंसेला बांधले गेलेलों नाहीं. हा ठराव पास केल्यानंतर मुस्लीम लीगनें कलकत्त्यात मोठा प्रलय करण्याची गुप्तपणें तयारी केली. तेथें लीगचेंच मंत्रिमंडळ होतें. त्यानें शक्य तितकें साहाय्य दंगेखोरांना दिलें. पेट्रोलचे डबे, नानाविध शस्त्रास्त्रें दंगेखोरांना पुरवलीं आणि मग १६ ऑगस्ट रोजीं एकाएकीं हजारों मुसलमानांनीं शस्त्रें घेऊन हिंदूंच्या कत्तलीस आरंभ केला. ही कत्तल इतकी भीषण झाली कीं, तैमूर-लंगानें लाजेनें मान खालीं घालावी ! कत्तल करून हे लोक राहिले नाहींत तर या लोकांनीं हिंदूंची घरें जाळून टाकलीं, स्त्रियांवर अत्याचार केले. ज्याच्या योगानें हिंदूना दहशत बसेल असें सर्व कांहीं केलें. हेतु हा कीं, हिंदूंनीं भिऊन कलकत्ता शहर मुसलमानांना द्यावें. दोन दिवसांनीं हिंदु सावध झाले व त्यांनीं मग मुसलमानांचें उट्टें फेडलें. सव्याज परत दिलें म्हणा ना. इकडे बिहारच्या लोकांनीं त्या प्रांतांतील मुसलमानांवर हल्ले करून त्यांच्या कत्तलीस आरंभ केला. आणि ही कत्तल कलकत्त्यांतील कत्तलीलाहि माग सारते कीं काय असा प्रसंग येऊन ठेपला. हाच प्रकार जर चालू दिला तर सबंध हिंदुस्थानांत गांवोगांवी रक्तपात होऊन अशांततेचें राज्य पसरेल असें कॉंग्रेसनेत्यांना वाटून त्यांनीं बिहारमधील कत्तल लष्कराच्या मदतीनें थांबविली. कत्तल थांबली पण आपणांस सूड उगवूं दिला नाहीं म्हणून बिहारी हिंदु कॉंग्रेसवर चिडले. या कामांत गांधींचाहि बराच हात होता म्हणून गांधींनाहि अप्रियता स्वीकारावी लागली.

**शिरकाण**

मुसलमानांचा हिंदूंची कत्तल करण्यात दहशत वर्सविण्याचा जसा डाव होता तसा आपली लोकसंख्या वाढवून आपली सत्ता स्थापन करण्याचाहि त्यांचा हेतु होता. पूर्व बंगालमध्यें मुसलमानांची वस्ती मोठी होती. परंतु हिंदु कांहीं कमी नव्हते. ह्या हिंदूंना मारून टाकावें किंवा त्यांना बाटवून मुसलमान करावें या उद्देशानें पूर्वबंगालमध्यें कलकत्त्यासारखे दंगधोपे, जाळपोळ करण्याचा विचार मुस्लीम लीगनें केला. त्याला साहाय्य मंत्रिमंडळानें दिलें. मग काय पूर्वबंगाल्यांतील नौखोली आणि टिपेरा या जिल्ह्यांत मुसलमानांनीं हिंदूंच्या सर्रास कत्तली केल्या. पुष्कळ हिंदु भयानें घरेंदारे सोडून पळून गेले. कत्तलीनंतर तरुण स्त्रियांचीं मुसलमानांशीं जबरदस्तीनें लग्नें लावण्यांत आलीं. पुष्कळांना सक्तीनें कलमा पढावयास लावला. हिंदूंचीं घरें जाळतां आलीं तेवढीं जाळलीं. ह्या घोर प्रकारांची बातमी सरकारनें चार दिवस दडपून ठेवली. शेवटीं हे प्रकार जेव्हां बाहेर आले; तेव्हां हिंदुस्थानला जबरदस्त धक्का बसला. स्वराज्य जवळ आलें असतां हे प्रकार घडावेत ही दैवाची लीलाच म्हटली पाहिजे. मुस्लीम मंत्रिमंडळानें नंतर सारवासारव करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. जाळपोळीनंतर मग व्यवस्थेकरितां पोलिस पाठविले. आतां या प्रकारांना आळा कसा घालावा हेंच लोकांना समजेना. इंग्रज गव्हर्नर या प्रसंगीं जाणूनबुजून तटस्थ राहिला. सिंधमध्यें हाच प्रकार होणार होता. पण तेथील इंग्रज गव्हर्नराच्या अंगांत माणुसकी होती आणि त्यानें सिंधी मुसलमानांना कह्यांत ठेवलें होतें म्हणून हिंदु थोडा काळ बचावले.



# २३. निर्भय आणि झुंझार वृत्ति

## एकला चलो रे

आचार्य कृपलानींनी गांधींबद्दल असें म्हटलें आहे कीं, " हा मनुष्य असा आहे कीं, तो कार्य यशस्वी तरी करील व तें होत नसेल तर आपला तरी अंत करून घेईल पण स्वस्थ बसणार नाहीं." हिंदुस्थानचें राजकीय आकाश आतां फाटलें होतें. त्याला ठिगळ तरी कोठें लावावें असा प्रश्न उत्पन्न झाला होता. कोणत्याहि पक्षांत याला आवरण्याची शक्ति नव्हती. इंग्रज तर ही दुही मजेनें पाहात होते. अशा प्रसंगीं रवींद्रांनीं एका गाण्यांत म्हटल्याप्रमाणें गांधीनीं एकट्यानें प्रसंगाला तोंड देण्याचें ठरविलें आणि लोक नको नको म्हणत असतां ते बंगालमध्यें गेले. कलकत्त्यांतील आपल्या मित्रांना त्यांनीं आपला बेत सांगितला. ते म्हणाले नौखोली आणि टिपेरा या भागांत शांतता प्रस्थापित करण्यासाठीं मी पायीं आणि एकटा जाणार आहें. ही कल्पना गांधींच्या मित्रांस व कॉंग्रेसनेत्यांस मुळींच पसंत पडली नाही. ते म्हणाले " तुम्ही तेथें जाणें म्हणजे मृत्यूच्या खाईंत पडणें होय. मुंबईंत तुम्ही दंग्याच्या ठिकाणीं गेलां होतां पण मुंबई ही आपली होती. आज नौखोलींतील मुसलमान वेडेपिसे झाले आहेत." पण गांधी कोणाचा सल्ला न एकतां पायीं जाण्यास निघाले. चिटणीस प्यारेलालनाहि त्यांनीं बरोबर घेतलें नाहीं. एक दुभाषा तेवढा बरोबर घेतला. याला म्हणतात निर्भय निश्चय.

## नौखालींची महायात्रा

दांडी यात्रा सुरू करावयाच्या अगोदर ज्याप्रमाणें यात्रेचा नकाशा तयार करण्यांत आला होता त्याप्रमाणें नौखोली आणि टिपेरा जिल्ह्यांत कसें कसें फिरावयाचे, कोणत्या विभागाला भेट द्यावयाची हें गांधीच्या मित्रांनीं नीट विचार करून कार्यक्रम ठरवून दिला. नंतर एक दुभाषा घेऊन गांधी पायीं यात्रा करावयाला निघाले. दांडी यात्रेचा देखावा मोठा भव्य होता. ज्या

प्रदेशांतून गांधी गेले तो प्रदेश त्यांच्याविषयीं आस्था, प्रेम, आदर बाळगणारा होता. आज शत्रूच्या मुलखांत म. गांधी एकटे जावयास निघाले होते. पिसाळलेल्या कुत्र्याजवळ जाणें आणि नौखोलींत हिंदूनें पाय ठेवणें हें सारखेच धोक्याचें होतें. पण म. गांधींनी हाहि धोका पत्करावयाचें ठरविलें होतें. भयानक अंधारांत गांधी कसे चालणार हा प्रश्न सामान्य माणसांना पडला होता. पण ज्याच्याजवळ उच्च ध्येयाचा अखंड नंदादीप आहे तो गिरिकंदरांत कोठेंहि जावो त्याचा मार्ग प्रकाशित आपोआप होतो.

**मुसलमानांचें हृदय हलाविलें**

ते एकाद्या खेड्यांत गेले म्हणजे मुसलमानांच्या घरांत हटकून उतरत. गांधी आले असें कळतांच गांवांतील मुसलमान एकत्र होत. मग गांधींचें व्याख्यान होई. ते मुसलमानांना सांगत तुम्ही आणि हिंदु परवांपर्यंत भावा-भावासारखे नांदत होतां. उत्सवांत एकत्र खेळत—बागडत—होतां, शेतांत एकत्र राबत होतां, लग्नकार्यांत एकमेकांना मदत करीत होतां आणि आज काय स्थिति झाली आहे ? हिंदूंना तुमच्या गांवांत येण्यास भीति वाटते ही स्थिति चांगली आहे काय ? माणसानें माणसास भ्यावें हें कोणालाच भूषणावह नाहीं. तुम्ही जबरदस्तीनें पुष्कळ हिंदूंना मुसलमान केलें. कुराणशरीफ अशी तुम्हांला आज्ञा करीत नाही, तरी आतां तुम्ही हिंदूंना धीर देऊन आपल्या गांवांत बोलाविलें पाहिजे आणि त्यांचेजवळ प्रेमानें वागले पाहिजे.

**हिंदूंत धैर्य जागृत केलें**

हिंदूंना ते सांगत मुसलमानांना भिऊन पळून जातां हें तुम्हांला शोभत नाहीं. मर्दासारखे तुम्ही आपल्या गांवांत राहून जुलूम करणाराला विरोध केला पाहिजे. तुम्ही जर जुलमाचा प्रतिकार केला असतां तर आतांच्या इतके अत्याचार झाले नसते. तरी आतां धीर धरून घरीं परत या आणि आपले कामधंदे नेहमींप्रमाणें सुरू करा.

ज्या विभागांत रामनाम म्हणणाराच्या डोक्यांत सोटा बसे तेथें आज गांधी निर्भयपणें उघड्यावर रघुपति राघव राजाराम हें भजन म्हणत होते.

व मुसलमान हें भजन चालू देत होते. हा प्रकार हिंदूनीं पाहिल्यावर ते हळूहळू आपल्या गांवांत येऊन राहूं लागले. मुसलमानांच्या विरोधी भावना तितक्यापुरत्या कां होईना शांत झाल्या व हिंदूंमध्यें आपल्या घरीं जाऊन राहण्याचें धैर्य आलें. गाढ अंधःकारांत आशेचे थोडेच कां होईना पण तेजस्वी किरण या यात्रेंत गांधींनीं चहूंकडे पसरविले.

### चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती

ही यात्रा चालू असतां गांधींनीं पुढें पुढें वाहाणा घालावयाचें सोडून दिलें. पूर्व बंगाल म्हणजे नद्यांचा प्रदेश, हाके हाकेवर लहान मोठे बांबूंचे पूल आढळतात. यावरून चालतांना पाय लटपटत असत. यावरून चालणें गांधींना कठिण जात होतें पण गांधी तसेंच रखडत ऊन, वारा, पाऊस खात चालत होते. केवढा तो आत्मविश्वास, केवढी ती ध्येयनिष्ठा आणि किती अलोट धैर्य! आज मानवी प्रयत्नांची शर्थ झाली होती. तपस्या लीन होऊन ह्या म्हाताऱ्याच्या चरणीं लागली होती. ईश्वरनिष्ठेच्या विजयाची पताका त्या पावसाळी हवेंत विद्युल्लतेसारखी चमकत होती. काळ्याकुट्ट मेघांचें नर्तन आकाशांत सुरू झालें म्हणजे इतर पक्षी घाबरून घरट्यांत जाऊन बसतात परंतु अशाच वेळीं मोर आपला अलौकिक सहस्र नेत्रांचा पिसारा उभारून निर्भय-पणें नाचत असतो. जितकें संकट मोठें तितकें म. गांधींचें धैर्य अलोट. आज कठिण हृदयाचा फत्तर फोडून आंतला प्रेमाचा झरा शोधण्यास ते निघाले होते. जगाच्या इतिहासांत ह्या प्रसंगाला तोड दिसत नाहीं. कालाचा ओघ विरुद्ध होता तेव्हां गांधींना संपूर्ण यश येणें शक्य नव्हतें. पण तेवढ्यापुरता त्यांनीं मुसलमानी हृदयाचा पालट केला आणि हिंदूंत धैर्यवृत्ति जागृत केली हा लाभ त्या काळांत तरी असामान्य समजला पाहिजे.

### यादवीचें भीषण दर्शन

यानंतर कलकत्ता आणि दिल्ली येथें हिंदु मुसलमानांचे दंगे झाले. कत्तली कोणत्याहि उपायानें थांबत नाहींत हें पाहातांच ते ईश्वराला शरण गेले आणि आपला सर्व भार त्यांनीं देवावर टाकला. देवावर भार टाकाव-

याचा तर देहाची ममता सोडावी लागते व ती सोडण्याकरितां त्यांनीं उपो-षण आरंभिलें. ह्यामुळें दिल्ली आणि कलकत्ता येथील कत्तली थांबल्या पण हिंदूंचा राग गांधींवर वाढला. ते म्हणत मुसलमानांना अद्दल घडावी असें आम्ही वागत असतां तुम्ही उपवास करून आमचेवर दडपण कां आणतां ? वरवर पाहाणारास ही विचारसरणी बरोबर वाटते, परंतु गांधींची दृष्टि दूरवर पोहोंचली होती. दिल्ली आणि कलकत्ता येथील कत्तली जर चालू दिल्या तर त्याची सांथ हिंदुस्थानभर पसरेल. मानवतेचा लोप होईल आणि पुढें इतर जातीत कलह माजून देशांत रक्ताच्या नद्या वाहतील. हा अनर्थ गांधींच्या ह्या उपवासानें थांबला. टळलेल्या संकटाची किंमत भावनेच्या भरांत माणसाला होत नाहीं पण शांत मनानें विचार केला तर गांधींनीं या उपवासानें हिंदुराष्ट्रावर फार मोठे उपकार केले आहेत हें आज जरी लोकांना न पटलें तरी भावी पिढ्या गांधींची थोरवी ओळखून आपली कृतज्ञता व्यक्त करतील यांत संशय नाहीं.

पूर्व बंगालप्रमाणेंच पश्चिम बंगाल आणि सिंध येथें हिंदूवर अत्याचार होऊं लागले तेव्हां गांधींनीं पाकिस्तानांत एकटें जावयाचें ठरविलें होतें. हिंदुस्थानांत ज्याप्रमाणें मुसलमानांच्या इस्टेटी परत देण्याविषयीं व त्यांच्या उध्वस्त मशिदी बांधून देण्याविषयीं हिंदु लोकांना सांगत होते त्याप्रमाणें पाकिस्तानांत जाऊन ते मुसलमानांना हिंदूंचें रक्षण करण्याचा उपदेश करणार होते. पण पाकिस्तानांत जाण्याचा संकल्प पुरा व्हावयाचा नव्हता. गांधी एका तऱ्हेनें विचार करीत होते आणि दैवाचा बेत निराळाच चालला होता.

---

## २४. मृत्यूच्या घिरट्या

" हुरहुर जनतेच्या तापलें तेल कानीं ।
थर थर थर पावे ओतितां कंपवाणी ॥ "

**सीझरचा खून**

रोमन साम्राज्याचा अद्वितीय सेनानी ज्यूलियस सीझर यानें युरोप आणि आफ्रिका या दोन खंडांतील प्रदेशावर आक्रमण करून रोमन साम्राज्याची सत्ता आणि वैभव खूप वाढविलें. कर्तबगार पुरुषाकडेच शेवटी अधिकार येत असतात. त्याप्रमाणें ज्यूलियस सीझर हा रोमन साम्राज्याचा सर्वाधिकारी बनला. बाहेरच्या शत्रुंचा पाडाव होत असतां खुद्द रोम शहरांतच त्याची सत्ता उलथून पाडणाऱ्या शक्ती एकत्रित होत होत्या. सीझरचा खून करण्याचे कट पुष्कळ दिवसांपासून तयार होत होते. शेवटीं या कटाच्या भाषेला तोंड फुटून त्याची चर्चा चव्हाट्यावर होऊं लागली. सीझरच्या हितचिंतकांनीं त्याला ह्या कटाबद्दल इषारा दिला पण तो त्यानें मुळीच मानला नाहीं. तो म्हणे, " **भित्रा मनुष्य प्रत्यक्ष मरणाच्या अगोदर किती वेळां भीतीमुळें मरत असतो.** निर्भय आणि शूर पुरुष आयुष्यांत एकदांच मरतो. मृत्यु आणि मी सख्खे भाऊ आहोंत आणि त्यांत **मी वडील** आहे, " अशा तऱ्हेची विचारसरणी स्वीकारून सीझर निःशंकपणें वावरत होता. आणि त्याचाच फायदा त्याच्या शत्रूंनीं घेऊन त्याचा खून केला.

हिंदुस्थानांत याच प्रसंगाची—इतिहासाची—पुनरावृत्ति १९४७ सालात जानेवारी महिन्यांत झाली. गांधी हिंदुस्थानात **हिंदु मुसलमानांची दिलजमाई** प्रस्थापित करण्याचा प्राण प्रणाला लावून प्रयत्न करीत होते. त्याचा विपरीत ग्रह कांहीं हिंदूंनी करून घेतला. त्यांना वाटे कीं, हा म्हातारा जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत हिंदूंना तरुणोपाय नाहीं. ह्याला एकदां नाहींसा केला म्हणजे मग मुसलमानांना आम्ही हां हां म्हणतां नामोहरम करूं. अशा तऱ्हेचे विचार

हिंदु समाजांत पसरत चालले होते. गांधींच्या खुनाची भाषा सर्वत्र ऐकूं येत होती. एक दिवस दिल्ली येथें ते प्रार्थना करीत असतां त्यांच्यावर बॉम्ब फेंकण्याचा अयशस्वी प्रयत्न झाला. त्या वेळेला लोकांची खात्री होऊन चुकली की आज नाहीं उद्यां गांधींचा प्राण घेतला जाणार. नेहरू सरकारनें त्यांना संरक्षण देण्याची तयारी केली, परंतु गांधींनीं संरक्षण घेण्यास कसून विरोध केला. ते म्हणत "देवाला जोंपर्यंत मजकडून सेवा घ्यावयाची आहे तोंपर्यंत माझें कोणीहि वाईट करूं शकत नाहीं. आणि ज्या वेळी त्याला माझी ही सेवा नकोशी होईल त्या वेळेला माझें रक्षण करण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ होतील." अशा परिस्थितींत गांधींचा जीव वांचणें कठिण झालें होतें.

**सूर्य अस्तास गेला**

शेवटीं ३० जानेवारी १९४८ रोजी सायंकाळी ५–३० वाजतां ते प्रार्थनेला निघाले असतां वाटेंत एक सुदृढ इसम गर्दीतून वाट काढीत आला. आणि त्यांच्यासमोर उभे राहून त्यानें पिस्तूल झाडलें. गांधीना त्या पिस्तुलांतील तीन गोळ्या लागल्या आणि ते 'हरे राम' म्हणून कोसळून खालीं पडले. हें काय झालें तें कोणालाच कळेना. शेवटीं गांधींना उचलून त्यांच्या निवासस्थानीं आणण्यांत आलें. डॉक्टर लोक भराभर धावले. धुगधुगी थोडीशी राहिली होती परंतु त्यांची प्राणज्योति केव्हांच मालवली होती.

**महायात्रा**

सायकाळचा रेडिओ चालूं होता तो एक क्षणभर थांबला आणि त्यानें जगाला बातमी दिली. "फार मोठ्या दुःखाची गोष्ट आहे कीं, गांधींना गोळी घालून ठार मारण्यांत आलें आहे." या वार्तेनें देशी, परदेशी लोकांना मोठा धक्का बसला. लोक भांबावून गेले. रस्त्यांतून वेडेपिसे होऊन फिरूं लागले. ती वेळ सायंकाळची होती. रस्त्यांत दिवे लागले होते तरी लोकांच्या डोळ्या-पुढें काळाकुट्ट अंधार पडला होता. आणि त्यांना कांहींएक सुचेनासें झालें. ठिकठिकाणीं थव्याथव्यानें जमून लोक चर्चा करीत होते—कोणीं हा खून केला—आपल्या राष्ट्रावर केवढी आपत्ति आली—राष्ट्राचें भूषण गेलें—

सर्व हिंदुस्थानला कह्यांत ठेवणारी व्यक्ति नाहींशी झाली. लगेच दिल्लींत मंत्रिमंडळाची सभा झाली. त्यांनी एकत्र बसून पुढील तजविजीसंबंधानें निर्णय घेतला आणि तो रात्रीच्या सभेंत रेडिओवरून सर्वांना कळविला. पं. नेहरू यांनीं या वेळीं पुत्रधर्म पाळला. गांधींनी त्यांनाच आपलें राजकीय वारस ठरविलें होतें. जवाहरलालांच्या हातांत आज सर्व सत्ता होती. त्या सर्व सत्तेचा उपयोग करण्याचें त्यांनी ठरविले होते. गांधींची प्रेतयात्रा जितकी भव्य करतां येईल तितकी करण्याची त्यांनी एका रात्रींत तयारी केली. ३१ जानेवारीला सकाळी गांधींची प्रेतयात्रा निघाली. यात्रेंत कमींत कमी ५ लाख लोकांनीं भाग घेतला असावा असा निरीक्षकांनी अंदाज केला. ज्यांना ज्यांना म्हणून शक्य होतें ते विमानानें, गाडीने, मोटारनें गांधींचे अंत्यदर्शन घेण्याकरितां धावत आले. राजकारणी मुत्सद्दी जसे धावले तसे खेड्यांतील अशिक्षित समाजहि आपल्या हितचिंतकाचें दर्शन घेऊन पुनीत होण्याकरितां जिवाचें रान करीत होते.

### चंदनांत चंदन जळलें

या यात्रेबरोबर हिंदी सरकारचें चतुरंग दल चाललें होते. त्याचप्रमाणें अनेक स्वयंसेवक पथके निघालीं होती. स्त्रियाहि प्रचंड संख्येने उपस्थित राहिल्या होत्या. एका भव्य रथावर गांधींचें शव पुष्पहारांनी मंडित करून ठेवलें होतें आणि त्या रथाबरोबर मंत्रिमंडळांतील सर्व लोक चालले होते. चार तास यात्रा चालून यमुना नदीच्या घाटावर आली. तेथे दहनाकरितां एका रात्रींत ऐसपैस चबुतरा तयार करण्यांत आला होता. चंदनाच्या चितेवर चंदनासारख्या झिजलेल्या गांधींच्या देहाला त्यांच्या पुत्राकडून अग्नि दिला गेला या यात्रेंत हिंदी लोकांनीं ज्याप्रमाणें भाग घेतला त्याप्रमाणें इंग्रज गव्हर्नर जनरल माऊंट बॅटन आणि त्यांची पत्नी यांनीं भाग घेतला आणि तेही दहन चालू असतां इतर मंत्र्यांप्रमाणें जमिनीवर बसले होते.

### अलौकिक अस्थिविसर्जन

जवाहरलालनी जाहीर केले होते की गांधींच्या अस्थींचे विसर्जन

तेराव्या दिवशीं होईल. तोंपर्यंत राष्ट्र सुतकांत राहील. या कालांत ऑल इंडिया रेडिओवर गांधींसंबंधीं भाषण आणि रघुपती राघव राजाराम-सारखीं भजनें फक्त ध्वनिक्षेपित केलीं जात होतीं. गांधींसंबंधीं बहुतेक वर्तमानपत्रांनीं विशेष अंक काढले होते. जवाहरलाल नेहरूंकडे जगांतील सर्व राष्ट्रांचे दुखवटयाचे संदेश आले होते. त्यांत गांधींची महति गाईली होती. जगांत शांतता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करणारी अलौकिक विभूति अशा अर्थाचीं विशेषणें अधिकारी पुरुषांनीं, राजांनीं गांधींना लाविलीं होतीं. आणि विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं बहुतेक सर्व राष्ट्रांनीं गांधींच्या सन्मानार्थ आपली राष्ट्रीय निशाणें अर्धीं उतरवली होतीं. राष्ट्रीय निशाण अर्धें खालीं घेणें हा मान फक्त राष्ट्रांतील सत्ताधारी लोकांनाच मिळतो. परराष्ट्रांतील अनधिकारी अशा व्यक्तीचा सन्मान आजपर्यंत अशा तऱ्हेनें झालेला नाहीं.

तेराव्या दिवशीं गांधींच्या अस्थींचें विसर्जन अलाहाबाद येथें गंगा-यमुनेच्या संगमावर मोठया थाटानें करण्यांत आलें. जवाहरलालसकट बहुतेक मंत्री तेथें उपस्थित होते. गांधींच्या अस्थींचे अवशेष सर्व हिंदुस्थानांतील सर्व जिल्हयांना वाटून देण्यांत आले आणि त्या जिल्हयांनीं मोठया मिरवणुका काढून आपल्या पवित्र नद्यांच्या कांठीं जाऊन विसर्जन केलें.

**स्मारक**

तेरा दिवस संपल्यानंतर गांधींच्या स्मारकाचा विचार कॉंग्रेसनें केला. कित्येक कोटींचा फंड आतां जमविला जाणार आहे. हा फंड गांधींचे पुतळे किंवा इमारती यांत खर्च न होतां गांधींच्या विचारांचा प्रचार देशांत आणि परदेशांत पसरविण्याचा मध्यवर्ती मंडळाचा विचार आहे.

---

# २५. विशेष व्यक्तिपरिचय

म. गांधी यांच्या चरित्राचा धावता चित्रपट आपण आतांपर्यंत पाहिला. पहिल्या प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें गांधीना समजावयास लागल्यापासून त्यांनी आपल्या आयुष्यांतील प्रत्येक क्षण वांया जाऊं दिलेला नाही. त्यांना दीर्घ आयुष्याचा लाभ झालेला होता. यामुळें त्यांनीं कार्याचा केवढा डोंगर उभारला असेल याची कल्पना करतां येईल. गांधींची बुद्धि सर्वस्पर्शी असल्यामुळें त्यांच्या कार्याचा व्यापहि विविध प्रकारचा होता. त्याच्या काळांत मोठ-मोठ्याल्या राजकीय, सामाजिक गोष्टी नित्य घडत होत्या. यामुळे गांधी-चरित्राचा थोडक्यांत परामर्श घेणें मला तरी कठिण वाटतें. जे प्रसग जीं नांवें आमच्या पिढीला सुपरिचित ती नव्या पिढीला अपरिचित साह-जिकच असणार तेव्हां त्यांचा परिचय करून दिल्याशिवाय एकंदर कथानका-वर प्रकाश पडत नाहीं. व त्या गोष्टीबद्दल सविस्तर लिहावें तर पुस्तकाची मर्यादा आड येते. अशा स्थितींत कांहीं कांही गोष्टी मुद्दाम दृष्टिआड कराव्या लागल्या आहेत. इतरत्र आतां आपण गांधींच्या व्यक्तीबद्दल, स्वभावाबद्दल, त्यांच्या विविध उद्योगांबद्दल आणि त्यांना प्राप्त झालेल्या ज्ञानाबद्दल चार शब्द लिहून हें प्रकरण आणि त्याबरोबर हा ग्रंथ समाप्त करतों.

**व्यक्तिस्वरूप**

गांधी हे मध्यम उंचीचे, किरकोळ बांध्याचे गृहस्थ होते. त्यांचें स्वरूप डोळयांत भरण्याजोगें असें कांहीं नव्हतें. रंगहि आकर्षक असा नव्हता. अशा त्या दुर्बळ आणि अनाकर्षक दिसणाऱ्या व्यक्तीच्या ठायी अलौकिक असे कांही गुण असतील अशी कांहीं कोणालाहि कल्पना होत नसे. एका इंग्लिश वार्ताहरानें गांधींसंबंधी असें लिहिलें आहे की, " ज्या वर्गाचा प्रतिनिधि म्हणवून घेण्यांत ते स्वतःला भूषण मानीत त्या खेडवळ शेतकऱ्या-सारखे ते दिसत. फक्त त्यांचा पोषाख हा खेड्यांतील शेतकऱ्यांपेक्षां कितीतरी पटीनें स्वच्छ आणि नेटका असे.

लहानपणच्या पोषाखाचा विचार सोडून देऊन गांधी बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानांत आले त्या वेळेपासून त्यांनीं पुढें कित्येक वर्षे युरोपिअन पद्धतीचा पोषाख घालण्याचा क्रम ठेविला होता. १९०४ सालीं त्यांनीं वकिली सोडून ते शेतकाम करावयास लागल्यावर त्यांनी काठेवाडी धोतर, अंगरखा आणि फेटा घालण्यास सुरुवात केली. याच पोषाखानें ते हिंदुस्थानांत पुष्कळ दिवस वावरत असत. पुढें साबरमतीच्या आश्रमांत हातमाग सुरू झाल्यावर ते खादी वापरूं लागले आणि मग त्यानी अंगरखा टाकून देऊन धोतर, सदरा आणि पांढरी लांबट टोपी वापरण्यास सुरुवात केली. हीच पुढे गांधी टोपी या नांवानें प्रसिद्ध झाली. शर्ट आणि टोपी घालूनच यांनीं असहकारितेचा दौरा चालविला होता. या दौऱ्यांत ओरिसांतील लोकाची विपन्नावस्था पाहून त्यांनीं खेड्यांतील या दरिद्री नारायणाच्या परिस्थितीशी एकरूप होण्याकरितां धोतर, सदरा आणि टोपी यांचा त्याग केला. आणि फक्त कटिवस्त्र धारण केलें. विशेष थंडी पडली म्हणजे ते तेवढ्यापुरती शाल पांघरत असत बाकी वर्षातील बहुतेक काल उघड्या अंगानेंच रहात. अशा रीतीनें सूटबुटापासून कटिवस्त्रापर्यंत ते येऊन पोहोंचले होते. राजकारणांत पडल्यावर त्यांना थोरामोठ्यांच्या, राजेरजवाड्याच्या भेटी घेण्याचा प्रसंग आला पण त्यांनी आपल्या कटिवस्त्राचा त्याग केला नाही. या त्यांच्या 'लुंगीवर' खूप टीका झाली. कोणी त्यांच्यावर बुवावाजीचा आरोप केला. कोणीं त्यांना अशिष्ट म्हटलें पण त्या सर्वांना ते नम्रपणानें सांगत कीं, कांहीं स्टंट करण्याकरितां मी हें कटिवस्त्र धारण केलेले नाहीं. मला हिंदुस्थानातील दरिद्री नारायणाची सेवा करावयाची आहे. तेव्हां त्यांच्या नित्य जीवनाशीं संबध राखण्याकरितां मी हें कटिवस्त्र धारण करीत आहे. ज्याच्या अंतःकरणांत गरिबाबद्दल माझ्याइतकी सहानुभूति नसेल त्यानें माझें या बाबतीत अनुकरण करूं नये.

वस्त्राप्रमाणेंच आहारांतहि गांधी सारखा फरक करीत असत. आपले शरीर सुदृढ आणि कार्यक्षम ठेवण्यावर त्यांचा कटाक्ष होता. म्हणून पौष्टिक

आहार आणि तो कमींत कमी खर्चांत कसा उपलब्ध होईल याचा विचार आणि प्रयोग ते सारखे करीत. विचार करून त्यांनीं असें ठरविलें होतें कीं, चमचमीत पदार्थ तयार करण्यांत वेळ, परिश्रम, पैसा फुकट जातो आणि त्यानें पचनेंद्रियें बिघडतात म्हणून त्यांनीं दूध, पोळी, फळें, पालेभाज्या, मध किंवा गूळ असा आहार ठेवला होता. 'हितभुक् मितभुक्' हा आर्यवैद्यकाचा दंडक त्यांनीं कसोशीनें पाळला होता. साध्या आहारावर त्यांचा जरी कटाक्ष होता तरी आश्रमातील मंडळीस ज्याला जो आहार मानवेल तो घेण्यास ते परवानगी देत. इतकेंच नव्हे तर युक्तआहाराकरितां होणाऱ्या खर्चांच्या बाबतींतहि ते मागें पुढें पाहात नसत.

### त्यांचा दिनक्रम

पहाटेला ते चार वाजतां उठत असत. उठून गुळणा करून आश्रमीय मंडळींबरोबर प्रार्थना करीत. रात्रीं जर भरपूर झोप मिळाली असली तर ते लगेच पत्रांचीं उत्तरें लिहिण्यास बसत. तीं लिहून झाल्यावर मग तोंड वगैरे धुऊन मग सकाळी कांहींतरी खात. या वेळच्या आहाराला दूध, मध, फळें इ. असत. आहार घेतल्यावर—या आहाराला आश्रमांत नाश्ता म्हणतात—ते फिरावयास जात. या फिरण्याच्या वेळीं त्यांचेबरोबर बाहेर गांवचे पाहुणे असत. शिवाय आश्रमांतील मुलामुलींचें लटांबर हें असावयाचेंच. आश्रमांत गांधींना सर्व जण बापू म्हणत. बापूंचा हात धरून चालायची धडपड मुलांमध्यें नेहमीं चाले. फिरतांना ते मुलांबरोबर थट्टामस्करीहि करीत. कधीं त्यांचेबरोबर धावतपळतहि. त्यांची चाल खूप जलद असे. ही चाल एक मैलापुरतीच टिकत असे असे नाही. तरुण वयांत ते दिवसांत पंचवीस तीस मैल चाललेले आहेत. दांडीकूचचे वेळीं त्यांचे अनुयायी चालण्यांत त्यांच्याबरोबर टिकत नसत. असो. फिरून आल्यावर पाहुण्याच्या गांठीभेटी घेत. नंतर मालिश करून घेत. तेल व लिंबू यांच्या मर्दनानें त्यांचें आयुष्य वाढलें असें ते म्हणत. या मालिशनें त्यांच्या शरिराची कान्ती विशेष सतेज दिसे. इतकें वय झालें होतें तरी त्यांच्या शरिरावर सुरकुती म्हणून दिसत नसे.

लो. टिळकांप्रमाणें त्यांस स्नानाकरितां पुष्कळ पाणी लागे. हा स्नानाचा कार्यक्रम आटोपल्यावर मग ते भोजन करीत. भोजनांत दूध, फुलक्या पोळया, फळें, मध, उकडलेल्या भाज्या असे पदार्थ असत. कांहीं काळ त्यांनीं मीठ खाण्याचें सोडलें होतें पण पुढें मिठाची शरिराच्या पोषणास आवश्यकता आहे अशी खात्री झाल्यावर ते तें खाऊं लागले. भोजनोत्तर ते बहुतकरून सूत काढावयास बसत असत व एकाग्रमनानें सूत कातीत असत. आपण देवाची जितक्या भक्तिभावानें पूजा करतों तितक्याच भक्तीनें ते सूत कातीत असत म्हणूनच त्यांच्या शब्दांत एवढें सामर्थ्य उत्पन्न झालें. सूत कातल्यावर ते कांही काल झोपत. झोपेवर त्यांनीं विलक्षण ताबा मिळवला होता. अंथरुणावर पडल्यावर दोनतीन मिनिटांत त्यास झोप लागे आणि ठरलेल्या वेळीं ते जागे होत. या त्यांच्या मानसिक शक्तीमुळें ते प्रवासात अगर कोठेंहि थोडथोडी झोप घेऊन आपल्या विश्रांतीची भरपाई करून घेत. ही जर त्यांचेजवळ शक्ति नसती तर झोपेच्या अभावी त्यांची प्रकृति बिघडून निद्रानाशाचा रोग त्यास जडला असता. झोप झाल्यानंतर वर्तमानपत्रें वाचणें किंवा मुलाखती देणें हें काम चाले किंवा आपल्या वर्तमानपत्राकरितां लेख ते तोंडानें सांगून लिहून घेत. पांचसाडेपांच वाजले म्हणजे सायंकाळचा आहार घेऊन ते फिरावयास जात. अर्धापाऊण तास फिरून आल्यावर मग प्रार्थना करीत असत. प्रार्थनेनंतर आश्रमांतील मंडळींशीं थोडा वेळ गप्पा करून पुन्हां वाचन करून रात्रीं नवाला झोपी जात.

**पत्रव्यवहार**

गांधींचा पत्रव्यवहार म्हणजे अजब चीज असे. सत्याग्रहाची चळवळ जोरांत नसली किंवा खळबळीचें राजकारण मंद झालेलें असलें तरीहि त्यांच्याकडे रोज शंभर एक तरी पत्रें येत. तारा आणि टेलिफोन सारखे चालूच असत. ह्या पत्रांत निम्मीं पत्रें राजकारणासंबंधीं व त्यांनीं सुरू केलेल्या संस्थांसंबंधीं असत. आणि निम्मीं पत्रें अगदीं खाजगी स्वरूपाचीं, सांसारिक अडचणींचें कथन ज्यांत सविस्तर केलें आहे अशी असावयाचीं आणि

मौज अशी की, गांधींना राजकीय पत्रांपेक्षां हीं पत्रें वाचण्यांत आणि त्यांचीं उत्तरें लिहिण्यांत अधिक रस असे. कोणीं आपल्या रोगाचें कथन करून उपचार विचारी, कोणी आपले घरांत पटत नाहीं म्हणून सांगे. नवराबायको, बापलेक, नंदाभावजया अशा नात्यांत ज्या कटकटी चालतात त्यांचें भरपूर कथन केलेलें ह्या पत्रांत आढळून येईल. या पत्रांना शक्य तितकें ते स्वतः उत्तरें धाडीत. एकदा उत्तर धाडून ते थांबत नसत. कांहीं लोकांची नेहमी चौकशी करीत. हीं माणसे त्यांच्या उपयोगी पडत असेंहि नाहीं. नवराबायकोंतील तंटे विकोपास गेले म्हणजे त्यांपकी एकाला ते आश्रमांत आणून ठेवीत. डोकीं फिरलेली, पिसाट वृत्तीनें वागणारीं माणसें त्यांच्या आश्रमांत येऊन राहात. तीं इतरांना उपद्रवहि देत. त्यांच्या "बापूजवळ" ती भांडततंडतहि पण त्यांच्याभोंवती घिरट्या घातल्याशिवाय राहात नसत. दोनचार महिने गेले, त्यांचें डोकें ठिकाणावर आलें म्हणजे ते परत जात. असली वेडीपिशी माणसें तुम्ही कशाला आपल्याभोंवती जमविलीं आहेत ? यांचा उपयोग काय ? असें कोणी विचारलें म्हणजे गांधी म्हणत "हीं माणसें आपली हृदयव्यथा मजजवळ मोकळ्या मनानें सांगतात, त्यांना दुसरे कोणी जवळ करीत नाहीं. कांहीं असले तरी तीं देवाचीं माणसें आहेत आपण त्यांना प्रेमानें जवळ केलें पाहिजे." ते लोकांना सांगत "हा मझा **'शंभूमेळा'** आहे. तुम्ही त्याकडे लक्ष देऊं नका. शंकराजवळ जसे भूतगणपिशाच्च असतात तसे ते आहेत. ह्या प्रमत्त जीवांना मजपासून शांति मिळते म्हणून ते मजबरोबर असतात." व्हाइसरॉयशीं चर्चा संपतांच गांधी तडक सेवाग्रामला धावत येत याचें कारण ह्या अशा विचित्र लोकांची काळजी त्यांना असे. याशिवाय कितीतरी रुग्ण लोक त्यांच्या आश्रमांत प्रकृति सुधारण्याकरितां येऊन राहात. गांधी त्यांना निसर्गोपचार सांगत. त्यांना बरें वाटलें म्हणजे मग ते आपल्या घरीं जात. यानंतर त्यांच्याशीं पत्रव्यवहार गांधींचा चालूच असावयाचाच. ऐन उपवास चालू असावा किंवा राजकारणाची घणाघाई सुरू असावी आणि गांधी त्या गडबडींतहि रुग्णांना पत्रें लिहून त्यांच्या प्रकृतीची चौकशी करीत

असावयाचेच. राजकारणांत मतभेद कितीहि झाले तरी गांधींचे घरगुती संबंध केव्हांहि तुटत नसत. मोतीलाल नेहरू, देशबंधू दास वगैरे पुढाऱ्यांच्या घराशीं त्यांचे घनिष्ट संबंध असत. त्या घराण्यांतील मुलें, स्त्रिया, बापूजींकडे अजोबा या नात्यानें पाहात असत. यामुळें राजकारणांतील मतभेद तीव्र स्वरूपास जात नसत. उपदेशाबरोबर विनोद, थट्टामस्करी त्यांची चालावयाचीच, त्यांनीं पाठीवर एकदां जोरानें थाप मारली किंवा गालावर चापटी दिली म्हणजे गांधींना विरोध करणाऱ्या तरुण मुलामुलींना धन्यता वाटे. अशा रीतीनें त्यांनीं शेंकडो नव्हे तर हजारों कुटुंबांशीं वैयक्तिक संबंध जोडलेला होता. यामुळें त्यांची शक्ति विलक्षण वाढली होती. गांधींना एखाद्या वेळीं सभेंत पराभव करणें शक्य झाले असते परंतु त्यांची ही अदृश्य शक्ति नाहींशी करणें अशक्य होतें गांधी गेल्यानें आज राष्ट्रपिता गेला म्हणून जेवढें दुःख जनतेस झालें आहे त्यापेक्षांहि आपला हितकर्ता, सल्लागार, प्रेमानें पाठीवरून हात फिरविणारा अजोबा गेला म्हणून हजारों कुटुंबांत दुःखाचे कल्लोळ उठले आहेत. ही गांधींच्या जीवनाची बाजू पाहिली म्हणजे समर्थांच्या उपदेशांतील एक ओवी आठवते.

**" त्यांचा संसार समाचार। पुसत जावा विस्तार।**
**बहुत सांगता तत्पर। होओनि ऐकावें ॥**

पुष्कळ जणांना गांधींचे राजकारण पटत नाहीं पण ते म्हणतात, " गांधी हे माणूस या नात्यानें अलौकिक, अद्वितीय असे होते यांत मुळींच संशय नाहीं. " ते म्हणत, "त्यांच्या हास्यांत बालकाचा निष्पापपणा भरलेला असे, यामुळें त्यांच्याजवळ बोलतांना केव्हांहि मनाला संकोच वाटत नसे."

### सरळ शुद्ध सात्त्विक भाषा

गांधींच्या जीवनाच्या अनेक बाजू आहेत. त्यावर लिहितां लिहितां अनेक भाषाप्रभु थकले आहेत. एक त्यांच्या भाषेचाच विचार जरी केला तरी लोक असें म्हणतात, "त्यांच्या भाषेंतून काय अर्थ निघेल याचा अंदाज लागत नाहीं. त्यांच्या अगदीं साध्यासाध्या शब्दांतून कितीतरी गहन अर्थ निघतो.

गांधींनीं पहिल्यापासून शब्दाची काटकसर करण्याची स्वतःला संवय लावून घेतली होती. **स्वतःचे दोष कथन करण्याच्या प्रसंगाशिवाय** केव्हांहि ते अतिशयोक्तीनें लिहीत नसत. अतिशयोक्ति करून वाचकाचें रंजन कराण्याचा मोह ते कटाक्षानें टाळीत. ते म्हणत अतिशयोक्ति ही असत्याची जननी आहे. अतिशयोक्तीप्रमाणेंच विकारवश होऊन ते लिहीत नसत. त्यांच्यावर कोणी कितीहि विपरीत टीका केली तरी त्याला उत्तर देतांना ते एवढेंच म्हणत कीं, "**मजकडे रागाच्या भरांत लिहिलेलें एक पत्र आलें आहे.**" एखादे वेळीं टीकेला ते विनोदानें उत्तर देत. १९२१सालीं ते कधींकधी सेकंड किंवा फर्स्टक्लासमधून जात असत. एकानें त्याबद्दल खडसावून जाब विचारला, तेव्हां त्यांनीं त्याला उत्तर दिले, "शरीर दुर्बल आहे म्हणून दुसऱ्या वर्गांतून जातों आणि मी आतां **महात्मा बनलों** आहे ना ? मग फर्स्ट-क्लासमधून जावयास नको का ? त्यांना कोणीं म्हणालें कीं, "तुम्ही भांडवल-वाल्यांना ट्रस्टी करूं कां इच्छितां ?" या विषयावर गांधींनीं विस्तारानें लिहिले होतें तरी पुन्हां पुन्हां तेच तेच प्रश्न लोक विचारीत. अशाच एका पत्राला त्यांनीं विनोदानें उत्तर दिलें कीं, अहो मी भांडवलवाल्यांची तरफदारी का करतो माहीत आहे ? ते माझा आश्रम चालवितात, मला खायला घालतात, माझा प्रवासखर्च देतात, तेव्हां मी त्यांची बाजू उचलून धरावयास नको का ?" पण या उत्तरांतील विनोद पुष्कळ लोकांना समजत नसे आणि मग पुन्हां टीकेचा भडिमार सुरू होई.

### काटकसरी जीवन

जीवनोपयोगी वस्तू वापरण्यांत ते चिक्कू नसत पण काटकसरी मात्र विलक्षण असत. जेथें बोटभर कागदावर काम भागे तेथें सबंध नोटपेपर कधींच वापरीत नसत. रद्दी वर्तमानपत्रें, पार्सलचे दोरे जपून ठेवायचेच. एक दिवस जुन्या वर्तमानपत्राचा तुकडा ते नीट व्यवस्थित ठेवीत असतां त्यांच्याकडे आलेल्या एका कार्यकर्त्यानें पाहिलें. त्याला त्याच्या कामाकरितां पांच सहा हजार रुपये पाहिजे होते. त्यानें पाहिलें जुन्या वर्तमानपत्राच्या तुकड्याला

जपणारा हा चिक्कू म्हातारा आपल्याला पांच सहा हजार रुपये कसले देतो? पण पुढें चर्चेमध्यें गांधींनीं त्या गृहस्थाला सांगितलें तुझें काम मोठें चांगलें आहे तूं अवश्य प्रयोग कर. या कामाला सहा हजार रुपये पुरावयाचे नाहींत, दहा हजार लागतील. भलत्याच गोष्टींत काटकसर करूं नये. तूं दहा हजार रुपये मजजवळून लागतील तेव्हां घेऊन जा. यावर तो पाहुणा म्हणाला, "बापूजी मला वाटलें नव्हतें तुम्ही इतकी रक्कम मला द्याल." गांधी म्हणाले, "मजजवळ लाखो रुपयांच्या हुंड्या येऊन पडल्या आहेत. पण त्यांचा योग्य उपयोग करणारेच मला भेटत नाहींत. चांगलें काम निष्ठेनें करावयाला निघावें म्हणजे पैसा कमी पडत नाहीं."



आफ्रिकेंतील सार्वजनिक कामांत पडल्यावर गांधींच्या लक्षांत आलें की, हिंदुस्थान स्वतंत्र झाल्याशिवाय हिंदी लोकांवरचा परदेशांत होणारा अन्याय थांबणार नाहीं म्हणून ते ह्या मूलगामी गोष्टीस हात घालण्या-करितां हिंदुस्थानांत आले. स्वराज्य हवें पण त्याचें स्वरूप काय याचाहि त्यांनीं खूप विचार करून त्याची रूपरेषा तयार केली. नंतर या कार्याकरितां मनुष्यबळ पाहिजे तें मिळविण्याच्या कामाला ते हिंदुस्थानांत आल्याबरोबर लागले. हिंदुस्थानभर त्यांनीं जो दौरा काढला त्यांत त्यांनीं गुणी, त्यागी, आणि निष्ठावंत माणसें कोठकोठें आहेत हें पाहून ठेवलें. त्यांच्याशीं स्नेह-संबंध जोडले. आपली विचारसरणी त्यांस पटवून दिली आणि मग ही मडळी त्यांना प्रसंगाप्रसंगानें मिळत गेली. ही मंडळी पूर्वीच्या राजकारणांत न पडलेली अशीच बहुतेक होती. माणसाच्या गुणांची पारख करणें, त्यांना प्रेम लावणें, त्यांच्यामध्यें धैर्य, आत्मविश्वास उत्पन्न करणें आणि शेवटी त्यांच्याकडून महान् कार्य करवून घेणें हे गुण ज्या पुरुषांत असतात तोच नेता होऊं शकतो. गांधीमध्यें हे गुण मोठ्या प्रमाणांत होते. त्यांची कळकळ, कार्यनिष्ठा, आत्मविश्वास, कोणताहि त्याग करण्याची तयारी आणि या सर्वांवर झळकणारी धैर्यवृत्ति यामुळें देशांतील गुणी लोक त्यांच्याकडे एकामागून एक कसे आकर्षिले गेले हें आपण पाहिलेंच आहे. या लोकांच्या बळावर त्यानीं एका मागून एक सत्याग्रही विजय मिळविले; सर्व हिंदुस्थान हादरून जाईल अशा मोठमोठ्या चळवळी चालविल्या त्या कोणाचे बळावर? त्या याच लोकांचे बळावर. हे लोक विद्वत्तेंत, धैर्यांत, त्यागांत कुणालाहि हार जाणारे नव्हते. सत्याग्रही युद्धापुरतेच कांही गुणी लोक त्यांना मिळाले असें नाहीं. सत्याग्रही युद्धापेक्षांहि, विधायक कार्यक्रमाच्या ज्या अनेक संस्था त्यांनीं उभारल्या त्या चालविण्याकरितां त्यांना हजारों माणसांची गरज होती. इतकीं माणसें मिळवावयास त्यांना केव्हांहि अडचण पडली नाहीं.

## काँग्रेस खेड्यांत गेली

गांधींनीं कार्यक्रम काढला आणि माणसें मिळत नाहींत म्हणून तो त्यांना सोडून द्यावा लागला असें कधींच घडलें नाहीं. १९३६ सालीं त्यांनी काँग्रेस-जनांना सांगितलें कीं, "काँग्रेसचा संदेश खेड्यांत नेऊन पोहोंचवावयाचा असेल तर काँग्रेस अधिवेशन खेड्यांतच भरविलें पाहिजे." गांधीची कल्पना सत्यसृष्टींत आणण्याची हिंमत महाराष्ट्रांतील त्यांच्या अनुयायांनी केली आणि फैजपूरच्या खेड्यांत काँग्रेस अधिवेशन भरवून दाखविलें. तेथें हातसडीचे तांदूळ, हातानें दळलेल्या पिठाच्या भाकऱ्या, पोळ्या, घाणीचें तेल अशा गोष्टी उपयोगात आणल्या होत्या. खानदेशांतील खेड्यांतील स्त्रियांनीं भोजनव्यवस्थेंत मोठा भाग उचलला होता. हें कार्य सोपें नव्हतें, तें करून दाखविण्याकरितां ५०० चे वर मंडळी त्या वेळीं महाराष्ट्रांत सहा महिने राबली तेव्हां राष्ट्राचें तोंड खेड्याकडे वळलें.

या अधिवेशनाचे वेळी लाख दीड लाख लोक जमणार होते. गांधींनीं 'हरिजन' मध्ये लिहिले की, सफाईचें काम भाडोत्री भंग्यांकडून करवून न घेतां स्वयंसेवकांनीं करावें. महाराष्ट्रांत स्वयंसेवकांची वाण कधीच पडलेली नाहीं. झालें, प्रोफेसरापासून सामान्य विद्यार्थ्यापर्यंत, आणि लक्षाधिशापासून रंकापर्यंत शेंकडों लोक या सफाई पथकांत सामील झाले.

## पुरुष रत्नांचा लाभ

एवंच काय राजकारणांत नेहरू, दास, राजगोपालाचारी, विधायक कार्यक्रमांत, श्रीकृष्णदास जाजू, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, आप्पासाहेब पटवर्धन, नानासाहेब ठकार, वाळूभाई मेथा, जे. कुमारआप्पा, झकीर हुसेन, विनोबा भावे अशी एक ना दोन पहिल्या दर्जाची मंडळी त्यांना मिळालेली आहेत. विधायक कार्य हें नजरेंत चटकन् भरणारें नसतें. यांत असलेल्या मंडळींचीं नांवें वर्तमानपत्रांत झळकत नाहींत पण यांचा प्रत्यक्ष परिचय झाला म्हणजे वाटतें पृथ्वीच्या पोटांत तिनें बाहेर टाकलेल्या रत्नांक्षां जशीं कितीतरी पटीनें अधिक रत्नें आहेत त्याप्रमाणें प्रदर्शनांत मांड-

लेल्या नररत्नांच्या संख्येपेक्षां गांधींजवळ नररत्नांचा गुप्त सांठा अधिक मोठा आहे. बरें हीं नररत्नें रत्नें बोळयानें दूध पिणारीं आहेत का? मुळींच नाही. श्री. जाजू, कुमारआप्पा, झकीर हुसेन, विनोबा ही मंडळी अगदीं स्वतंत्र बुद्धीचीं व थोडीफार अवखळच म्हणाना अशीं आहेत. गांधी ज्या वेळी एखादी नवी कल्पना किंवा कार्यक्रम या मंडळींपुढें ठेवीत त्या वेळीं जी चर्चा चाले ती ऐकण्याजोगी असे. बुद्धीला पटल्याशिवाय हे लोक कोणचीच गोष्ट करणार नाहींत. पुढें पुढें मात्र या लोकांना कळून चुकलें कीं, आपल्या तर्कापेक्षां, अंदाजापेक्षां गांधींचे अंदाज अचूक असतात, मग ते गांधींना विरोध करीत नसत. गांधींजवळ अंधश्रद्धेचीं माणसें होतीं पण ती कार्यकारी मंडळाच्या बाहेर असत. कोणत्याहि संस्थेच्या कार्यकारी मंडळांत अंधश्रद्धाळू लोकांना गांधी वाव देत नसत.

## हारांचा लिलांव

मोठीं कार्यें प्रचंड प्रमाणावर करण्याकरितां जें द्रव्य लागतें तें मिळविण्याची शक्ति गांधींत फार मोठ्या प्रमाणावर होती. एके वेळीं लोक थट्टेनें असें म्हणत कीं, " हिंदुस्थानांत दोन **बडे भिकारी** आहेत. एक **पंडित मदनमोहन मालवीय** आणि दुसरे **गांधी**. " १९२० सालीं त्यांनीं एक कोटी फंड मिळविला होता. त्यानंतर खादी कार्याकरितां, हरिजन कार्याकरितां दौरे काढून त्यांनीं लाखों रुपयांचे फंड जमा केले होते. श्रीमंत व्यापाऱ्यांकडून ते फंड जमा करीत असें नाहीं तर गरिबांतल्या गरिबापासूनहि ते घेत. पैसे जमविण्याच्या बाबतींत ते **लाजलज्जा अशी बाळगीत नसत**. कधींकधीं त्यांच्या ह्या वागणुकीनें लोकांच्या भावनेला धक्का बसे. ते कोणच्याहि गांवीं गेले म्हणजे लोक त्यांना हार घालीत व रौप्य करंडकांतून मानपत्रें देत. गांधी त्याच सभेंत त्या **हारांचा लिलांव** करीत. इतकेंच नाहीं तर आदरानें दिलेल्या **रौप्य करंडकांचा लिलांव करण्यास** ते कचरत नसत. ते म्हणत कीं, " मी ह्या वस्तू जपून कोठें ठेवणार? मला नाहीं सत्तेचें घरदार. मी राहतों झोंपडींत. तेव्हां ह्या मौल्यवान् वस्तू मी घेऊन

काय करूं? पण लोक ऐकत नाहींत म्हणून मी त्या स्वीकारतों आणि त्यांचा लिलांव करून आलेले पैसे सार्वजनिक कार्याकरितां देऊन टाकतों." असें करण्यांत त्यांचा दुसराहि एक उद्देश होता. पुष्कळ पुढाऱ्यांना हारांचें आणि मानपत्रांचें आकर्षण आणि भूषण वाटतें. खऱ्या कार्यकर्त्यानें असल्या गोष्टींचा मोह टाळला पाहिजे. म्हणून हारांचा आणि मानपत्राच्या करंड-कांचा लिलाव करून त्यांनीं या वस्तूंची किंमत न बोलतां उतरवून टाकली.

**दे दान सुटे गिराण**

आगगाडींतून प्रवास करितांना गाडी स्टेशनवर थांबली कीं, दर्शनोत्सुक लोकांच्यापुढें हात पसरून ते हरिजनांकरितां भिक्षा मागत व म्हणत हरि-जनांकरितां दान द्या म्हणजे देशाचें ग्रहण सुटेल. अशा रीतीनें वर्षाकांठीं ते हजारों रुपये मिळवून हरिजन सेवकसंघाकडे पाठवून देत. स्वतःच्या संस्थां-करितांच त्यांनीं फंड मिळविला असें नाहीं. रवींद्रनाथ टागोर यांना त्यांच्या संस्थेकरितां पैशांची खूप तूट पडली. तेव्हां त्यांनीं कळकळीनें गांधीना हाक मारून सांगितलें, "बाजी जात रविंद्रकी राखो गांधीराज" गांधी हे टागोरांना गुरुदेव म्हणत. त्यांचा शब्द शिरसावंद्य मानून शांतिनिकेतनाला गांधीनीं पांच लाख रुपये मिळवून पाठवून दिले. गांधी कार्यकर्त्यांना म्हणत, "आपलें काम लोकांच्या हितार्थ चाललें आहे हें जनतेला आपल्या कळकळीनें, निष्ठेनें पटवून देऊन हिशेब चोख ठेवला म्हणजे पैशाला तोटा येत नाहीं. हिशेब ठवण्याच्या बाबतींत ते कार्यकर्त्याशी अतिशय कडक वागत. कोठें त्यांना जर घोटाळा दिसला तर त्या मनुष्याला काढून टाकीत व गहाळ झालेल्या पैशाची भरपाई करावयाला लावीत, अशा रीतीनें त्यांच्या अफाट पसाऱ्याला पुरेसा पैसा ते मिळवूं शकत, हें गेल्या पंचवीस वर्षांत लोकांच्या प्रत्ययास आलेलें आहे.

**घटनाकौशल्य**

मनुष्यबल, द्रव्यबल यांची कार्याला जशी गरज आहे त्याप्रमाणें संस्थेची

घटनाहि तयार करावयाची बौद्धिक शक्ति नेत्यांत हवी. घटना अशी असावी कीं त्यांत जास्तींत जास्त माणसांना भाग घेतां यावा व त्यांच्या कार्यशक्तीला वाव मिळावा. गांधींनीं हिंदुस्थानांत आल्यावर काँग्रेसच्या विस्कळीत सस्थेला कार्यक्षम बनविणारी घटना करून दिली. पूर्वी कोणीहि काँग्रेसचा प्रतिनिधि होत असे. पुढें वसाहतोचें स्वराज्य हवें म्हणणारा काँग्रेसचा प्रतिनिधि व्हावयाचा. वर्षाकांठीं एकदांच लोक जमत आणि नंतर सगळा मामला थंड पडावयाचा. गांधीनी काँग्रेसचें ध्येय निश्चित करून मार्गहि आंखून दिला. तें ध्येय मान्य करणाराला सभासदाचा हक्क दिला, आणि चार आणे सभासदवर्गणी ठेवली. गांव कमिट्या, तालुका कमिट्या, जिल्हा कमिट्या, प्रांतिक कमिट्या आणि अखिल भारतीय काँग्रेस, अशा कमिट्या तयार करून त्यांत प्रत्यक्ष वर्षभर काम करणारी वर्किंग कमिटी ठेवली. अशा तऱ्हेनें काँग्रेस संस्थेचें जाळें देशभर पसरविण्याची तजवीज केली आणि सभासदांच्या वर्गणींतून त्या संस्थांचा खर्च थोडाबहुत चालणें शक्य झालें. ही घटना १९१९ साली गांधींनीं तयार करून काँग्रेसला दिली. टिळकांनीं हें काम त्यांचेवर सोपविलें होतें. त्या वेळेला या घटनेच्या अंगीं असलेले गुण पुढें विकास पावून आज काँग्रेस ही संस्था कशी सुसंघटित आणि बलवान् झाली आहे, हें आपण पाहतोंच आहोंत. अशी घटना आपण राष्ट्राला देऊ शकूं असा आत्मविश्वास गांधींना त्या वेळींहि होता असें त्यांच्या आत्मकथेवरून आपणास दिसतें.

### गांधींचें प्रचारयंत्र

गांधींचं प्रचारयंत्र अतिशय कार्यक्षम असे. इन्शुअरन्स कंपनीचे एजंट प्रचाराच्या बाबतींत मोठे प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणे ख्रिस्ती मिशनरी पण. गांधींनी ह्या दोघांनाहि मागें टाकलें होतें. जी गोष्ट विचारपूर्वक एकदां मनाशीं ठरविली तिचा सतत प्रचार गांधी वेळ अवेळ न पाहतां करीत असत. एक चरख्याचीच गोष्ट घ्या. चरख्यानें आपल्या दरिद्री राष्ट्राचा उद्धार होईल अशी त्यांची खात्री झाल्यावर या चरख्याचा प्रचार त्यांनीं गेल्या ३० वर्षें अत्यंत चिकाटीनें केला. चरखा सुधारण्याकरितां घरचे दारचे संशोधक

नेमले. आपणहि त्यांत जातीनें लक्ष घातलें आणि चरख्यावर सूत काढण्याचा नियम अखंड चालविला. तुरुंगांत गेले तरी आपला नियम सोडला नाहीं. त्याकरितां अन्नहि कांहीं काळ वर्ज्य केलें. इंग्लंडला जातांना बोटीवर किंवा तेथें गेल्यावर गोलमेज परिषदेची गडबड चालू असता त्यांनीं चरखा कातावयाचें सोडलें नाहीं. आगगाडीत असले तरी त्यांचें हें काम मागें पडले नाहीं. आपण स्वतः सूत कातीत. आश्रमवासियांना कातावयाला लावीत आणि त्यांच्याकडे येणाऱ्या जाणाऱ्याला सूत कातावयाला प्रवृत्त करीत. कोणीं मला येत नाही म्हटलें तर, कधी कधी स्वतःहि शिकवीत. ७० वर्षांचे झाल्यावरहि नवीन तऱ्हेची पिंजणकला ते हौसेनें अवगत करून घेत होते. १९२२ सालीं खटला होऊन ६ वर्षांची त्यांना शिक्षा झाली. तेथें जमलेले स्त्रीपुरुष त्यांच्या पायां पडू लागले तेव्हां त्यांनीं प्रत्येकाला "चरखा चालवा" असा संदेश दिला. त्यांच्या शिष्यानीं त्यांची जयंति करावयाची ठरविली तेव्हां त्यांनी त्यांना सांगितलें कीं, या दिवशीं सामुदायिक कताइचा कार्यक्रम ठेवा आणि याला **गांधीजयंति** न म्हणतां **'रेंटिया—बारस'** म्हणजे "चरखा-द्वादशी" असें नांव ठेवा. राष्टीय निशाणावरहि चरख्याचें चिन्ह घालण्यास ते चुकले नाहीत. सभेत बसले असले किंवा कुणाशीं चर्चा करीत असले तरी त्याचा चरखा चालू असावयाचाच. कोणीं जर त्यांना स्वतःला म्हणून कांहीं देणगी दिली तर ते सहसा स्वीकारीत नसत. पण चरखा आणि खादी यांच्या प्रसाराला उत्तेजन देण्याकरितां त्यांना जर कोणीं आपल्या हातानें कातलेल्या सुताची खादी दिली तर ती आनंदानें स्वीकारीत. नवाकाळचे खाडिलकर यांच्या पत्नी आणि सौ. अनुसयाबाई या दोघीजणी गांधीजयंतीला आपल्या हातानें कातलेल्या सुताचीं वस्त्रें गांधींना पाटवीत तीं ते मोठ्या आनंदानें स्वीकारीत.

**चरखा खादी ध्यानी चरखा खादी मनी ।**
**जागृती स्वप्नी चरखा सूत ॥**

अशी त्यांची स्थिति होती.

जी गोष्ट खादीची, चरख्याची तीच राष्ट्रभाषेच्या प्रचाराची. हिंदुस्थानांत आल्यावर सार्वजनिक सभेंत हिंदी मधून बोलण्याचा त्यांनींच प्रथम पायंडा पाडला. व्हाइसरॉयनें बोलाविलेल्या एका सभेंत हिंदीमध्यें बोलण्याचें त्यांनीं जेव्हां धाडस केलें तेव्हां हिंदी आणि युरोपिअन लोक चकितच झाले. कॉंग्रेसमधील भाषणें १९२० सालापर्यंत इग्रजींतच होत. पण हळू हळू हिंदीमधून बोलण्याचा त्यांनीं स्वतः उपक्रम सुरू केला आणि इतरांना हिंदींतून बोलण्याला उत्तेजन दिलें. आज कॉंग्रेसमध्यें क्वचित् प्रसंगींच इंग्रजींत भाषणें होतात. मद्रासमध्यें हिंदी प्रचार संघ स्थापन करून राष्ट्रभाषेचा प्रचार त्यांनीं त्या प्रांतांत मोठया प्रमाणावर सुरू केला आहे.

जी गोष्ट राष्ट्रभाषेच्या प्रचाराची तीच ग्रामोद्योगी वस्तु वापरण्याची आणि गोदुग्धाची. ते स्वतः गाईचें दूध विशेष कारणानें पिऊं शकत नव्हते हें आपण पाहिलेंच आहे. तरीपण आश्रमांत गाईचेंच दूध, तूप कटाक्षानें वापरण्यांत येई. आज गोरसाशिवाय इतर दूध न वापरणारे किती तरी गांधीचे अनुयायी निघाले आहेत. कोणत्याहि गोष्टीचा ती गोष्ट स्वतः आचरण्यानें होते या तत्त्वावर त्यांचा अढळ विश्वास होता. म्हणूनच ते कोठेंहि गेले तरी सर्वधर्मसमभावाचा प्रचार करण्याकरितां सार्वजनिक जागेमध्यें प्रार्थना करीत असत. नौखोलींत दंग्याच्या काळांत मुसलमानांचीं डोकीं फिरलेलीं असतां देखील त्यांनीं सार्वजनिक प्रार्थना आणि तेथें रामनामाचा गजर करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं एवढी जबर प्रचारशक्ति गांधींच्या अंगीं होती म्हणूनच आज आपल्याला त्यांच्या कार्याचा अवाढव्य विस्तार दिसून येतो.

**नियमितपणा**

आपल्या राष्ट्राला गांधींनीं ज्या अमूल्य अशा देणग्या दिल्या आहेत त्यांत सार्वजनिक कामें अगदीं वेळेवर करण्याची संवय ही प्रमुख होय. गांधींच्या आगमनापूर्वीं सार्वजनिक कामें केव्हांहि नियमितपणें चालत नव्हतीं. रावसाहेब मंडलीक यांच्यासारख्या कांहीं व्यक्ति खासगी जीवनांत आदर्श असा नियमितपणा ठेवीत. परंतु सार्वजनिक जीवनाला नियमितपणाची

शिस्त कोणीं कटाक्षानें लावली नाहीं. काँग्रेसचीं अधिवेशनें ठरलेल्या वेळेपेक्षां कितीतरी उशीरा सुरू होत. प्रांतिक परिषदा, जिल्हा सभा किंवा नैमित्तिक कार्यक्रम हे कधींच वेळेवर व्हावयाचे नाहींत असा जणूं ठरावच झालेला होता. जितका पुढारी मोठा तितका तो अधिक उशीरा यावयाचा. राष्ट्राला जर लहानमोठीं कामें भराभर उरकावयाचीं असतील तर नियमितपणाशिवाय गत्यंतरच नाहीं. गांधींनीं वक्तशीरपणाची संवय फार वर्षांपासून स्वतःला लावून घेतली होती. आणि हिंदुस्थानांत आल्यावर ते आपले कार्यक्रम कोणाची भीडमुर्वत न ठेवतां वेळेवर सुरू करीत. एकदां सांगलीला कार्यक्रम ठरला आणि मिरजेच्या लोकांनीं गांधी स्टेशनवर उतरतांच त्यांना भाषण करण्यासाठीं आग्रह केला. गांधींनीं स्पष्ट नकार दिला. मग त्यांना अडविण्याकरितां त्यांची मोटार लोकांनीं दूर नेऊन ठेवली. मग गांधी स्वतः पायींच सांगलीच्या रस्त्यानें जावयास निघाले. यामुळें लोक प्रथम निराश झाले. लोकांची कदर गांधींना नाहीं अशीहि टीका झाली पण वेळेवर ठरलेला कार्यक्रम पार पाडण्याचा निश्चय त्यांनीं न बदलल्यामुळें आज राष्ट्रीय जीवनांत बराच नियमितपणा आलेला आहे.

**स्वच्छता**

वैयक्तिक निर्मळ राहणी ही पुष्कळांच्या बाबतींत आपणाला सर्वकाळीं सर्वस्थळीं आढळून येते. परंतु सार्वजनिक निर्मळ जीवन याला अलीकडे फार महत्त्व आलेलें आहे. हिंदुस्थानांतील लहानमोठीं शहरें हीं दुर्गंधीचीं क्रीडास्थानें झालीं आहेत. यात्रेस गेलेल्या लोकांना आमच्या पवित्र तीर्थांवरील घाण पाहून किळस येते. इतकेंच नव्हे तर आपल्या राष्ट्रीय जीवनाबद्दल शरम वाटते. गांधी आपल्या लोकांना दोष देऊन बसले नाहींत. त्यांनीं यासंबंधीं आपल्या वर्तमानपत्रांत खूप लिहिलें आणि स्वतः निर्मळ राहणीचा आदर्श जनतेपुढें ठेवण्याकरितां शौचकूप स्वतः साफ करण्यापासून त्यांनीं सुरुवात केली. ते म्हणत अज्ञानांत गढलेला, पोटाचा गुलाम झालेला भंगी हा सफाईच्या कामांत सुधारणा करूं शकणार नाहीं. कोणतीहि सुधारणा निष्ठावंत, त्यागी, सुशिक्षितच करूं शकतात. म्हणून त्यांच्या आश्रमांत येऊन राहणाऱ्या माणसाला ते प्रथम सफाईचें काम देत. खेड्यांची सुधारणा कर-

ण्यास आरंभ करतांना सफाईवर ते प्रथम भर देत. आज **राष्ट्रीय कार्यक्रमांत ग्रामसफाईला त्यांनीं स्थान दिलेलें** आहे. कोणचीहि संस्था ते पाहण्यास गेले असतां प्रथम ते तेथल्या सफाईकडे बारकाईनें पाहात. एकदां एका बोर्डिंगांत ते गेले, तेथें व्याख्यान देण्याऐवजीं त्यांनीं मुलांचे बिछाने उलगडून पाहिले. त्या बिछान्यावरील चादरी मळकट आणि तेलकट पाहून ते व्यवस्थापकांना म्हणाले, "**संस्कृत किंवा इंग्लिश** शिकवावयाचे अगोदर स्वच्छ राहणीचें शिक्षण तुम्हीं मुलांना कटाक्षानें दिलें पाहिजे."

**" जें जना निजमनासही तेंच । सांगणें वर गुरूपण हेंच "**

जो उपदेश ते लोकांना करीत तोच ते स्वतःलाहि करून त्याप्रमाणें वागत. गांधींचें शरीर म्हणजे निर्मलतेचें वसतिस्थान होतें. त्यांच्या वस्त्रांतील निर्मलता पाहून पं. जवाहरलालसारखे लोक आश्चर्यचकित होत. त्यांच्या कटिवस्त्राला हसणारे जव्हां त्यांची प्रत्येक बाबतींतील निर्मलता पाहात त्या वेळेला ते म्हणत कीं, ह्याचे ठायीं उच्च संस्कृति कशी मुरलेली आहे. शरीराप्रमाणेंच कपडे आणि कपड्यांप्रमाणेंच वापरावयाच्या वस्तू त्यांच्या कमालीच्या निर्मल असत. त्या इतक्या की, त्यांची निर्मलता राखतांना जवळचीं माणसें मेटाकुटीला येत.

## गुप्तता अनेक पातकांची जननी

गांधी म्हणत कीं, " गुप्तता ही अनेक पातकांची जननी आहे. गुप्ततें-तूनच असत्य आणि असत्यांतूनच हिंसा उत्पन्न होते. त्यांचें नित्य जीवन कोणालाहि पाहतां येत असे. दार लावून ते बसले किंवा झोपले असें कधींहि घडत नसे. राजकीय चळवळीचे वेळी तर प्रतिपक्षाला आपला कार्यक्रम ते उघड करून सांगत. चळवळींत एकदां गुप्तता शिरली कीं, मग पळपुटेपणा, अंगचोरपणा, लबाडी, चोरी असे दोष भराभर उत्पन्न होऊन लोकांचा विश्वास कार्यकर्त्यांवरून उडून जातो. नैतिक बंधनें शिथिल होतात म्हणून गुप्ततेला ते पातक समजत असत. हा उपदेश चळवळीच्या काळांत ज्यांनीं ज्यांनी मानला नाहीं त्यांना त्यांना त्याचीं कडू फळें चाखावीं लागलीं व त्यांना पश्चात्ताप करण्याची पाळी आलेली होती. कारभार उघडा ठेवल्यामुळे मनुष्य जबाबदारीनें कामें करूं लागतो आणि आपल्या कार्याचा विपर्यास करावयास प्रतिपक्षाला जागा मिळत नाहीं. उघड **चळवळ** किंव

सार्वजनिक काम करण्याची पद्धत गांधींनीं राष्ट्राला बऱ्याच मोठ्या प्रमाणांत लावली होती. या पद्धतीवर पुष्कळ टीका झालेली आहे. परंतु गांधींचें म्हणणें असें पडे की, गुप्त कारभारापासून जे फायदे होतात त्याचेपेक्षां तोटेच अधिक होतात. आणि अहिंसक कार्यपद्धतीला गुप्ततेचें वावडे आहे. म्हणून ज्यांना अहिंसक पद्धतीनें सार्वजनिक काम करावयाचें असेल त्यांनीं आपल्या कारभारांत गुप्तता राखू नये.

**व्यवहारी धोरण**

गांधींच्या अंगी व्यवहारी धोरण नसतें तर त्यांचे हातून एवढी मोठीं कार्यें झालींच नसतीं. त्यांच्या ध्येयाला किंवा मार्गाला लोक अव्यवहार्य म्हणत परंतु पुष्कळ वेळां त्यागाच्या, धाडसाच्या कमतरतेमुळें ही विचारसरणी लोक स्वीकारीत असें दिसतें. शिवाय गांधींच्या नवमार्गाचें निष्ठेनें आचरण करून नंतर ही टीका झाली असें घडत नसे. गांधी तत्त्वाचें आचरण करितांना त्याच्या व्यावहारिक मर्यादा ते ओळखीत. अहिंसेचीच गोष्ट घ्या ना! **निरपवाद अहिंसेचा त्यांनीं कधींच प्रचार केला नाहीं.** ते म्हणत "माझी शक्ति थोडी आहे म्हणून मानवापुरती मी अहिंसा मर्यादित केली आहे." आणि या मर्यादेलाहि आणखी एक मर्यादा घातली आहे ती म्हणजे शारीरिक भेकडपणामुळें जे जुलूम करणाऱ्याचा प्रतिकार करीत नाहींत त्यांचा गांधी सदैव निषेध करीत. ते म्हणत " जर अहिंसकपणानें अन्यायाचा प्रतिकार तुम्हाला करवत नसेल तर पळून जाण्यापेक्षां तुम्ही हातांत शस्त्र घेतलेलें परवडलें. अशा रीतीनें त्यांनीं आपल्या अहिंसक प्रचाराला व्यावहारिक मर्यादा घातली होती. गुप्ततेच्या बाबतींतहि तोच प्रकार. वर्किंग कमिटीच्या बैठकी गुप्ततेनें चालत नसत तर खाजगी रीतीनें चालत. चर्चा शांतपणानें व्हावी आणखी तिचा विपर्यास होऊं नये म्हणून वर्किंग कमिटीच्या बैठकी दोन चार तास दार बंद करून चालत पण दोनचार तासांतच त्यांचा निर्णय जगाला कळत असे. त्याचप्रमाणें त्यांच्याकडे जर कोणी आपलें हृदय ओकायला आले तर त्या माणसाच्या इच्छेकरितां त्याचें गौप्य ते फोडीत नसत. परंतु आपणहून एखादी गुप्त चळवळ किंवा गुप्त प्रचार त्यांनी कधींहि चालविला नाहीं.

## २७. उपसंहार

" सरली शब्दांची खटपट । आला ग्रंथाचा शेवट "

आतांपर्यंत गांधींच्या चरित्राची आपण ओळख करून घेतली. त्यांत आपण गांधींचें कालानुक्रमें चरित्र जसें घडत गेलें तसें आपण तें अवलोकन केलें. तें अवलोकन करीत असतां घडलेल्या घटनांवर प्रकाश पडेल अशी चर्चा केली. शेवटीं गांधींच्या अनेक गुणांचा परामर्ष घेतला. आतां एकंदर चरित्राचा उपसंहार करण्याचा समय आलेला आहे.

**अलौकिक व्यक्ति**

गांधींचें चरित्र जो वाचील त्याच्या ध्यानांत एक गोष्ट येईल कीं, ही व्यक्ति सामान्य नव्हती. इतकेंच नव्हे तर अशी दुसरी व्यक्ति आधुनिक कालांत आपल्या पाहण्यांत अलेली नाहीं. इतिहासज्ञांना देखील असें म्हणावेंसें वाटेल कीं, आपण पुष्कळ सेनानी पाहिले, मुत्सद्यांचे डावपेंच ध्यानांत घेतले, तत्त्वज्ञांचें चरित्र आणि चारित्र्य अजमावून घेतलें परंतु त्या दीर्घ मालिकेंत गांधी बसत नाहींत. मोठमोठ्या सेनानींनीं आपल्या आयुष्यांत लहानमोठे देश सैन्याच्या बळावर पादाक्रांत केलेले आहेत. बुद्धासारख्या थोर विभूतींनीं आपलें दीर्घ आयुष्य प्रचारांत घालविलें आहे. तरी पण गांधींनीं पंचवीस वर्षांत कोटयवधि हिंदी मनावर जो ताबा मिळविला, पांच सहा हजार कार्यकर्ते निर्माण केले, जी संस्था हातांत धरली तिच्या सभासदांची संख्या कित्येक लाखांची केली आणि एका बलशाली, शस्त्रधारी साम्राज्याशीं अखंड निःशस्त्र सामना दिला, या गोष्टी इतिहासांत शोधूनहि आपणांला आढळत नाहींत. एका थोर पाश्चात्य गृहस्थानें असें म्हटलें आहे कीं, अशी व्यक्ति हिंदुस्थानांत होऊन गेली हें भविष्यकाळांत लोक खरें देखील मानणार नाहीत. अशा ह्या अलौकिक व्यक्तीनें आपल्या ह्या महान् देशाची सेवा काय केली याचा विचार केला तर आपणाला असें आढळून येतें कीं, जेथें राष्ट्राचे महान्

नेते अडून बसले होते, तेथें गांधींनीं मार्ग फोडून नवीन रस्ता काढला. अर्ज, विनंत्या, बहिष्कार किंवा सशस्त्र क्रांति यांना सरकार दाद देत नव्हतें. या साम्राज्याला गदगदून हालवावयाला अधिक प्रभावी शक्तीची गरज होती आणि ती शक्ति गांधींनीं आपल्या राष्ट्रांत प्रथम उत्पन्न केली. भित्र्या लोकांना निर्भय केलें. दुर्बल संस्थेला सुदृढ केलें. स्त्रियांच्या अंगांत आत्मविश्वास निर्माण केला. राष्ट्रांत दलित लोकांविषयीं बंधुभाव उपन्न केला. स्वार्थत्यागाची परिसीमा स्वतःच्या आचरणानें अनुयायांना दाखविली. त्यांच्याकडून महान् कार्यें करवून घेतलीं, स्वातंत्र्य संपादन करण्याकरितां ज्या गुणांची जोपासना राष्ट्रांत व्हावयास पाहिजे त्याचें जनतेस शिक्षण मिळण्याची योजना केली. आपलें राष्ट्र अनेक वर्षांच्या गुलामगिरीमुळें अंगप्रत्यंगांत दुर्बल झालें होतें. या प्रत्येक अंगाकडे गांधींनीं काळजीपूर्वक लक्ष देऊन त्याच्यामध्यें सुदृढता आणिली. हें कार्य लहानसहान नव्हतें. कारण आपला देश एखाद्या खंडासारखा विस्तीर्ण आहे आणि यावर राज्य करणारी सत्ता ही दक्ष, चतुर, निश्चयी अशी होती. अशा सत्तेवर मात करणें म्हणजे वानरांच्या हातून रावणाचा पराजय करण्यासारखेंच कठिण काम होतें.

**भावी संकटाची तरतूद**

गांधींनीं हा जो विश्वप्रयत्न केला तो हिंदी स्वातंत्र्याकरितां केला. एवढा मोठा चाळीस कोटी लोकांचा देश स्वतंत्र झाल्यावर त्याची बौद्धिक, सामाजिक आणि आर्थिक शक्ति कल्पनातीत वाढणार तेव्हां ह्या शक्तीचा जर्मनी किंवा जपानप्रमाणें जगाला संत्रस्त करण्याकडे उपयोग होऊं नये म्हणून स्वातंत्र्य संपादनापूर्वीच गांधी तें मिळविण्याच्या साधनासंबंधानें दक्ष राहिले होते.

इंग्लंड, जर्मनी, जपान, अमेरिका इ. राष्ट्रांनीं स्वातंत्र्याचें सौख्य अनुभवीत असतां जगाला संत्रस्त केलें नाहीं का ? तेव्हां त्यांचें हें स्वातंत्र्य इतर देशांना उपद्रवी ठरलें. आणि जगांतील इतर राष्ट्रें या राष्ट्रांचा द्वेष करूं लागलीं. स्वतंत्र आणि सबल राष्ट्रांतहि स्पर्धा उत्पन्न होऊन महायुद्ध

निर्माण झालें आणि त्यानें जगाच्या सौख्यावर खरखीत निखारे ठेविले. हिदुस्थानच्या मानानें हीं राज्यें लोकसंख्येनें आणि क्षेत्रमर्यादेने बराच लहान आहेत. अशी राष्ट्रे जर जगाला ' त्राहि भगवान् ' करतात तर हिंदुस्थान कां बरें जगाला उपद्रव देण्यास तयार होणार नाही? हाहि विचार गांधींनीं युद्ध सुरू करण्यापूर्वी चांगला केला होता.

ते म्हणत, " आपण स्वातंत्र्याची लढाई जर न्यायाला, सत्याला, माणुसकीला धरून केली तर स्वातंत्र्य सपादन केल्यावर आपल्या मनांत बंधुभाव वाढेल आणि तो एकदां वाढला म्हणजे मग आपल्या हातून जगाचे अकल्याण चुकूनहि होणार नाही. उलट आपल्याजवळ असलेली अनेकविध शक्ति परराष्ट्रांतील दलित लोकांच्या सेवेकडेच खर्चितां येईल. "

**नवाप्रयोग आणि बुजरी जनता**

ही गोष्ट जर घडवून आणावयाची तर आपलें युद्ध शांततेचें, विनयाचें आणि अहिंसेचेंच असलें पाहिजे. आता अशा तऱ्हेनें युद्ध करण्याची पद्धत सनातन नसल्यामुळे लोकाना ती प्रथम मान्य होणार नाही परतु कोणचेंहि नवें औषध, नवें यंत्र जगाला मान्य झालें आहे का ? १९०५ किंवा १९०७ सालीं एका वैमानिकाने ब्रिटिश युद्धमंत्र्याला सांगितलें कीं, " भावी महायुद्धांत विमानांचा उपयोग केला जाणार आहे. तरी चांगली विमानें निर्माण करण्याकरिता मला तुम्ही मदत द्या." ब्रिटिश युद्धमंत्र्याने त्याची ही सूचना अमान्य केली. इतकेंच नव्हे तर हास्यास्पद ठरविली. आगगाडीचा उपयोग किती आहे हें आपण नित्य पाहतोंच. हिंदुस्थानांत आगगाडी सुरू करण्यास १८५३ सालीं मुंबईच्या गव्हर्नरनें विरोध केला होता व पहिल्या दिवशीं गाडी सुरू करण्याच्या समारंभाला तो हजर देखील राहिला नाही. तेव्हां नवीन साधनाला लोक बिचकले तर त्यांत नवल असें कांहीं नाहीं. गांधी विरोध करणाऱ्या लोकांना सांगत कीं, " थोडा विश्वास ठेवा, माझ्या प्रयोगाला सुसंधि द्या आणि मग त्याचा प्रभाव पाहा. माझ्या मार्गानें तुम्हाला स्वातंत्र्य तर मिळेलच शिवाय भावी काळांत तुम्ही सुख आणि शांति यांचा अनुभव चिरकाल घ्याल."

**तीन अभिप्राय**

गांधींच्या कार्याविषयी आणि साधनांविषयी दोस्त राष्ट्राचा मोठा सेनानी जो जनरल मॅक ऑर्थर तो म्हणतो "वादग्रस्त प्रश्नाचे निर्णय लावण्यासाठीं प्रचंड प्रमाणांत दंडशक्ति वापरणें हें मूलतत्त्व केवळ चुकीचें आहे, एवढेंच नव्हे तर अशा उपायापोटीं मानवजातीच्या आत्मनाशाचीं बीजेंच साठविलीं असतात. असें गांधींचे मत होतें. मानव संस्कृतीच्या विकासक्रमांत अखेरीस केव्हांतरी त्यांचें हें मत सर्व माणसांना पटल्यावाचून राहणार नाहीं. एरव्ही मानवी संस्कृति जिवंत राहणें अशक्य आहे.

जनरल मॅक ऑथर म्हणजे 'ठोशास ठोसा' देणारा, हिंसा करण्याची कधीहि ज्याला क्षिति वाटली नाही असा समशेर बहाद्दर अनेक युद्धें करून शेवटीं तो निर्णयावर आला की " दंडशाहीनें मानवी संस्कृतीची वाढ होणार नाहीं इतकेंच नव्हे तर ती जिवंत राहणेंहि अशक्य आहे. "

**शास्त्रज्ञांचा पाठिंबा**

गांधींचे सगळे व्यवहार आणि त्याचे तत्त्वज्ञान हे त्रेतायुगांतील आहे. आधुनिक शास्त्राला त्यांचे विचार जुळते असे नाहींत अशी टीका आपण नेहमीं वाचतों. अल्बर्ट आईन्स्टाईन हा मोठा शास्त्रज्ञ समजला जातो. पदार्थ-विज्ञान आणि गणित या शास्त्रांत त्याला अग्रपूजेचा मान शास्त्रज्ञ देतात. तो गांधींबद्दल असें म्हणतो कीं, " राजकीय इतिहासांत गांधी अपूर्व आहेत. दलित जनतेच्या दास्यविमोचनाच्या झालेल्या झगड्यांचें सर्वस्वीं अभिनव व मानव धर्माला अनुरूप असे तंत्र त्यांनी शोधून काढलें असून अत्यंत धडाडीनें व श्रद्धेनें तें सिद्धीस नेलें आहे. आपल्या काळांत असा तेजस्वी पुरुष निर्माण झाला कीं, जो भावी पिढ्यांनाहि मार्गदर्शन करील या भाग्याबद्दल आपण कृतज्ञ असलें पाहिजे."

प्रो. सी. ई. एम्. जोड हे मोठे तत्त्वज्ञ म्हणून पाश्चात्य राष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. ते म्हणतात,"माणसांच्या हातची संहारशक्ति जसजशी वाढत

जाईल तसतशी अशीहि वेळ येईल कीं, संस्कृति टिकवावयाची असल्यास हिंसामार्गऐवजीं गांधींचा मार्ग स्वीकारणें भाग पडेल. "

**कर्तबगारीचा प्रभाव**

एक नाणावलेला तत्त्वज्ञ, एक मान्यवर शास्त्रज्ञ आणि एक कसलेला सेनानी हे तिघे एकमतानें म्हणतात, जगाला आज नाहीं उद्यां गांधींचाच मार्ग स्वीकारावा लागणार. तेव्हां गांधींची विचारसरणी, त्यांची कार्यपद्धति तरुण पिढीनें काळजीपूर्वक अभ्यासिली पाहिजे. आज नाहीं उद्यां ह्या पद्धतीचा अभ्यास जगांतील सर्व राष्ट्रें काळजीपूर्वक करणार आहेत. भावी जगाचा विचार करणारे थोरथोर विचारवंत गांधींना नित्यशः भेटून जात होते. त्यांच्यापासून स्फूर्ति घ्यावी अशी ते अपेक्षा करीत. गांधीना भेटून त्यांच्यासंबंधीं लिहिलेलीं असंख्य पुस्तकें आज इंग्रजी भाषेंत झालेलीं आहेत. अन् रनित्य होत आहेत. जग युद्धाला कंटाळलें आहे. अॅटम बॉंबसारख्या ब्रह्मास्त्रापुढें तें थरथर कांपत आहे. मानवी संस्कृति नामशेष होते कीं काय ह्याची काळजी तत्त्वज्ञांना लागून राहिली आहे. त्यांना फक्त एकाच ठिकाणीं आशेचा किरण, जिवंत स्फुलिंग आढळला. अहिंसेच्या मार्गानें गेल्याशिवाय भागणार नाहीं असा विचार रशियन लेखक टॉलस्टॉय् व इंग्रज कलोपासक स्किन यांना गांधीचे पूर्वी सुचला होता. पण विचाराला आचाराचें स्वरूप त्यांचे आयुष्यांत त्यांना देतां आलें नाहीं. विचाराला आचाराचें स्वरूप देण्याला अंगी कर्तेपण लागतें. गांधींनीं अहिंसेचें पालन आपल्या खाजगी जीवनापुरतें मर्यादित ठेवलें असतें तर जगाचें चित्त त्यांचेकडे लागलें नसतें. या अहिंसेची शक्ति एका महान् राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या लढयांत यशस्वी रीतीनें वापरून दाखविली यांत गांधींची थोरवी होती म्हणूनच समस्त राष्ट्रांनीं त्यांचे सन्मानार्थ आपलीं राष्ट्रीय निशाणें अर्धीं खालीं करून आपला आदर व्यक्त केला.

**दीपस्तंभ**

आपल्याला राजकीय स्वातंत्र्य मिळालें आहे पण स्वातंत्र्याचीं जीं

फळें, सुख, शांति व उच्च संस्कृति तीं आपल्या पदरांत अजून पडावयाचीं आहेत. तीं पडण्याकरितां गांधींप्रमाणेंच आपण सत्याची उपासना निष्ठापूर्वक केली पाहिजे. तरच आपला व जगताचा तरणोपाय आहे. आपण सत्याची जी उपासना करूं, त्यांत आपल्याला पदोपदीं अडचणी येतील, पुष्कळ वेळां आपली दिशाभूल होईल. अफाट दर्यात प्रवास करतांना नौकानायकाला तारकासमूहाचें जसें मार्गदर्शन होतें तसें गांधीचे ग्रंथ आपल्या मदतीस येऊन आपली दिशाभूल होऊं देणार नाहींत.

**स्मारकाचें स्वरूप**

हिंदुस्थानच्या या अलौकिक उपकारकर्त्याचें स्मारक कशा प्रकारें करावें याचा विचार गांधींच्या दूरदर्शी अनुयायांनीं चांगला करून असें ठरविलें आहे कीं, दगडी पुतळे अगर इमारती यांत 'गांधी स्मारक निधि' खर्च करावयाचा नाहीं. गांधींचीं भाषणें, लेख आणि खाजगी रीतीनें लिहिलेलीं पत्रें यांत गांधीचें तत्त्वज्ञान, विचार आणि मार्गदर्शन आपल्याला आढळतें. व तेंच भावी पिढ्यांना खरें पाहतां उपयोगी पडणार आहे म्हणून गांधींच्या विचारांचा प्रसार करणाऱ्या संस्थांच्या रूपानें आणि त्यांच्या ग्रंथांच्या संग्रहालयांनीं गांधीचें स्मारक करावें असा निर्णय स्मारक कमिटीनें घेतलेला आहे. तेव्हां भावी भाग्यवान् पिढ्यांना गांधींच्या मार्गदर्शनाची चांगली सोय होईल यांत संशय नाहीं. तरुण विद्यार्थ्यांस हेंच सांगणें आहे कीं, गांधींच्या विचाराचें नुसत्या बुद्धीनें ग्रहण करून खरा फायदा होणार नाहीं. गांधीचें लेखन हा बौद्धिक व्यायाम अगर खुराक नाही. त्यांचें मनन व आचरण करावें तेव्हांच त्याची गोडी व उपयुक्तता कळेल व पटेल.

**एक शंका**

गांधींच्या जीवनाचें दर्शन करवितां करवितां त्याचें पर्यवसान गांधी-गुणगानांत होत आहे हें पाहून एखादा वाचक म्हणेल कीं, "गांधी सर्व सद्गुणांचें आगर होते काय? त्यांच्यांत दोष कांहींच कां नव्हते?" या प्रश्नाला उत्तर गांधींनीं स्वतःच दिलें आहे. ते म्हणत "माझ्यांत किती

उणीवा आहेत ह्याची कल्पना माझ्याशिवाय इतरांस कशी होणार? मी इतरांसारखाच पदोपदीं चुकणारा, पदोपदीं मोहवश होणारा मनुष्यप्राणी आहें. मी देव नाहीं किंवा देवाचा अवतार नाही. मला माझा राग आवरत नाहीं. तो जर आवरतां आला तर मी १२५ वर्षे जगूं शकेन." गांधींजवळ जी मंडळी त्यांच्या सेवेकरितां राहात त्यांना त्यांच्या क्रोधाग्नीची झळ वारंवार लागत असे. गांधीनीं आपल्या आत्म-चरित्रांत आपल्या जीवनांतील अनेक चुका आडपडदा न ठेवतां कथन केल्या आहेत. १९३२ साली गांधी विलायतेला गेले असतां माजी वृद्ध पतप्रधान लॉइड जॉर्ज यांच्या भेटीस गेले होते. पाहुण्याच्या सत्कारार्थ इंग्रज रीतिरिवाजाप्रमाणें यजमानांनीं गांधीपुढें मद्याचा पेला पुढें केला. गांधोंनीं अर्थात् त्याला नकार दिला. नंतर लॉइड जॉर्जनीं गांधीना सिगारेट देऊं केली. त्यालाहि गांधीकडून नकार मिळाला. तेव्हां तो वृद्ध गृहस्थ आश्चर्यानें उद्गारला " No Vices? – तुम्हांला कोणचेंच व्यसन नाहीं कां? " यावर गांधी हंसले आणि म्हणाले, "No external Vices" जगाला दिसण्याजोगी मला कोणतीच व्यसनें नाहीत. " असें बोलून त्यांनीं सूचित केलें कीं, शरिरानें दोष घडत नसले तरी मनानें दोष घडतात. म्हणजे मी इतरांप्रमाणेंच सामान्य चुका करणारा, मोहवश होणारा प्राणी आहे.

म. गांधींत कांहीं थोडें दोष असले तरी ते त्यांनीं काढून टाकण्याचा महान् प्रयत्न केला. स्वतःच्या खास आवडी नावडी अशा ठेवल्या नाहींत. आवश्यक वस्तु तेवढीच घ्यावयाची अशी आपल्या मनाला त्यांनीं संवय लावली होती.

**नमन**

गांधींचें आराध्य दैवत श्रीरामचंद्र असे. तुलसीदास रामायण वाचीत असतां त्यांची भूकतहान हरे. "उपवासांच्या दिवसांत तुलसीरामायणाचें श्रवण मला अन्नासारखें पोषक वाटतें." असे ते उद्गार काढीत. दैवताचें ध्यान करितां करितां मनुष्य तद्रूपच बनून जातो. त्याप्रमाणें गांधी हे सत्यवचनी रामाप्रमाणें आजन्म सत्याचे पूजकच राहिले.

राममंदिरांत अपण गेलों तर एकटचा रामाची मूर्ति आपणास दिसत नाहीं. सीता आणि लक्ष्मण डाव्या उजव्या बाजूला आहेत अशीच राममूर्ति आपण पाहतों. श्रीरामचंद्राजवळ सीतादेवी ज्याप्रमाणें सेवेकरितां सज्ज त्याप्रमाणें कस्तुरबा ह्याहि जन्मभर गांधीच्या सेवेंत राहिल्या. लक्ष्मणानें आपल्या ससाराचा यत्किंचितहि विचार न करतां रामसेवेंत ज्याप्रमाणें आपले आयुष्य घालविलें त्याप्रमाणें श्री. महादेवभाईंनी गांधीची सेवा त्यांचे अंथरूण घालून देण्यापासून तों गांधींचे निरोप घेऊन व्हाइसरॉयकडे जाण्यापर्यंत केली. १९१९ पासून १९४२ पर्यंत महादेवभाईना चारपांच तासांपेक्षां अधिक झोपहि कधीं मिळाली नाहीं. गांधीच्या अगोदर उठावें आणि नंतर निजावें, त्यांचे लेख उतरून घ्यावे, त्यांना आलेल्या पत्रांचीं उत्तरें द्यावीत, आलेल्या पाहुण्यांचें स्वागत करावें आणि मध्यें वेळ मिळेल तेवढयांत टकळीवर सूत काढावें. गांधींच्या मुखांतून निघालेला प्रत्येक शब्द त्यांनीं टिपून घेतलेला आहे. महादेवभाईंच्या सेवेला आम्हांला लक्ष्मणाच्या सेवेचीच उपमा द्यावीशी वाटते. आपण राममंदिरांत गेल्यावर राम, सीता, लक्ष्मण यांना एकत्र जसे अभिवादन करतों त्याचप्रमाणें महादेवभाई, गांधी आणि कस्तुरबा या तिघांना अभिवादन करून वाचकांची रजा घेतों.



# परिशिष्ट १ : कालनिर्देश

१८६९ ऑक्टोबर २—जन्म पोरबंदर (काठेवाड)

१८८३ विवाह—पत्नीचें नांव कस्तुरीबाई.

१८८५ गांधींच्या वडिलांचा—करमचंद गांधी यांचा—मृत्यु

१८८७ अहमदाबाद येथें मॅट्रिकची परीक्षा १८ व्या वर्षीं उत्तीर्ण.

१८८८ सप्टेंबर ४—बॅरिस्टरच्या परीक्षेचा अभ्यास करण्यासाठीं मुंबईहून रवाना.

१८९० मातेचें निधन

१८९१ इंग्लंडमधील बार अॅट लॉ म्हणजे बॅरिस्टरची परीक्षा उत्तीर्ण.

१८९३ शेठ अबदुल्ला यांचा खटला चालविण्याकरितां आफ्रिकेंतील नाताळ नांवाच्या वसाहतीस रवाना.

१८९४ व्हाइसरॉय लॉर्ड रिपन यांचेकडे आफ्रिकेंतील हिंदी लोकांचा अर्ज गांधींनीं पाठविला.

१८९४ मे २२—नाताळ इंडियन कॉंग्रेसची स्थापना गांधींनीं केली.

१८९६ गांधींची हिंदुस्थानास भेट, पण आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या निकडीच्या तारेवरून परत रवाना.

१८९७ जानेवारी १३—गांधी दरबान (नाताळ) बंदरांत पोहोंचतात. तेथील गोरे वसाहतवाले गैरसमजानें संतापून गांधींना बेदम मारतात.

१८९९–१९००—इंग्रज आणि बोअर लोक यांमध्यें युद्ध—शुश्रूषा पथकांत गांधी दाखल होतात.

१९०१ हिंदुस्थानास परत—ब्रह्मदेशांत दौरा.

१९०३ पुनश्च आफ्रिकेंत.

१९०४ इंडियन ओपीनियन वृत्तपत्र—फिनिक्स फार्मची स्थापना—झुलूंच्या बंडांत जखमी लोकांची शुश्रूषा.

१९०५ हिंदी लोकांनीं आंगठयाचे ठसे नोंदविण्याचा व तीन पौंड कराचा कायदा रद्द करण्यासाठीं इंग्लंडमध्यें शिष्टमंडळ नेलें.

१९०६ ब्रह्मचर्याची प्रतिज्ञा–११ सप्टेंबर रोजीं सत्याग्रहाचा निश्चय.

१९०७ वकिली बंद–सत्याग्रहाचें रणशिंग.

१९०८ गांधींना दोन महिन्यांची शिक्षा, पुनः एकदां तुरुंगांत.

१९०९ इंग्लंडांत शिष्टमंडळ.

१९१० हिंदुस्थानांत येण्यास निघतात–निघतांना मिळालेल्या दीड लाखांच्या देणग्या परत–मीठ वर्ज्य. १९१२ साखर वर्ज्य. गोदुग्ध वर्ज्य–गोखल्यांचा आफ्रिकेंत गांधीबरोबर दौरा.

१९१९ पुन्हां ट्रान्सवालमध्यें सत्याग्रह ३०–१०–१९१३ रोजी ३००० अनुयायांना घेऊन सत्याग्रहाची प्रचंड यात्रा.

१९१४ आफ्रिकेंतील डोईपट्टी गेली. महायुद्ध सुरू–गांधी आजारी.

१९१५ जानेवारी ९—मुंबईस परत—फेब्रुवारी १९–गोखले यांचा मृत्यु

१९१५ फेब्रुवारी १६–बनारस हिंदु विद्यापीठाच्या कोनशिला समारंभाचे प्रसंगीचें खळबळ करून सोडणारें भाषण.

१९१५ मे २५—**सत्याग्रहाश्रमाची** अहमदाबाद येथें स्थापना.

१९१७ एप्रिल १५–चंपारण्यांत प्रवेश–गाऱ्हाण्याची चौकशी, सत्याग्रह वगैरे संपूर्ण यश.

१९१८ मजुरांचा संघ, गांधींचें उपोषण, मजूर महाजन संस्थेची स्थापना. भारतमंत्र्याकडे दहा लाख हिंदी लोकांचा स्वराज्याबद्दल अर्ज.

१९१८ दिल्ली येथें युद्ध परिषदेंत गांधींचें हिंदींतून भाषण, खेडा सत्याग्रह.

१९१९ एप्रिल ६–अमृतसर येथें जालियनवाला बागेंत डायरचा गोळीबार. नोव्हेंबर १४ रोजी राष्ट्रसभेची चौकशी कमिटी.

१९२० गांधीजींचा होमरूल लीग जाहीरनामा—१ ऑगस्ट असहकारिता युद्ध–सप्टेंबर–कलकत्ता येथें जादा राष्ट्रसभा अधिवेशन–डिसेंबर, नागपूर येथें राष्ट्रसभेंत असहकारितेचा ठराव मंजूर.

१९२१ नोव्हेंबर १७–युवराजांचे आगमनावर बहिष्कार, त्यांतून दंगेधोपे. गांधींचा चार दिवसांचा उपवास. डिसेंबर-अहमदाबाद येथें गांधींच्या देखरेखीखालीं राष्ट्रसभा.

१९२२ फेब्रुवारी ५–चौरी चुराचा दंगा, बारडोलींतील कायदेभंगाची चळवळ स्थगित. गांधींचा पांच दिवस उपवास. **मार्च १० रोजीं गांधींना अटक व सहा वर्षे शिक्षा.**

१९२४ बेळगांव काँग्रेसचे अध्यक्ष.

१९२५ देशबंधू दास यांच्या स्मारकाकरितां गांधींनीं दहा लाख रुपये जमविले. राष्ट्रसभेच्या अध्यक्षत्वाचा राजीनामा जुलै १५.

१९२६ सायमन कमिशनच्या योजनेचा गांधीजींकडून निषेध.

१९२७ लंकेंतला दौरा.

१९२८ बारडोलीचा यशस्वी सत्याग्रह.

१९२९ स्वातंत्र्याचा ठराव राष्ट्रसभेनें मान्य केला आणि गांधींकडे युद्धाचें सेनापत्य दिलें.

१९३० मार्च १२ रोजीं दांडीकूचला सुरुवात. ६ एप्रिल–दांडी येथें मिठाचा कायदेभंग ४ मे रोजीं कराडी येथें अटक. येरवड्यास स्थानबद्ध–ऑगस्टमध्यें सप्रू–जयकर यांची मध्यस्थी.

१९३१ मार्च.गांधींची सुटका, गांधी अर्यावन् करार, ऑगस्ट २९–गोलमेज परिषदेसाठी गांधी मुंबईहून विलायतेला रवाना. २८ डिसेंबरला मुंबईस परत.

१९३२ जानेवारी ४–मुंबई येथें अटक. सप्टेंबर २० जातीयनिर्णयाबद्दल प्राणांतिक उपोषण ता. २६ येरवडा करार, उपवासाची समाप्ति.

१९३३ २१ दिवसांचा उपवास. कारण अस्पृश्यता ता. ४ रोजीं मुक्तता.

१९३४ जून २५ गांधींजीवर पुणें येथें बॉम्बफेक. ऑक्टोबर २९ राष्ट्रसभेंतून गांधीजी निवृत्त.

१९३५ शेगांवीं आश्रम स्थापना.–इंदूर येथें हिंदी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष.

१९३६ फैजपूर या खेड्यांत राष्ट्रसभा.

१९३७ मंत्रिमंडळाची स्थापना–क्रांतिकारकांच्या मुक्ततेकरितां गांधीचे प्रयत्न.

१९३८ हरिपूरला राष्ट्रसभा–खादी प्रदर्शनाचें उद्घाटन–सीमाप्रांतांत दौरा.

१९३९ राजकोट प्रकरणीं उपवास. गाधीसेवासंघाचें विसर्जन.

१९४० नोव्हेंबर–वैयक्तिक सत्याग्रह.

१९४२ मार्च–क्रिप्स योजनेचा अव्हेर, ऑगस्ट ८ 'चले जाव'ची राष्ट्रसभेंत घोषणा, अटक. आगाखान वाड्यांत स्थानबद्ध, १५ रोजीं महादेव भाईंचा मृत्यु.

१९४३ फेब्रुवारी–२१ दिवसांचें तुरुंगांत उपोषण

१९४५ फेब्रुवारी २२–कस्तुरबांचें निधन. ६ मे–गांधींची बंधमुक्तता.

१९४५ सिमला परिषद, वेव्हेल योजना.

१९४६ एप्रिल–बंगाल्यांत दौरा वेव्हेलबरोबर स्वराज्याबद्दल बोलणीं–नोव्हेंबर बॅ. जिना, भोपाळचा नबाब व लॉर्ड वेव्हेल यांचेशीं चर्चा.

१९४७ नौखालीचा पायीं दौरा.

१९४८ जानेवारी १३–हिंदुमुसलमान ऐक्यासाठीं उपवास. जानेवारी २०–प्रार्थनेच्या जागीं बॉंब फेकला गेला.

१९४८ ३० जानेवारी सायंकाळीं ५–३० वाजतां म. गांधींचा पिस्तुलाच्या गोळ्यांनीं दिल्लीस बिर्लाभवनांत खून.

# परिशिष्ट २ : उपयुक्त पुस्तकांची यादी

1. My Experiments with Truth—M. K. Gandhi

   नवजीवन प्रेस, अमदाबाद

   किंवा त्याचें मराठी भाषांतर—सत्याचे प्रयोग.

2. Hind Swaraj—M. K. Gandhi
3. The Gandhian Plan—श्रीमान् नारायण अग्रवाल.

   पद्मा प्रकाशन, मुंबई

4. The Gandhian Way—आचार्य कृपलानी.
5. बापू—श्री. घन:श्यामदास बिर्ला—हिंदी किंवा मराठी
6. डायरीके कुछ पन्ने—श्री. घन:श्यामदास बिर्ला.
7. Gandhiji's Do or Die Mission—S. L. Ghosh

   Book Corporation, Calcutta.

8. Delhi Diary—प्रार्थनाप्रसंगीचीं म. गांधींचीं शेवटचीं व्याख्यानें.
9. गांधीजींचीं पत्रें—व्रतविचार.
10. महात्मा गांधी जीवनचरित्र—सकाळ प्रकाशन

    —श्री. दा. न. शिखरे

11. गांधी–जीवन-कथा (आठवणी)—श्री. दा. न. शिखरे